**प्रकाशक :**
दा. दि. कुलकर्णी
श्रीविद्या प्रकाशन
२५० शनिवार, पुणे ४११ ०३०



पहिली आवृत्ती ; नोव्हेंबर १९६०
बारावी आवृत्ती : नोव्हेंबर १९९४

**मुखपृष्ठ** : दीनानाथ दलाल

**किंमत** : ९० रुपये

**मुद्रक :**
आनंद लिमये
इंडिया प्रिंटिंग वर्क्स,
इंडिया प्रिंटिंग हाऊस, जी. डी. आंबेकर मार्ग,
वडाळा, मुंबई ४०० ०३१.
दूरध्वनी : ४१२९७९९

*माझे दिवंगत स्नेही*

**प्रा. आर. एस. उर्फ बाबुराव रेगे**

*यांच्या प्रेमळ स्मृतीस –*

*पुरुषोत्तम*

## पाचव्या आवृत्तीच्या निमित्ताने

अपूर्वाई वाचल्यावर एका वाचकाने मला पत्र पाठवून, मी पाहिलेल्या इंग्लंडमध्ये आणि हल्लीच्या इंग्लंडमध्ये फरक पडल्यामुळे त्या पुस्तकात ' नवी व उपयुक्त ' माहिती घालून पुस्तक अद्ययावत् करावे असे सुचवले होते. हेतू चांगला. पण प्रवास वर्णन आणि टूरिस्ट विभागाचे गाईड् ह्यात माझ्या ह्या प्रिय वाचकाने गफलत केली. प्रवासवर्णने ही प्रतिबिंबे असतात. तसे पाहिले तर सारे ललित साहित्य जीवनाच्या प्रवासात वेगवेगळ्या वातावरणात वाढलेल्या संवेदनाशील लेखकांच्या मनावर उमटणाऱ्या प्रतिबिंबातूनच जन्म घेत असते. मी हा प्रवास केला त्याच काळात ह्या देशांचा प्रवास करणाऱ्या दुसऱ्या एखाद्या लेखकाने ह्याच यात्रेची कहाणी निराळ्या रीतीने सांगितली असती.

पहिल्या आवृत्तीनंतर ही पाचवी आवृत्ती प्रसिद्ध होईपर्यंतच्या काळात लंडनपुलाखालून टेम्सचे खूप पाणी वाहून गेले हे खरेच. आता तर युरोपचा प्रवास ही फारशी अपूर्वाई राहिलेली नाही. तरीही वीस वर्षांपूर्वी लिहिलेल्या ह्या प्रवासवर्णनाला अद्यापहि वाचकांचा प्रतिसाद मिळतो आहे. याचा अर्थ त्यातल्या स्थळांविषयींच्या माहितीपेक्षा वाचकाला रुचते ती लेखकाला भासलेली अपूर्वाई असाच मी घेतो.

पाचवी आवृत्ती प्रकाशित करीत असल्याबद्दल श्रीविद्या प्रकाशनचे श्री. मधुकाका कुलकर्णी यांचा मी आभारी आहे.

१ रूपाली<br>
७७७ शिवाजीनगर<br>
पुणे ४११ ००४

पु. ल. देशपांडे<br>
१२ जून १९७९

## पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना

मी परदेशच्या प्रवासाला लवकरच निघतो आहे हे कळल्यावर माझा एक हितचिंतक मित्र मुद्दाम मला भेटायला आला आणि कळवळून म्हणाला, " माझं एक ऐकशील का ? " ह्या माझ्या मित्राचे हे ' एक ' मला नेहमी ऐकावे लागते. आणि ते नेहमी काही तरी तिरपागडे असते. माझी पहिली कविता मी त्याला ऐकवली आणि त्याने ते ' एक ' मला ऐकवून ' तू गद्यच लिही ' असे सांगितले. आणि महाराष्ट्रशारदा काव्यरत्नांच्या एका नव्या हाराला मुकली. आता प्रवासाला निघाल्यानंतर ह्याचे ' एक ' काय ऐकावे लागणार त्याचा अंदाज येईना.

" काय ऐकू, सांग ! "

" तू लंडनला जा — पॅरिसला जा — वाटेल त्या खड्डयात जा — " अशाच थाटाचे तो शुभ बोलला आणि म्हणाला — " पण — "

" पण ? पण काय ? " नाटकात असं ' पण ' वर वाक्य तोडतात. इथे हे मात्र खरे खरे घडले.

" पण माझं एक ऐक — प्रवासवर्णन लिहू नकोस ! "

त्या माझ्या मित्राचे जर मी ऐकतो तर वाचकांवर हा प्रसंग आला नसता ! त्या मित्राचे जाऊ द्या. मी स्वतः प्रवासवर्णन ह्या गोष्टीची प्रत्यक्ष प्रवासापेक्षाही

अधिक धास्ती घेतली आहे. आयुष्यात प्रवासवर्णन आणि आत्मचरित्र लिहायचे नाही असा फार लहानपणीच संकल्प सोडला होता. पहिला मोडला — दुसरा केव्हा मोडला जातो ते पहायचं! जरासा विचार केल्यानंतर लक्षात आले की, मी दोन्ही संकल्प ह्या एकाच पुस्तकात मोडले आहेत. कारण पुढल्या दोन-अडीचशे पानांत मी केलेल्या प्रवासाचे वर्णन नसून प्रवासात असलेल्या माझेच वर्णन अधिक आहे.

ह्या साऱ्या घटनेला जबाबदार सर्वप्रथम मी आणि नंतर मुकुंदराव किर्लोस्कर. ज्या दिवशी तो माझा मित्र प्रवासवर्णन लिहू नकोस म्हणून डोळ्यांत पाणी आणून सांगून गेला, त्याच दिवशी मुकुंदरावांचे पत्र आले की 'तुम्ही परदेशाच्या प्रवासाला निघता आहा, किर्लोस्कर मासिकातून प्रवासवर्णन आले पाहिजे.' मी मुकुंदरावांचे ऐकायचे ठरवले हे चांगले केले की वाईट केले हे वाचक पुढली पाने वाचून ठरवतीलच!

माझी पश्चिम आघाडीवरील धामधूम पुस्तकरूपाने प्रसिद्ध करण्यात रा. ज. देशमुखांनी अपूर्व उत्साह दाखवला त्याबद्दल त्यांचे, आतील चित्रांबद्दल चतुर चित्रकार फडणीस ह्यांचे आणि चित्रकार दीनानाथ दलालांचे मनःपूर्वक आभार.

पु. ल. देशपांडे

संन्याशाच्या लग्नाची तयारी शेंडीपासून होते म्हणतात. माझ्या परदेशगमनाची तयारी नक्की कशापासून सुरू झाली हे सांगणे अवघड आहे. मात्र संन्याशाला शेंडीची गाठ मारायला लागणार नाही इतका वेळ मला टायची गाठ मारायला लागला. विमानात पाऊल ठेवण्यापूर्वी सुमारे पाचसहा तास मला टाय बांधता येत नाही हे कुटुंबातल्या जवळजवळे प्रत्येकाने पटवून दिले आणि हळूहळू गळ्याच्या गाठीपासून बुटाच्या गाठीपर्यंत अनेक तऱ्हेच्या गाठी मारण्यापासून त्या सोडण्या-पर्यंत त्या पाचसहा तासांत पाश्चात्त्य रीतिरिवाजांबद्दल पर-देशात गेलेल्या व बऱ्याचशा न गेलेल्या लोकांनी माझी बौद्धिके घ्यायला सुरवात केली.



तत्पूर्वी माझा उभा पंधरवडा 'परदेशी कसे वागावे' हे निमूटपणे ऐकण्यात गेला होता.

माझा चालू बूट निकामी ठरवून इंग्रजी हवेला टिकेल असाच बूट मी

करवून घेतला पाहिजे असा बूट निघाला. शेवटी कुलाब्यातल्या एका चिनी चांभाराकडून अठ्ठेचाळीस रुपयांचा बूट मी गळ्यात बांधून घेतला. बरेच दिवस त्या बुटाला पाय लावायची मला हिंमत होत नव्हती. आजवर कोल्हापुरी पायताण अगर तत्सम चपलेला सोकावलेला माझा पाय बुटात बसायला तयार होईना. एक तर चालू साईजची चप्पलही माझ्या पायात सहजी बसत नाही. परमेश्वराने मुळात मला घडवताना देहाच्या भविष्यकालीन विस्ताराचा अंदाज घेऊन दोन पाय देण्याऐवजी चांगली पायाभरणी केल्यासारखे लंबेचौडे पाय दिले आहेत. त्यामुळे माझ्या पायाचे माप त्या चिनी चांभाराच्या पाददृष्टीत फारच भरले. ‘ वेली बीग फीत — वेली वेली बीग ’ असे म्हणत त्याने माझ्या पायाचे माप घेऊन असल्या पायांना जोडे शिवणाऱ्याच्या पायात वास्तविक मी माझ्या कातड्याचेच जोडे उपकारादाखल घातले पाहिजेत असा चेहरा करून माझ्या पायाला जोडे शिवायला कबुली दिली. किंमत ऐकल्यावर त्यापेक्षा त्या न झालेल्या इंग्रजी खेटराने त्याने मला हाणले का नाही असा एक विचार डोकावला.

जी गत बुटाची, तीच सुटाची ! आजवर कुठल्याही शिंप्याने माझे कपडे बिघडवल्याचे माझ्या स्मरणात नाही. कारण कपडे बिघडतात म्हणजे नक्की काय होते हे मला कपडे घालायला लागल्याला इतकी वर्षे लोटून-देखील अजूनही उमगले नाही. परंतु इंग्लंडमध्ये कपड्यांच्या बाबतीत दक्षता घेतली पाहिजे हे असंख्य लोकांनी बजावल्यामुळे जाणकार मित्रांच्या सल्ल्याने चिनी चांभाराच्या नजीकचाच, फक्त विलायतेला जाणाऱ्या लोकांचे कपडे शिवणारा शिंपी शोधावा लागला. ह्या सद्-गृहस्थाची माझ्या बाबतीतली भावना काही निराळीच दिसली. प्रथम मी विलायतेला जाणाऱ्या मंडळींपैकी आहे ह्या घटनेवर त्याचा विश्वासच बसेना. दुसरी गोष्ट विलायतेला त्याने शिवलेले सूट हिंडत असल्याच्या जोरावर तो कापड फाडल्यासारखे इंग्रजी फाडत होता. मी त्याच्याशी हिंदी बोलत असूनही त्याने इंग्रजी आवरले नाही. अर्थात माझे हिंदी त्याच्या इंग्रजीइतकेच विनअस्तराचे होते हा भाग निराळा ! तिसरी गोष्ट म्हणजे

त्याने प्रथम मापाला हात घालण्याऐवजी लंडनला आपले सूट पाहून अनेकांनी काय काय अभिप्राय व्यक्त केले आणि पिकॅडिली. सर्कसमधले शिंपीदेखील आपण शिवलेला सूट घातलेल्या हिंदी तरुणांना वाटेत अडवून शिंप्याचे नाव कसे विचारतात इत्यादी गोष्टी काही कारण नसताना सांगितल्या. (अनुभवांती हे खोटे ठरले.) मी त्याचा सूट घालून पिकॅडिलीच्या शिंप्यांच्या दुकानांपुढून अनेक वेळा गेलो! मला फक्त त्याने शिवलेला काळा जोधपुरी कोट घालून जाताना एका गोऱ्या कामगाराने काळा पाद्री समजून हॅट काढून नमस्कार केला! मापे घेताना तर ह्या विलायती सुटाच्या तज्ज्ञाने माझे खांदे कसे वाकडे आहेत, (असतील, पण हे सांगण्याची काय गरज होती?) माझे पोट व छाती एकाच मापाची कशी आहे, माझ्या मानेला 'शेप' कसा नाही व चालताना माझ्या त्या शेप नसलेल्या मानेला पोक कसे येते, वगैरे फालतू परीक्षणे केली. अनेक वेळा मला 'ट्रायल'ला बोलावले. इंग्रजीत गुन्हेगाराच्या चौकशीला 'ट्रायल' हाच शब्द का वापरतात हे मला इतक्या वर्षांनंतर ह्या शिंपीदादाच्या दुकानात कळले. प्रत्येक 'ट्रायल' म्हणजे ट्रायलच होती. दर वेळी तो माझ्या अंगावर काही ठिगळे चढवी आणि 'नो नो, शुवर टमी! ओ—युवर लेफ्ट शोल्डर शॉर्टर दॅन राइट...' असे पुटपुटून माझ्या अंगावर आपल्या हातातल्या खडूने रेघोट्या ओढी!



शेवटी एकदाचा सूट झाला. तो मी अंगावर चढवून अपराध्यासारखा त्याच्यापुढे उभा राहिलो आणि —' तुमचे सगळे डिफेक्ट्स मी खुबीने झाकले आहेत; आता खुशाल हा सूट घालून लंडनमध्ये फिरा — तुम्हाला मरण नाही ' — असा निकाल देऊन जवळजवळ अर्धसहस्र रुपयांनी माझा जुना खिसा रिकामा केल्यावर त्याच्या आत्म्याची शांती झाली आणि एकदाचा मी ' सुट 'लो.

मला माझे जुने शिंपी आठवले. बस ! नुसती कपड्यांची ठाणे टाकायची आणि त्याचे बुशकोट किती आणि पांढऱ्या विजारी किती हा आकडा बोलायचा. पँट याचा अर्थ दोन पाय घुसवायच्या साधारण समांतर नळकांड्या आणि बुशकोट याचा अर्थ मध्ये फाडलेला अर्धा शर्ट ! वर्षानुवर्षे खाली मान घालून शिवत आलेल्या त्या शिंप्यांनी चुकून माझ्या झुकल्या खांद्याकडे किंवा वाढत्या पोटाकडे डोळा वर करून पाहिलेले नाही. ट्रायलला बोलावण्याचा सवालच नव्हता. एकदा फक्त जाऊन " काजे व्हायची राहिली आहेत " हे ऐकून यायचे. म्हणजे दुसऱ्या दिवशी कपडा पाण्यात पडणार आहे आणि आठ दिवसांचा वायदा असला तरी महिन्याने कपडे शिवून मिळणार आहेत याची खात्री होती. पण आता ते कपडे घालून विलायतेला जाऊ शकत नव्हतो. ' कॉटनचा तिथे काही उपयोग नाही ! आणि धुलाईत आपला धुव्वा उडतो ' अशासारखी ' धोका ' दाखविणारी वाक्ये मी महिनाभर ऐकत होतो. त्यामुळे ' गरम ' कपडे शिवणे प्राप्त होते. तेही लंडनला चालतील असले ! परदेशाच्या प्रवासात मला अत्यंत निरुत्साही कोणी केले असेल तर ह्या शिंप्याने ! माझ्या शरीरात वाखाणण्यासारखी एकही गोष्ट त्याला आढळली नाही. नश्वर देहाबद्दलची त्याची ही चिकित्सा ऐकून मला त्याची पुढे पुढे दया येऊ लागली आणि पाचव्या ट्रायलच्या वेळी मी त्याला " शेवटी हा देह नाहीसा होणार, पण आत्मा अमर आहे " अशासारखे काही वेदान्तपर विचार बोलूनही दाखवले. त्यावर त्याने " देह हा आत्म्याचा पोषाख आहे; आणि गीतेत ' वुई थ्रो बॉडी लाइक ओल्ड क्लोद्ज ' नावाची एक ' पोएम ' आहे " वगैरे मलाच ऐकवून ' शिष्यस्तेऽहम् '

म्हणायला लागले. तात्पर्य, माझे जरासे मोठे पोट, वाकडे खांदे इत्यादी गोष्टी झाकणारा आणि उंची आणि शेप नसलेली मान उंच करून दाखवणारा तो सूट अंगावर घालून मी प्रथम आरशात पाहिले तेव्हा तो सूट घालून जायला हिंदुस्थानात एक पुण्याच्या क्वार्टर गेटाजवळचे चर्च किंवा लंडन याखेरीज दुसरी जागा नाही याची मला खात्री पटली ! माझ्या या सुटातल्या अवताराची बऱ्याच मंडळींना कुणकूण लागली असावी. कारण परदेशी जायच्या दिवशी बरेच लोक मला निरोप देण्याचे निमित्त करून मला न्याहाळीत होते.

प्रवासाची तारीख जसजशी जवळ येत चालली तसतशी धाकधूक वाटू लागली ! एक तर विमानातून जायचे म्हणजे चव्वेचाळीस पौंडांपेक्षा गुंजभर अधिक सामान घ्यायची सोय नाही. त्यामुळे चव्वेचाळीस पौंड म्हणजे काय काय बसेल ह्याच्या विचारात झोप उडाली ! माझ्या एकट्याच्या सुटाचेच चव्वेचाळीस पौंड वजन भरेल असे मत पडले. परंतु अंगावरचे कपडे वजनात धरत नसल्याने मी बरेचसे कपडे अंगावरच घालावे अशीही उपसूचना आली ! रेशमी साड्यांची संख्या केवळ त्यांचे वजन होत नाही ह्या पळवाटेने वाढत होती. कुठलीही नवी साडी आणली की फक्त 'चाळीस तोळे आहे ' वगैरे भाषा व्हायची. मी फार तर एक सूट अंगावर घालू शकत होतो. परंतु चारपाच शर्ट एकदम चढवणे अवघड होते. चोवीस तासांनंतर जरी लंडनची थंड हवा झोंबणार असली तरी विमानतळावर जाईपर्यंत माझी अवस्था ' नुसतीच दाढी; आत ऋषीच नाही ' अशी खाडिलकरांच्या नाटकातल्या



त्या ऋषीसारखी — नुसताच सूट आणि अनेक शर्ट, आत माणूसच नाही, अशी झाली असती. त्यावर नायलॉनचा शर्ट हा तोडगा निघाला. हा शर्ट पंधरा मिनिटांत वाळतो येथपासून तो पाण्यात बुडवून वर काढताना वाळत येतो इथपर्यंत त्याचे गुणवर्णन झाल्यामुळे बाकीच्या शर्टांची हकालपट्टी होऊन अंगावर नायलॉनचा शर्ट चढला आणि माझ्या बॅगेत दोन पातळे वाढली. मी माझी काही पुस्तके घेतली होती — इंग्रजांना वाचून दाखवण्यासाठी नव्हे, तर मी लेखक असल्याचा काही पुरावा असावा, एवढाच नम्र हेतू! परंतु वजन-घटाईत पुस्तके गेली आणि जागा राहिली म्हणून जवळ जवळ पाच गुंजा व सहा मासे वजनाचे ब्लाऊज आले आणि एक नऊवारी लुगडे! (इंग्लिश बायकांना नऊवारी लुगड्याचे फार कौतुक आहे असा एका परदेशपर्यटन करून आलेल्या भगिनीचा सल्ला तिला आठवला.)

इंग्लंडला जाताना सोबत किती पौंड नेता येतात याविषयी अनेक मते आहेत. एक मत, "वाटेल तेवढे पौंड न्या. कुणी विचारत नाही." दुसरे, "मला वाटतं पाच हजार रुपये नेता येतात. आमचे काका गेले होते त्यांनी पाच हजार रुपयांचे पौंड करून नेले होते."

"केव्हा गेले होते तुमचे काका?"

"आता वारले ते!"

"पण वारण्यापूर्वी गेले होते ना?" मी.

"तुमचा म्हणजे भलत्या ठिकाणी विनोद बुवा! काका वारल्याला पाहा ... आता चौदा वर्षे होतील. हो, नाइनटीन फॉर्टीसिक्समध्ये — म्हणजे फॉर्टीसिक्स ए. डी.–त वारले."

"असं! ए. डी.–त, बी. सी.–त नव्हे?"

"नाही! म्हणजे सातआठ वर्षे पेन्शन घेतली न घेतली न् गेले!"

"म्हणजे पेन्शन घेतल्यावर गेले होते वाटतं?"

"छे छे! ते गेले त्या वेळी मी दोन वर्षांचा होतो. आता मला पाहा पुढल्या जानेवारीत चाळिसावं लागेल."

"म्हणजे अडतीस वर्षांपूर्वी तुमचे काका इंग्लंडला गेले होते, त्या

वेळी पाच हजार रुपयांचे पौंड घेऊन गेले होते !"

"त्या मानानं हिशेब करा ! त्या मानानं हल्ली महागाई फारच वाढली आहे. तेव्हा दहाएक हजार रुपयांचे तरी पौंड गवर्मेंट तुम्हाला देईल !" ...

आणखी एक मत — मी दडपून वाटेल तेवढे पौंड न्यावे असे होते. ह्यात मी दडपून म्हणजे कुठे दडपून ते मला आजतागायत कळले नाही. काहीजणांची समजूत इंग्लंडला जाताना अमुक इतके पौंड मिळतात — म्हणजे आपण विलायतेला जायला निघाल्याच्या आनंदात ही रक्कम आपणास सरकारकडून इनाम मिळते अशीही होती. ह्या उत्साही लोकांच्या विरुद्ध काही मंडळी— "ते नीट पाहा बुवा ! मला वाटतं हल्ली एक पैदेखील नेऊ देत नाहीत !" असा सल्ला देऊ लागली.

आता सोबत पैदेखील न घेता हा एवढा पाच हजार मैलांचा किंवा कावळ्याच्या वाटेने थोडा कमी असेल, पण काही कमी हजार मैलांचा प्रवास जमायचा कसा हे काही कळेना ! विमानात बरेच काही फुकट मिळत असल्याचे कळले होते, परंतु पुढे हमाली वगैरे कशी द्यायची असा एक अत्यंत पुणेरी प्रश्न डोळ्यांपुढे उभा राहिला. 'हमाल' म्हटल्यावर एक इंग्लंडहून परतलेले माझे मित्र, पाद्यापुढे 'कम्युनिस्ट' म्हटल्यावर तो जसा एकदम दचकेल तसे काहीसे करून, ओरडले— "हमाल ! इंग्लंडमध्ये हमाल नाही ! तुम्ही हमाल, हमाल म्हणून ओरडा, कुत्रदेखील येणार नाही !"

"अहो, हमाल हमाल म्हणून फार तर नाही येणार, पण पोर्टर म्हटल्यावर येईल की नाही ?"

"भलते महाग ! अहो, नुसती एक बॅग उचलायला एक पौंड घेतील !"

"म्हणजे साडेतेरा रुपये झाले." हिने पौंडांचे लगेच रुपयांत धर्मांतर करून सांगितले. "एका बॅगेला तेरा रुपये ! अहो, हिंदुस्थानात तेरा रुपयाला बॅग विकत मिळेल. हमालांची चैन आहे म्हणजे तिथे !" असे म्हणून मी इंग्लंडात फावल्या वेळात ही अंगमेहनत करून काही चलनी पौंड मिळवावे व वजनी पौंड घटवावे असाही एक मार्ग तिने सुचवून

पाहिला. मी तर परदेशात जाताना कोणत्या एका गोष्टीमुळे सदैव गोंधळात पडलो असेन तर ह्या पौंड-शिलिंग-पेन्सांच्या ! बारा पेन्स म्हणजे एक शिलिंग आणि वीस शिलिंग म्हणजे एक पौंड ह्या कोष्टकाचा शाळा सुटतानाच काडीमोड झालेला. पुन्हा ही मंडळी आयुष्यात येतील असे चुकूनही वाटले नव्हते. विशेषतः परदेशी चलन व हुंडणावळी हे शब्द तर मला एका दमात उच्चारणेही जड जाते. तरी बरे, विमानाने जात असल्यामुळे डार्डनिल्सची सामुद्रधुनी ( हे सामुद्रधुनी-प्रकरण मला या घटकेपर्यंत उमगलेले नाही ! ) — जिब्राल्टर — मेडिटरेनियन समुद्र ( या शब्दांच्या स्पेलिंगने दर वर्षी धोका दिला होता. ) — वगैरे प्राचीन मंडळांचे दर्शन हुकणार होते. भूगोल हा विषय मला गणिताइतकाच प्रिय. पृथ्वीचा वाटोळेपणा माझ्या भूगोलाच्या पेपरात पहिल्या पानावर अनेक वेळा सिद्ध झालेला आहे. त्यातल्या त्यात पीत समुद्र, तांबडा समुद्र, काळा समुद्र, इराणचे आखात, आशिया मायनर, तायग्रिस आणि युफ्राटिस ( ह्या मला वाटतं बहुधा नद्या होत्या की अजूनही आहेत देव जाणे! ) ह्या माझ्या गनिमांच्या डोक्यावरून मी उडत जाणार होतो !



विमान कंपनीची कचेरी ही आतूनदेखील बाहेरून सजवलेल्या दुकानाच्या खिडक्यांसारखी सुंदर असते ! आजवर निपाणी, संकेश्वर, चिपळूण, रत्नागिरी, कोल्हापूर, फार फार तर नवी दिल्ली असली तिकिटे मागायची सवय; त्यामुळे लंडनचे तिकीट कसे मागायचे हा एक चिमुकला पेचच होता.

मला एक जुना अनुभव आठवला. ' भो पंचम जॉर्ज भूप ' गादीवर होते त्या वेळची गोष्ट ! आम्ही दोनचार मित्रांनी मॉंजिनीत जेवायला

जायचा बेत केला होता. त्या काळातले मॉंजिनी म्हणजे 'काय सांगावे महाराजा !' या स्वरूपाचे होते. आता ते मॉंजिनीही गेले आणि जॉर्ज भूपही 'भो' म्हणायला राहिले नाहीत. मॉंजिनी ही त्या प्रचंड उपाहारगृहाबाहेरची पाटी वाचून 'कुत्र्यापासून सावध राहा' ही पाटी वाचल्यावर होतात तसे आमचे चेहरे झाले होते. तोपर्यंतचा आमचा जेवणानुभव मामा काणे, काका तांबे इत्यादी आचार्यमातुलांच्या पलीकडे गेला नव्हता; आणि इंग्रजीही तर्खडकरांच्या तीन्ही पुस्तकाना टेकून उभे राहिलेले. त्यामुळे दुपारच्या जेवणाला डिनर म्हणतात का सपर याची चिकित्सा मॉंजिनींच्या पायरीशी सुरू झाली.

चौघा मित्रांच्या खिशात मिळून बहु दहाएक रुपये होते. त्या वेळी मुंबईस राईस प्लेट अडीच आणे होती व मटणवाटीसह चार आणे! त्यामुळे जास्तीत जास्त म्हणजे दसपट रेट बसला तरी चौघांत मिळून दहा रुपयांत भागावे असा हिशेब झाला होता. तात्पर्य पैशाची बाजू बळकट होती असे आम्हाला वाटले. प्रश्न होता 'ताट' मागवायचे कसे हा. शेवटी प्रत्येकाने आपापल्या कुलदेवतेचे स्मरण करून आत पाऊल टाकले.

बराच वेळ आमच्याकडे कोणाचेच लक्ष गेले नाही. आणि आम्हीही त्या अत्यंत अपरिचित वातावरणात तरंगायला लागलो होतो. ती चादरी पसरलेली मेजे! कोपऱ्यातून येणारे इंग्रजी संगीताचे सूर. (हे सांद्र असतात असे त्या काळातल्या बहुतेक ख्यातनाम कादंबरीकारांनी बजावून सांगितले होते.) भर दुपारची वेळ असूनही त्या विस्तीर्ण दिवाणखान्यात प्रकाश अंधूक अंधूक होता. तरीदेखील त्या टेबलावर ठेवलेले काटेचमचे चकचकत होते. त्या काळात टेबलावर काटा पाहिला की अंगावर दुसरा यायचा! सुरी, काटा, चमचा ह्या गोष्टींची बालपणापासून धास्तीच. अभक्ष्याचे भय नव्हते, परंतु नळी काट्याने कशी उचलायची? सुपात पाव बुडवून खाता येतो का? टेबलावर दोनतीन सुऱ्या काय कापण्याच्या उद्देशाने ठेवल्या असाव्यात? आणि डाव्या हातात सुरी की काटा?— ह्यासारखे मूलभूत प्रश्न डोक्यात थैमान घालीत होते.

अशा या गोंधळलेल्या अवस्थेत आम्ही चौघे उभे असताना ' येस सर ' असा आवाज कानावर आला. कोणत्याही गोऱ्या माणसाने आम्हाला ' सर ' म्हटल्याचा हा पहिलावहिला प्रसंग ! आम्हाला त्याने एका टेबलापाशी नेले. खुर्च्या ओढल्या आणि ठरल्यासारखा चौघांनीही कपाळावरचा घाम टिपला ! स्थानापन्न झाल्यावर कोणत्याही देशी ' हॉटेला 'त विचारावयाचा पहिला प्रश्न आमच्यातल्या एका निळूने इंग्रजीत विचारला —" व्हाट इज हॉट ? " आणि त्या गोऱ्या परिचारकाने ( वास्तविक तो तितका गोरा नव्हता, पण त्या अंधूक प्रकाशात आणि सांद्र इंग्रजी वातावरणात आम्हाला प्रत्येकजण गोरा वाटत होता ! ) त्यातला फक्त ' हॉट ' शब्द ऐकून खांबाजवळचा पंखा चालू केला आणि आमच्यापुढे ' मेनू ' ठेवला. पुढील पाचसात मिनिटे त्या मेनूवरील ' Horse de...काही तरी... ' येथपासून ते शेवटपर्यंतची नावे वाचण्यात, लावण्यात गेली. एकही शब्द लागत नव्हता. फक्त पुढच्या किंमती कळत होत्या. आता जेवण मागवायचे कसे ? हा सुरवातीपासून भेडसावणारा प्रश्न पुन्हा दुप्पट जोराने उभा राहिला. त्यातून तो वेटर ' कांबळी 'च्या मेणाच्या प्रदर्शनातील माणसासारखा निश्चल उभा ! शेवटी निळूने पुन्हा एकदा " व्हॉट इज हॉट ? " असे पुटपुटून पाहिले ! उत्तर नाही. मग मी नुसतेच एकदा त्याच्याकडे पाहून हसायचा प्रयत्न केला, तो पुन्हा गप्प ! काही क्षण अशा चमत्कारिक शांततेत गेले आणि चौघांपैकी कुणाच्या तरी तोंडून " फोर कप्स ऑफ टी अँड बिस्कुट्स " असे शब्द सांडले.

" फोर टीज ? " असे म्हणून तो गेला. ' टी 'चे अनेकवचन कपांच्या हिशेबात ' टीज ' असे होते हे तर्खडकरांच्या मालेत, कॉलेज ट्रान्सलेशनमध्ये किंवा नेल्सन, मॅकमिलन वगैरे महात्म्यांच्या कोणत्याही ग्रंथात आढळलेले नसल्यामुळे फोर टीजचा व फॉर्टीचा थोडासा आमच्या डोक्यात घोळ झाला. बहुधा फॉर्टी ही बिस्किटांची संख्या असावी असे गोविंदाला वाटले. प्रत्येकी दहा बिस्कुटे सहज उडवता येतील असेही समाधान करून घेतले. शेवटी चहादाण्यांतून चहा आला. त्यात एक नुसती गुबगुबीत उशी होती. हा प्रकार काय आहे कळेना. अनेक

वर्षांनंतर त्याला टीकोझी म्हणतात हे कळले. निळूची कल्पना ती चाळीस बिस्किटांची भरलेली पिशवी आहे अशी झाली आणि त्याने ते प्रकरण उचलण्याचा प्रयत्न केला.

—त्यापुढच्या प्रकाराचे वर्णन करण्यात अर्थ नाही. त्या कढत चहापैकी निम्मा अंगावर घेऊन अनेक चमत्कारिक नजरा चुकवीत आम्ही फूटपाथवर उभे होतो. सारे तर्खडकर, काळे, मॅकमिलन आणि नेल्सन कोळून पिऊनही इंग्रजी हॉटेलात जाऊन चहा कसा प्यावा अगर चार नाटे कशी मागवावी हे काही शिक्षण मिळाले नव्हते. परवापर्यंत कोटातून हिंडताना मॉंजिनीच्या लगतच्या फूटपाथवरून जाताना उगीचच धडधडल्यासारखे होत असे. स्वातंत्र्याच्या चळवळीत मॉंजिनीच्या त्या दुकानात शिरून सगळ्या कपबश्या फोडण्याचे राष्ट्रकार्य करायची एक क्रांतिकारक कल्पना अनेक दिवस माझ्या डोक्यात रेंगाळत होती !

इंटरनॅशनल एअरलाइन्सच्या त्या गुळगुळीत आणि चकचकीत कचेरीत लंडनचे तिकीट काढायला जाताना माझी अवस्था पुन्हा एकदा तशीच झाली. त्यातून मी त्या दिवशी मुंबईत भयंकर उकडत असल्यामुळे लेंगा आणि मलमली सदरा घालून त्या कचेरीत गेलो होतो. त्यामुळे त्या अद्ययावत वातावरणात मी अगदीच 'विदाऊट तिकीट' माणसासारखा माझा मलाच वाटायला लागलो. 'ईव्ह्ज वीकली' अगर तत्सम मासिकात आढळणाऱ्या बायकांशी एकूण आपल्याला बोलाचालायचे प्रसंग कमीच येतात ! त्यातून टूथपेस्टच्या जाहिरातीसारखे त्यांचे ते स्मितहास्य ! अभ्यासपूर्ण सहजतेने साधणारी त्यांची पदराची चालढकल, मंद सुगंधाचा दरवळ, त्याला साथ देणारी



रंगीत पार्श्वभूमी, ते भलतेच लाघवी अगत्य—ह्या साऱ्या प्रकारांत माझा 'तिकीट काढून का हो देइना?' हा प्रश्न तसाच राहिला. वास्तविक माझे तिकीट आधीच काढलेले होते. मला फक्त ते त्यांच्याकडून आणायचे होते. परंतु ते हस्तगत होण्यापूर्वी इतर काही दिव्यांतून पार पडावे लागते. ती दिव्ये मी व ही गेला महिनाभर करीत होतो.

इंग्लंडला जायला कोणती इंजेक्शने घ्यावी लागतात ह्या प्रश्नाला फक्त दमा, रक्तक्षय आणि बाळंतरोग ह्यांखेरीज बहुतेक सगळ्या रोगांची नावे मला सांगितली गेली. देवी, कॉलरा, टायफॉईड, पिवळा ताप, प्लेग, मलेरिया, कांजिण्या, गोवर, निमोनिया, संधिवात, ब्लड प्रेशर, मधुमेह—ज्याला जे सुचेल ते तो सुचवीत होता. ह्याविषयी अनेक मतभेद होते. काहींच्या मते फक्त देवीवर भागेल, तर काहीजण त्याच्या जोडीला कॉलरा आणि टायफॉईड घालीत होते. पिवळ्या तापावर फारच दुमत होते. पिवळा ताप फक्त अमेरिकेला जायला अडवतो, असे त्यांचे म्हणणे. काहींच्या मते "प्रवासासाठी जरी ह्या लशी टोचून घेणे आवश्यक असले तरी—इतक्या दूरदेशी जाताहात, एकदा चेकअप करून घ्या!" वास्तविक मला सरकारी कारणासाठी सर्जन जनरलचे सर्टिफिकेट घ्यावे लागले होतेच. ते वातावरण पाहून तर मला दिवाकरांच्या 'कारकुना'तल्या वातावरणाची आठवण झाली होती. परंतु 'लस' टोचवून घेणे हे स्वतंत्र प्रकरण होते. 'देवी'वर सर्वांचे एकमत झाले तेव्हा त्या मोहिमेवर निघालो. ही व्यवस्था मुंबई म्युन्सिपालिटीची असल्यामुळे मनात भीती होतीच. कारण म्युन्सिपालिटीच्या हातात काम गेले की वेळेवर होणे कर्मकठीण! मग ती म्युन्सिपालिटी मुंबईची असो की व्हेनिझुएलाची असो! पण देवीच्या बाबतीत मात्र धक्काच बसला! त्या कचेरीत टोचून घ्यायला आलेल्या माणसांबद्दल प्रेम आढळले. हा हा म्हणता त्यांनी टिका काढल्या. वास्तविक इंजेक्शन या गोष्टीचे मला उगाचच भय आहे. त्या मानाने कुटुंब बरेच धीट. अगदी गोंदून घेतल्याच्या हौसेने तिने कॉलऱ्याच्या आणि देवीच्या सुया टोचून घेतल्या होत्या. शेवटी बहात्तर रोगांपैकी सत्तर वजा झाले! आणि

फक्त देवी आणि कॉलरा या दोन ज्वरांवर आमची सुटका झाली. हाफकिन इन्स्टिट्यूटमध्ये फक्त कुत्रा चावला तरच जावे लागते अशी एक माझी समजूत होती. सुदैवाने अजून मला कुठल्याही कुत्र्याने तोंड लावले नाही. माझ्या आयुष्यात अनेक कुत्री आली आणि गेली; पण एकानेही तोंड अगर पाय वर करून माझ्याकडे वाट वाकडी केली नाही. त्यामुळे हाफकिनमध्ये पाऊल टेवताना मी दहा दहा वेळा 'मला कुत्र्याचे इंजेक्शन नको आहे, कॉलऱ्याचे हवे आहे' हे प्रत्येक शिपायाला बजावीत कॉलऱ्यापर्यंत जाऊन पोचलो.

तिथे सुमारे शंभर माणसांची बारी लागली होती. त्यांत काही पिवळ्या तापाचे लोक मला आढळले. पुन्हा मी बुचकळ्यात पडलो. पण आफ्रिकेला व अमेरिकेला जायला पिवळा ताप टोचवला जातो; इंग्रज पिवळ्या तापाला धूप घालत नाही हे मला तिथे कळले. रांग मात्र दोन्ही रोगांची एकच होती. मला मनातून उगीचच आपण कुत्र्याच्या रांगेत नाही ना असे वाटत होते. परंतु कुत्र्याची इंजेक्शने पोटात देतात असे मी ऐकले होते. वास्तविक प्रत्येक गिळलेली गोष्ट पोटातच जात असताना सुई खुपसून पोटात औषध का घालतात? पण हा प्रश्न माझा नव्हता. मी फक्त 'कॉलरा कॉलरा' म्हणत उभा होतो. कारण त्या संमिश्र रांगेत गफलतीने मला कॉलरा टोचण्याऐवजी पिवळा ताप टोचला असता तर मला इंग्लंडला जाण्याऐवजी आफ्रिकेला जावे लागले असते! शेवटी सुमारे एक तासाने पुढल्या माणसाची पाळी आली. त्याने अस्तन्या सारवायला सुरवात केली. माझा अर्धा बुशशर्ट असल्यामुळे अस्तन्या सारण्याचा प्रश्नच नव्हता. तो गृहस्थ कॉलऱ्यातला आहे की पिवळ्या तापातला आहे याची मी खात्री करून घेतली. त्याचा आफ्रिकेला व्यापार होता आणि पाच वर्षांनंतर वर्षभर तो देसमदी वापस राहून परत [illegible] करायसाठी बायडीला 'फस टायमाला' घेऊन चालला होता. बायडीच्या हातात जुळी मुले होती. पाच वर्षांनंतरचे 'देसमधले' एक वर्ष त्यांनी चांगलेच सत्कारणी लावले होते. त्या तान्ह्या अर्भकांना टोचताना पाहून मला कळवळा आला! तेवढ्यात मी त्या

डॉक्टरच्या बाजूला उभ्या असलेल्या परिचारिकेच्या टेबलावर निरनिराळ्या लशी आणि सुया आहेत की नाही याची खात्री करून घेतली. पुढल्या माणसाचे टोचून झाले.

" हं, कुठे जाणार ? " डॉक्टर म्हणाले.

" कॉलऱ्याला !–यम् यम् यम्—इंग्लंडला ! "

" पासपोर्ट ? "

ह्या सगळ्या गडबडीत मी पासपोर्ट न्यायला विसरलो होतो. टोचून घ्यायला जाताना पासपोर्ट लागतो हे मला कोणीही सांगितले नव्हते. एक तास बारीत उभे राहण्याची तपश्चर्या फुकट गेली होती. दुसऱ्या दिवशी पुन्हा एकदा तीच तपश्चर्या करून मी दंडातून नमुन्यापुरता कॉलरा घुसवला !

वास्तविक परदेशी जाताना पासपोर्ट-व्हिसा वगैरे प्रकरणे भलतीच अवघड जातात. दोन वर्षांपूर्वी मी परदेशी जाण्यासाठी निघणार होतो व माझा पासपोर्ट तयार होता. मला एकच गोष्ट भेडसावीत होती. त्यावरील जो माझा फोटो होता तो माझाच काय पण घानाचे डॉ. निक्रुमा, शाखमिड जो जो किंवा चष्मा लावलेल्या नासरच्याही पास-पोर्टवर कदाचित चालला असता. दोन वर्षांत माझ्या चेहऱ्यात इतका फरक पडला, की पासपोर्टचा फोटो काढणारे तज्ज्ञ फोटोग्राफर तो फोटो अडल्यानडल्या कोणालाही चालेल असाच काढतात हे मला कोडे आहे. पोलिस स्टेशनावर 'वॉंटेड' लोकांचे फोटो जसे असतात तशा प्रकारचा माझा तो फोटो आहे. आणि माझ्या पत्नीचा फोटो म्हटले तर देविकाराणी आणि म्हटले तर सरोजिनी नायडू असा कसाही दिसू शकेल असे मला वाटते.

शिवाय त्यावरील सही हा दुसरा त्रासदायक भाग होता. माझी सही जवळ जवळ रोज निराळी येते. त्यामुळे दोन वर्षांपूर्वी केलेल्या सही-सारखी सही वेळप्रसंगी मला काढता येईल की नाही याची मला खात्री देता येत नव्हती. आजवर मी या सहीतून कधीही सहीसलामत सुटलो नाही. माझे बँकेचे व्यवहार ( केवळ अत्यंत माफक असल्यामुळे )

खिडकीपलीकडल्या रामभाऊ-जनूभाऊंच्या भलाईवर पार पडले आहेत. महाराष्ट्र बँकेच्या फार पलीकडे बघायचे नाही यामागले धोरण मराठी-पणाचा अभिमान हे नसून मंडळी आपल्याला ओळखतात, सहीत फरक पडला तरी चेक फारसा अडवीत नाहीत, हे आहे. वर्षानुवर्षे एकसारखी सही करणाऱ्या मंडळींबद्दल मला आदर आहे. आजवर ज्याप्रमाणे एकाच प्रकारची नोकरी घडली नाही त्याप्रमाणे एकाच प्रकारची सहीही माझ्या हातून झाली नाही. फोटो आणि सही या माझ्या पासपोर्टवरील दोन्ही गोष्टी प्रसंगी माझ्या विरुद्ध जाणाऱ्या होत्या आणि अखेरपर्यंत त्याची धाकधूक मनाला राहणार होती.

ते टोचणीचे दाखले, पासपोर्ट वगैरे दस्तऐवज जमल्यावर ' इन्कम-टॅक्स न बुडविता सदरहू इसम जात आहे, ' असे एक शिफारसपत्र लागते. इन्कम-टॅक्सशी प्रत्यक्ष संबंध जरी बऱ्याच उशिरा आला तरी इन्कम-टॅक्स कचेरीशी माझा जुना ऋणानुबंध होता. भारतीय आयकराचा इतिहास लिहिताना त्या खात्यात माझी सेवा काही महिने घडली याची नोंद व्हावी. त्यामुळे बऱ्याच वर्षांनी पुन्हा एकदा तिथे जाताना मन भरून आले. जुनी मित्रमंडळी भेटली. त्यातल्या बऱ्याच लोकांचे केस पिकले होते. त्या काळी कचेरीला स्वतंत्र आयकर भवन नव्हते आणि खात्यात स्त्रियांचा वावर नव्हता. गोरेगावकरांच्या चाळी, आंग्रेवाडी, शास्त्री हॉल ह्या विभागांतून किंवा क्वचित दादर-पार्ल्याहून येणाऱ्या मंडळींची भरती होती. मी तिथे कोणती सेवा करण्याबद्दल अखंड पन्नास रुपये दरमहा वाजवून घेत होतो हे मला आता स्मरत नाही. पण इन्कम-टॅक्स हपिसात मी ' आपला माणूस ' होतो. त्यामुळे आयकराचे शिफारसपत्र मला लगेच मिळाले. वर पूर्वपरंपरेला स्मरून भटाकडील चहा व शंकर-पाळेही झाले. देवी टोचावयाच्या कचेरीतदेखील चहा झाला होता. वर तंबाखूचा बारही भरायची सोय झाली होती. साहित्याची सेवा कुठे रुजू होईल सांगता येत नाही. आपला वाचक भेटला की मला तरी अजूनही पुंडलिकाभेटी परब्रह्म आल्याचा आनंद होतो.

मी चित्रपटात असताना एका आडगावातल्या टोलनाक्यावर माझा

टांगा अडवला गेला होता. पाच मिनिटे हुज्जत घातली तरी तो जकात-कारकुनाचा शिपाई टांगा सोडीना. कारकूनमहाराज कुठे नष्ट झाले होते देव जाणे ! माझ्या बॅगेत फक्त पुस्तके व कपडे आहेत हे त्याला सांगून पटेना. " जरा थांबा, भाऊसाहेब येऊ देत ," हा जप त्यानी चालवला होता. मला त्याने थांबवून धरण्यापेक्षाही मी त्याला जकात भरणाऱ्या अगर चुकवणाऱ्या तंबाखूच्या किंवा तत्सम कसल्या तरी व्यापाऱ्यासारखा वाटत होतो, याचा मला संताप येत होता. शेवटी पाच मिनिटांनी कानावरील जानवे मागे टाकीत भाऊसाहेब आले. लगेच त्या शिपायाने " भाऊ-साहेब, परवा आपण ह्यांचा शिनेमा पाहिला ते " अशी ओळख करून दिली. " खरंच की — माडगूळकर काय आपण ? छान काम झालं आहे हो तुमचं " असे म्हणून त्यानी उगीचच हसून घेतले.

" हे माडगूळकर नव्हेत भाऊसाहेब, हे पूल्देसपांडे ! " माझ्या नावाच्या चिंध्या करीत शिपाई सांगत होता. " माडगूळकर म्हणजे ते बापाचा पार्ट केल्याले ! "

" हो हो, हे म्हणजे बाईच्या मागे लागलेले ? ढोलकी वाजवणारे ? वा वा ! — चष्मा काढून ढोलकी वाजवायला जमलं का हो ! छान ! गणपा, चहा मागवा. "

केवळ भाऊसाहेबाना मला ' दाखवण्यासाठी ' त्या जकातकारकुनाच्या शिपायाने टांगा अडवला होता. टांगेवालाही शिनेमातल्या हीरोला आपण नेत असल्याच्या खुषीत होता आणि गावात टांगा शिरताना प्रत्येक पानवाला, टेलर, सलूनवाले वगैरेंना ओरडून ' फुडच्या पावलातले पूल्देसपांडे ' गावात आल्याची जाहिरात करीत त्याने मला इष्ट स्थळी सोडले होते.

दिसामासानी प्रवासाच्या तयारीला रंग चढत होता. दंडावर कॉलरा, देवी वगैरे चढल्या होत्या. घरात निरनिराळ्या बोटींच्या रंगीबेरंगी पुस्तिका जमल्या होत्या. वजनाचा काटाही आला होता. सुरवातीला बोटीनेच जायचा विचार होता. आजवर आयुष्यात आलेल्या बोटी म्हणजे एकजात भाऊचा धक्का घेऊन सुटणाऱ्या. विलायतेची बोट एकदोनदा दुरूनच

पाहिलेली! परंतु काही कारणानी बोटीची कल्पना बुडवावी लागली आणि विमानाने जायचे ठरले. बोटीने जाणार हे ऐकून काही मंडळी "त्यापेक्षा विमान बरं—आज बसलात की उद्या लंडन!" असे म्हणून बोटीने जाण्यात आता काही स्वारस्य राहिले नाही असे ठसवीत होती. त्याच सुमाराला मध्यपूर्वेत काही गडबडही सुरू झाली. आंतरराष्ट्रीय राजकारणाशी मी एकूण संबंध दुरूनच ठेवला आहे. रशिया, जर्मनी, फ्रान्स वगैरे ठळक मंडळी वजा केली तर जॉर्डन, इस्राएल, इराक वगैरेशी किंवा नाटो व स्याटो राष्ट्रे व त्यांचे करार, संबंध, वारंवार उकळी फुटणाऱ्या तेलाचे प्रश्न, इत्यादी बाबतींत मला एकूण गती कमीच! गेल्या महायुद्धातदेखील दोस्त राष्ट्रांत कोण कोण सामील आहे याचा युद्ध संपेपर्यंत मला फारसा पत्ता नव्हता. जागतिक युद्ध याचा हिशेब रेशनिंग, महागाई-भत्ता, दिवाबंदी, रॉकेलच्या रांगा असल्या कौटुंबिक पातळीवरच राहिला होता. त्यामुळे रेशनिंग संपेपर्यंत युद्ध संपल्याची खात्री पटत नव्हती. हा नवा शीतयुद्धाचा प्रकार तर माझ्या अजूनही आवाक्यात येत नाही. शिखरपरिषद, बगदाद करार वगैरे मथळे उलटून मी चटकन पुण्यामुंबईजवळ येतो व वसंत व्याख्यानमाला, साहित्यसंमेलन वगैरे घरगुती गोष्टीत लक्ष घालतो. आधुनिक अस्त्रविद्येत ॲटम बॉबसंबंधी काही ऐकीव माहिती वजा केल्यास त्याही दिशेची वार्ता एकूण कमीच. परवा परवा रशियाने



चंद्रावर कुत्री सोडल्याची खबर तेवढी वाचली होती. त्या बिचारीने रशियाचे काय घोडे मारले आहे देव जाणे! राजकारणी मंडळीनी तेवढा चंद्र आम्हा कविकलावंताना मोकळा सोडून इतर ग्रहगोलांवर धुमाकूळ

घालायला काही हरकत नाही !

तात्पर्य, मी प्रवासाची तयारी करीत असतानाच मध्यपूर्वेत बंडाळी झाली. अमेरिकेची विमाने कुठेशी गेली; अमेरिकेची गेली म्हणून रशियाची गेली. रशियाची गेली म्हणून आणखीही लहानमोठ्या देशानी आपापली विमाने मध्यपूर्वेत धाडली. त्याशिवाय इकडले पंतप्रधान तिकडे, तिकडले इकडे वगैरे खो खो चाललाच होता. माझे यांपैकी कोणत्याही देशाशी वाकडे नसताना मधल्या मधे माझी परदेशाची सफर चिंबते की काय अशी मला भीती वाटत होती. घरात कधी नव्हे ती नासर, आयसेन-हॉवर, निकिटा क्रुश्चाव्ह, मॅकमिलन वगैरे मंडळींविषयी चर्चा सुरू झाली. काहीजणांचे म्हणणे—युद्ध होत नाही; तर काही जणांचे म्हणणे आता जागतिक महायुद्ध अटळ !

अशा या जागतिक अशांततेच्या वातावरणात मी नायलॉनचे पायमोजे घेऊ की नको ह्या विचाराने अस्वस्थ झालो होतो. कारण ठळक खरेदी-वरून आता चिल्लर खरेदीपर्यंत आमची तयारी पोचली होती. दाढीचे सामान न घेता तिथे एक इलेक्ट्रिक रेझर घ्यावा असा एक विचार सुचवून पाहिला. परंतु पौंडाच्या टंचाईत इलेक्ट्रिक रेझरला काट बसली आणि आमचा सेफ्टी रेझर परदेशपर्यटनाला निघाला. मी घरात घालायला चपला घ्याव्या म्हणत होतो. परंतु इंग्लंडमध्ये चपला घालत नाहीत, सदैव मोजे पायात; चपलेत अंगठा कसा जाणार ?—असा विरोध करायला त्याच दिवशी नुकताच लंडनला जाऊन आलेला माझा मित्र हाजिर झाला. त्यामुळे चपला रद्द झाल्या. एक असावी आपली म्हणून मी गांधी टोपी बरोबर घेणार होतो. परंतु तसली टोपी तिथे भटारखान्यातले बवर्ची घालतात असे ऐकल्यावर मी टोपीचा विचार डोक्यातच ठेवला. नवी कोणतीही वस्तू विकत घेताना युद्धामुळे जाणे रद्द झाले तर ती इथे फुकट पडून रहायला नको अशा धोरणाने घेतली जात होती. रोज वर्तमानपत्रांचे मथळे वाचून खरेदीला जाणे सुरू केले. बेरुटला दंगे-खोरानी रात्री कुठेही हल्ला केला नाही हे वाचल्यावर अर्धा डझन नवे हात-रुमाल घेतले आणि बड्या चौघांची बोलणी फिसकटली हा मथळा

वाचल्यावर पुलओव्हरचा बेत फिसकटला. आजच्या युगात सारे जग एकत्र आले आहे ते असे! त्या बड्या चौघाना किंवा देशोदेशींच्या वकिलाना व वकिलातीना कल्पनाही नसेल की आपल्या आंतरराष्ट्रीय धोरणावर कुणा एका मराठी लेखकाची प्रवासाची बॅग भरत होती— रिकामी होत होती! जाण्याची तारीख माझ्याकडून निश्चित झाली होती. प्रश्न होता आंतरराष्ट्रीय परिस्थितीचा. ती कधी चिघळत होती तर कधी पाघळत होती. हे बडे चौघे की पाच कधी रंगात यायचे तर कधी गुरगुरायचे — कधी गप्पच बसायचे. सारी मध्यपूर्व माझ्या पश्चिम-मार्गापुढे भिंतीसारखी उभी होती.

शिवाय कोणत्या वेळी तुमचे जाणे रद्द होईल हे सांगता येणे कठीण आहे असे शुभ बोलणारे होतेच. काहींनी तेवढ्यात माझी कुंडली पाहून, जाणे अवघड आहे असे सांगितले, तर काहींनी हात पाहून जाणे अटळ आहे असेही सांगितले. माझी अवस्था काहीशी वळिरामासारखी झाली होती. मला युद्ध होणार नाही हे सांगणारे ज्योतिषी जवळचे वाटू लागले. परदेशी जाण्याची स्वप्ने फार लहानपणापासून मी पाहात होतो. त्यामुळे केव्हाही कुणालाही हात दाखवायचा झाला तर माझा पहिला प्रश्न देशपर्यटणासंबंधी असे. मनगटाच्या आसपास कुठे तरी ही रेषा असते म्हणतात. आजपर्यंत पन्नास टक्के ज्योतिषांनी ती रेषा माझ्या हातावर असल्याचे व उरल्या पन्नासांनी ती नसल्याचे सांगितले होते. काहीजण किरंगळीखाली चार बोटे एक रेषा दाखवून ती दुसऱ्या कुठल्या तरी रेषेला मिळाली तर मी जाणार नाही, नाही मिळाली तर जाणार असेही वर्तवून गेले होते. त्यामुळे ह्या युद्धाच्या वातावरणात जर बिघाड झाला तर मी बारकाईने ती रेषा रात्री गुपचूप पुढे सरकून त्या दुष्ट रेषेला जाऊन भिडली की काय ते पाहत होतो. पुढेपुढे तर प्रभातीचे करदर्शन करायला मी सुरवात केली, आणि ती रेषा मिळाली की नाही हे पाहून आंतरराष्ट्रीय परिस्थितीचे निदान करू लागलो. चार विमाने इकडून तिकडे गेली की माझी रेषा पुढे सरकल्याचा मला भास होई. बोटीने जाणे रद्द झाल्यामुळे थोडासा आनंद व थोडेसे दुःख होत होते. समुद्राची

मला आकाशाहून अधिक ओढ आहे. आकाश फक्त रात्री पहायला आवडते. कोकणची चिमुकली बोटदेखील रात्रीच्या वेळी आसपासचा दर्या दाखवीत जाते. मधूनच मासे चमकतात, लाटांचा फेस लकाकतो, शिवाय मला बोट लागत नाही. त्या मानाने विमानाचा प्रवास एकसुरी. बोटीत अनेक आवाज – खुद्द बोटीचा, वाजूचा, दर्याचा, अनेक लोकांचा ! त्या आवाजात आपण मोठ्याने गाऊन घेतले तरी आपल्या-खेरीज कुणालाही त्रास होत नाही. विमानात मोठ्याने बोलण्याची चोरी ! पण हे राजकीय बादळ माझ्या परदेशच्या बोटीच्या वाटेतच येत असल्या-मुळे ' हा सुवेझ कालवा ' कधी ' थक्क करिल मानवा ' हे सांगणे कठीण होते. मला वास्को ड गामासारखे केप ऑफ गुड होपला वळसा घालून जावे लागले असते. परंतु मला ठरावीक तारखेला लंडनला पोचणे प्राप्तच होते.

शेवटी विमानाची तिकिटे हातात आली. तिकीट या गोष्टीला मी आजपर्यंत अन्नपेक्षाही जास्त जपत आलो आहे. विशेषतः फार दूरच्या प्रवासाला जायचे झाल्यास मी रात्रीच्या वेळी तिकीट खिशात ठेवून खिसा सेफ्टी पिनने बंद करून झोपतो. गाडीत मला झोप लागल्याचे केवळ मला तिकीट चेकरने पकडल्याची जी अनेक स्वप्ने पाहिली आहेत त्यावरूनच पटते. सेफ्टी पिनने खिसा बंद करण्यात दोन उद्देश. एक खिसा उघडला जाऊन तिकीट पडू नये हा व दुसरा म्हणजे कुशी बदलताना हटकून पिन उघडते व टोचते. त्यामुळे जाग येते. पुन्हा आपले तिकीट आपल्याला तपासायला येते. तिकीट कलेक्टर या इसमाची मला फौजदारापेक्षाही जास्त भीती वाटते. साध्या बसमधेदेखील कंडक्टर जवळ आला नाही तर हातातली चवली वाजवून, टाळी वाजवून, शुकशुक करून, एकदा त्याच्याकडून तिकीट घेतल्याशिवाय मला चैन पडत नाही आणि तिकीट घेतल्यावर उतरेपर्यंत ते सांभाळून ठेवणे एवढेच कार्य शिल्लक राहते.

बसमध्ये शांतपणे वाचत बसणारी माणसे पाहिली की मला त्यांचा हेवा वाटतो. तिकिटाची घडी करून लोक ती खुशाल अंगठीत अथवा

घड्याळाच्या पट्टयात ठेवतात. मला ते धैर्य नाही. मी तिकीट जपून ठेवण्याच्या गडबडीत अनेक वेळा बसमध्ये छत्री विसरून आलो आहे. तिकीट भिजू नये म्हणून मी ते पुस्तकात ठेवतो. बसमधून जाताना पुस्तकाचा तिकीट ठेवण्याइतका दुसरा कोणताही चांगला उपयोग नाही. एक तर ते पुस्तक निवांतपणे वाचणे अशक्य असते. शेजारी बसणारा प्रत्येक इसम त्यात डोके घालतो. शेजाऱ्याची बायको अधिक सुंदर वाटते (म्हणतात) तसे शेजाऱ्याचे पुस्तकही माणसाला अधिक आकर्षक वाटते की काय देव जाणे! सामान्यतः शंभराव्या पानात तिकिट ठेवायची मला सवय आहे. त्यामुळे शंभराहून कमी पानांच्या पुस्तकावर माझी प्रवासात तरी श्रद्धा नसते! चांगले दोनशे पानांचे पुस्तक घ्यावे, पानांचे कोपरे फाडावे व शंभराव्या पानात बसचे तिकीट घालावे. आगगाडीच्या तिकिटाला हा नियम लागू नाही व विमानाच्या तर मुळीच नाही, कारण विमानाचे तिकीट हे चेक बुकासारखे असते. त्याच्यावर बराच मजकूर लिहिलेला असतो. पोस्टातल्या पावत्या किंवा असली तिकिटे लिहिण्याच्या कामावर माणसे नेमताना सुवाच्य अक्षर हा दोष मानण्याची जागतिक प्रवृत्ती असावी. मनी-ऑर्डरी, रजिस्टरे अगर पोस्टातून निघणारी इतर कोणतीही पावती ज्याला म्हणून नीट वाचता आली त्याला कुणाच्याही ललाटीचे भविष्यदेखील वाचता यावे. विमानाची आमची तिकिटे वाचताना मिस्टर आणि मिसेस हे दोन शब्द लागले व त्यामुळे माझे तिकीट कुठले ते कळले. बायकांची तिकिटे निराळी नसतात, पुरुषांच्या तिकिटांसारखीच असतात हे जाता जाता सांगायला हरकत नाही.

विमानाच्या प्रवासाचे इतर काही नसले तरी ती एक विशिष्ट प्रकारची बॅग हे मात्र निश्चित वैशिष्टय असावे! ती बॅग सर्व प्रवाशांना फुकट मिळते असाही एक लोकभ्रम आहे. पहिल्या वर्गाच्या प्रवाशांना ती फुकट मिळते. परंतु त्यासाठी 'प्रवासी वर्गा'पेक्षा जवळ जवळ दुप्पट दराचे तिकीट काढावे लागते. त्या बॅगेसाठी निदान हजारभर रुपये जास्त मोजावे लागतात. एरवी ती इतर प्रवाशांना दहा रुपयांत मिळते. सारांश, इतके पैसे खर्च करून सोबत रिकामी बॅग नेण्यापेक्षा दहा रुपये देऊन

ती विकत घेणे बरे, हा व्यवहार बरा वाटला व ती बॅग एकदाची आणली. त्या बॅगेचे वजन चव्वेचाळीस पौंडांच्या किमान वजनात धरीत नाहीत असाही एक गैरसमज आहे. त्यामुळे साऱ्या जड वस्तू त्या चिमुकल्या बॅगेत भराव्या असेही धोरण कुणी तरी सुचविले. परंतु तेवढ्या तिकिटावरील वजनासंबंधीच्या सूचनात अंगावरील कपड्यांखेरीज प्रत्येक वस्तूचे वजन करण्यात येईल हा इशारा आढळला व त्या बिचारीची वजनदार वस्तूंतून सुटका झाली.

पात्रांची सिद्धता आता झाली होती. सर्व धोक्याच्या ठिकाणांवरून आलबेल मिळाला होता आणि " काय, केव्हा निघता ? " ह्या प्रश्नाला मी न भिता उत्तर देऊ शकत होतो—" वीस ऑगस्टला ! "

वीस ऑगस्टला रात्री अकरा वाजता आमचे विमान सांताक्रूझ विमानतळावरून निघणार होते. विमानात बसण्याचा माझा पहिलाच प्रसंग नसल्यामुळे विमान म्हणून विमानाचे विशेष कौतुक मला नव्हते. परंतु परदेशी जाणाऱ्या प्रचंड विमानाचा अनुभव नव्हता. विमानतळावर तास, दीड तास आधी येण्याची सूचना मिळाली होती. ही सूचना मिळाली नसती तरी मी दोन तास आधीच गेलो असतो! कारण एम. एस. एम.-च्या-( हल्ली सदर्न रेल्वे झाली तरीही ) देखील गाडीला जाताना मी जागा 'रक्षित' असली तरी तासभर आधी जातो. चुकीची गाडी, चुकीचा डबा, टांग्याचे चाक मोडणे, टॅक्सी पंक्चर होणे, पाऊस, महत्त्वाचे सामान घरी विसरणे, तिकीट हरवल्यासारखे वाटणे, पाण्याची पिशवी भरायची तशीच राहणे इत्यादी घटनांसाठी एकदीड तास बाजूला काढून ठेवणे मला सोयीचे वाटते. त्यातून रेल्वेच्या बतीनेही काही घटना असतात. बर्थवर बिछाना लोटून आडवे होण्याच्या बेताला डबा 'शीक' झाल्याचे सांगत पोर्टर येतो; मग नवा हमाल शोधून यार्डात कुठे तरी चांगली तब्येत असलेल्या डब्यापर्यंत जाऊन काळोखात सुमारे पाऊण एक तास बसल्यानंतर तो डबा हालतो व उरलेल्या गाडीला शेवटी जोडला जातो. त्यात मग दिव्याचे कनेक्शन आले की पंखा बंद पडतो आणि पंखा चालू झाला की दिवे डुलक्या देऊ लागतात. शेवटी दोन्ही दुरुस्त होतात, गाडी चालू होते आणि पाण्याची टाकी रिकामी असल्याचे ध्यानात येते. मग लोणंद येईपर्यंत जामावे लागते. तिथे गार्डाला गाठून आपली हलाखी सांगेपर्यंत गाडी सुटते आणि नीरेला स्वत: पाणी पिण्यासाठी गाडी थांबते तेव्हा आपल्या पाण्याची व्यवस्था झाली तर होते.

एरवी पहाटे पावणेपाच वाजता येणाऱ्या मिरजेच्या स्टेशनवरील नळाची वाट पाहत बसावे लागते. एकूण प्लॅटफॉर्मवर लवकर जाऊनदेखील प्रवास सुखाचाच होईल हे नक्की नाही. प्रवाशांच्या सुखाची जिम्मेदारी घेणारी रेल्वे केव्हा येईल देव जाणे! अत्यंत सुखाचा प्रवास म्हणजे एक तर विनोबांसारखा जमिनीला पाय लावून— किंवा आकाशातून!

नऊ वाजता विमानतळावर येऊन हजर होण्याची एअर इंडिया इंटरनॅशनलच्या कचेरीतून सूचना मिळाली होती. मला निघण्यापूर्वी फोन करून विमान वेळेवर सुटणार की नाही याची चौकशी करा असाही इशारा ते त्रैलोक्यमोलाचे स्मित करीत तिथल्या एका युवतीने दिला होता. तिचे ते स्मित कुठे तरी ठसल्यासारखे झाल्यामुळे निघता निघता ती सूचना आठवली.

"विमान म्हणजे काही एस. टी. नाही उशिरा सुटायला! अहो, तिथे म्हणजे सेकंदावर कामे चालतात." उत्तरेस मालाड आणि दक्षिणेस काळा घोडा यांपलीकडे इंचभरही प्रवास न केलेल्या आमच्या एका चाहत्याने मला चारचौघांत हा देश सोडण्यापूर्वी शेवटले एकदा गाढवात काढून घेतले. आज अनेक वर्षे ह्या गृहस्थाचे माझ्या बाबतीत हेच धोरण आहे. तरीही आमची मैत्री का टिकली आहे मला कळत नाही! 'मला' विलायतेला पाठवण्याचे 'चालले' आहे हे ऐकल्यावर याची पहिली प्रतिक्रिया 'का? सरकारचे पैसे वर आले आहेत वाटतं?' ह्या शब्दात व्यक्त झाली होती. मी सूट घातल्यावर असाच्या असा उचलून धोबी तलावाच्या आसपास कुठल्याही किरिस्ताव बँडवाल्याच्या फडात मला उभा करावा हे बोलण्याची वास्तविक गरज नव्हती. पण त्याला राहवतच नाही. त्यामुळे आपल्या स्वभावाला अनुसरून त्याने विमान वेळेवर सुटणार की नाही हे आधी विचारावे लागते ह्या माझ्या माहितीची शक्य तेवढी चेष्टा केली. कुणी तरी तेवढ्यात फोन केला व टोकियोवरून येणारे विमान न आल्यामुळे आमचे विमान दोन तास उशिरा सुटणार असल्याचे कळले. संपूर्ण सूट, त्यावर पुलोव्हर, गळ्यात फासासारखा आवळलेला टाय, पायात ते अठ्ठेचाळीस रुपयांचे

चिनी बूट, जागतिक परिस्थिती निवळल्यावर घेतलेले नायलॉनचे मोजे आणि वर इंग्लंडच्या थंडीसाठी घेतलेला तो बलाढ्य कोट घालून पुढले दोन तास मुंबईत काढण्यापेक्षा 'मोडुनि दंडा फेकुनि देइन' म्हणत अंगावरची सर्व वस्त्रे (काही मर्यादा सांभाळून) फेकून द्यावी असे वाटू लागले. तेवढ्यात कुणी तरी 'बरोबर दोन तास उशिरा विमान सुटणार आहे का?' असा एक प्रश्न विचारला आणि घराला त्या प्रश्नावरून मुन्सिपाल्टीच्या अंदाजपत्रक पास करण्याच्या सभेचे स्वरूप आले!

"दोन तास विमान उशिरा सुटणार की विमानतळावर दोन तास उशिरा जायचं?"

"पण दोन तास म्हणजे नक्की दोनच तास का?"

"पण टोकियोहून येणाऱ्या विमानाचा एअर इंडिया इंटरनॅशनलशी संबंध काय?"



"समजा, ते विमान आधी आलं तरी दोन तास उशीर लागणार का?"

"आणि त्या विमानाला यायला चार तास उशीर होणार असला तर मग हे विमान दोन तास उशिरा सुटणार की चार तास?"

"परवा एक रात्रीचं विमान पहाटे सुटलं म्हणे! खरं का?"

"टोकियोच्या विमानाचं नक्की का?"

"मी आता विमानतळावर आमचा एक मित्र आहे तिथल्या हॉटेलमध्ये त्याला फोन केला. तो म्हणतो ह्याच विमानाच्या यंत्रात काही बिघाड झाला आहे."

"—म्हणजे हे विमान कदाचित रद्दी करतील का हो?"

" दुसरं विमान आहे का? ऑल इंडिया रेडिओकडे किती विमानं आहेत?"

" ऑल इंडिया रेडिओ नाही—एअर इंडिया—"

"—म्हणजे तेच हो!"

" पण यंत्रात बिघाड म्हणजे भीती वाटते बाई!"

" विमा उतरला ना हो?"

" पाच वर्षांपूर्वी कैरोला विमान कोसळलं त्यात आमच्या हेड क्लार्कचा पुतण्या होता. बायकोला दोन लाख रुपये मिळाले!"

" विमानतळावर विमा उतरता येतो म्हणे!"

शेवटी विमान आणि विमा या रुळावर गाडी आली तेव्हा घरातील वडील मंडळी घाबरी झाली. ह्या सगळ्या हलकल्लोळातून सोडवायला मला विमान यावेसे वाटत होते ते तुकारामबुवांना आलेले! ते त्यानंतर फार वर्षांत महाराष्ट्रात आले नाही!

" पण इथे घरात दोन तास बसून काढायचे ते विमानतळावर काढू या! समजा, विमान आधी दुरुस्त होऊन आधी सुटले तर वाटेत गाठता येणार नाही. विमान म्हणजे काही पंढरपूरला जाणारी बार्शी लाईट नव्हे! खी: खी: खी:!"

शेवटी आजवरच्या परंपरेला अनुसरून लंडनला जायला निघतानाही विमानतळावर रात्री दीड वाजता निघणारे विमान चुकू नये म्हणून आम्ही साडेनऊ वाजता जाऊन हजर झालो. आमच्या बऱ्याचशा मित्रांना विमानाला उशीर होणार ही कल्पना नव्हती, की माझी प्रवासातली सावधानता ठाऊक होती कोण जाणे, पण तेही माझ्याचसारखे साडेनऊ वाजता हजर होते. इथे मात्र माझ्या साऱ्या मित्रांनी माझी बरीचशी पंचाईत केली. हारांचा आणि फुलांचा इतका वर्षाव केला की विमानतळावरील बऱ्याच अधिकारी मंडळींचा गैरसमज झाला. त्या क्षणापूर्वी कधीही न झालेली एक जाणीव मनात निर्माण झाली. 'दोस्त' ही माझ्या आयुष्यातील अपूर्व कमाई आहे. दोस्तीच्या हिशेबात मी कदाचित बिर्लापेक्षाही श्रीमंत असेन! अनेक थरांत मला मित्र मिळाले. विमानतळावर

ह्या मित्रांनी माझी दुर्दशा केली ! इतक्या अवेळी वाट वाकडी करून माणसे विमानतळावर आली होती. एक तर ह्या सुटाने मी निम्मा अर्धमेला झालो होतो. माझे हे ध्यान कुणी पहावे असे मला मुळीच वाटत नव्हते. माझ्या आयुष्यात कधी मी इतका नटलो नव्हतो. सभासमारंभांतल्या त्या हारतुऱ्यांच्या बाबतीत मी कोडगा झालो आहे. परंतु माझ्या सन्मित्रांनी इतक्या 'सुंदर फुलांस देऊन' मला जो निरोप दिला त्यामुळे मी आतल्या आत गलबलो होतो. विमान सुटायला होणारा उशीर मला आता क्षणाक्षणाला जाणवू लागला. लोकांच्या सद्भावनांचेदेखील ओझे होते. उपचार म्हणून निरोप वगैरे द्यायला जाणे वेगळे आणि अशा अवेळी इतक्या दूर विमानतळावर येणे निराळे. मला खरोखरीच कोणाशी काय बोलावे ते सुचेना. एक तर मी कोणताही पराक्रम केला नव्हता ! एखादे वेळी नाटकातले काम रंगले आणि मंडळींनी अभिनंदन केले तर ते स्वीकारतानाही धन्यता वाटते — आपण त्यांना काही तरी दिलेले असते. इथे तसा काहीच संबंध नव्हता. ज्या विमानतळावरून हल्ली रोज असंख्य प्रवासी चारी दिशांना जातात त्यातूनच मी आणि माझी पत्नी — आम्ही निघालो होतो. आणि आमच्या सर्व स्वकीयांनी तिथे एवढी गर्दी केली की मी अक्षरशः गुदमरून गेलो. इतक्या लोकांच्या शुभेच्छा पाठीशी असताना चारी यंत्रे बिघडलेल्या विमानातून मी लंडनलाच काय पण वैकुंठापर्यंत जाऊन परत येईन याचा मला विश्वास वाटायला लागला.

माझ्या भोवतालची ही गर्दी पाहून की काय कोण जाणे, परंतु बरेचसे फोटोग्राफर आमचे फोटो घेत होते. ह्या सगळ्या गडबडीत कुणी तरी जाऊन माझ्यासाठी व्ही. आय. पी.-ची खोली उघडायला लावली. गणवेषातल्या एका अधिकाऱ्याने मला नम्रपणे व्ही. आय. पी.च्या खोलीत चलण्याविषयी विनंती केली — आणि आमचे गबाळ त्या दिशेला निघाले ! परिवाराच्या चेहऱ्यावर ज्याच्यासाठी आपण एवढे जागरण केले तो व्ही. आय. पी. निघाला याचे समाधान फुलले. माझ्या डोळ्यांपुढे 'अंमलदार' नाटकातला प्रसंग आला. तसली काही भानगड असली आणि खरा व्ही. आय. पी. आला असता म्हणजे भलताच प्रसंग

ओढवला असता. 'इंग्लंड रिटर्न्ड' नावाच्या मनुष्यविशेषाला सोने चिकटायचे हे ठाऊक होते. परंतु त्या पश्चिम पंढरीच्या वारकऱ्यालाही आधीच टिळा लागतो ही कल्पना नव्हती. मी मनातून जरा हैराणच झालो. व्ही. आय. पी.-साठी खास राखून ठेवलेल्या त्या खोलीने असली गर्दी कधीच पाहिली नसेल. आमचे पुतणेभाचे वगैरे मंडळींनी पाच मिनिटांतच त्या झकपकीत खोलीला खांडक्याच्या चाळीची कळा आणली. तेवढ्यात दारावरच्या एका खाकीवाल्याने दुसऱ्या खाकीवाल्याला "आज-काल कोण वाटेल ते व्हायपी व्हायला लागले आहेत" हे सांगितलेले मी ऐकले आणि दुसराही "होगा कोई मिनिष्टरका बच्चा नही तो जमाई!" असा शेरा मारून गेला. मी शक्य तितका व्ही. आय. पी. दिसण्याचा प्रयत्न करीत होतो. काही पागणाऱ्या स्नेह्यांना चेहरा मोकळा ठेवून नमस्कार करणे — लहान मुलांना हार वाटणे वगैरे आठवतील त्या सगळ्या व्ही. आय. पी.-लीला मी करून पाहिल्या. विमान काही हलू इच्छीत नव्हते, त्याचा फायदा घेऊन फोटोग्राफर मंडळींनी तेवढ्यात क्राचा धुऊन आमचे फोटो आणले. आणि ज्या मुंबई शहरात 'रुपयात आठ फोटो' (मनपसंत पोजमधील) मिळतात, तिथे मला केवळ व्ही. आय. पी. खोलीमुळे अवाच्या सवा किंमत टिचवावी लागली. एकूण पन्नासएक रुपयांची फोटोखरेदी झाली आणि खरा फोटो काढण्या-सारखा चेहरा तेव्हा झाला. ते फोटो पुढे कुठे गेले कोण-जाणे!

काही वेळाने कस्टम तपासणी सुरू झाल्याची आवई उठली आणि मी ती व्ही. आय. पी. कोठडी सोडली. जाताना दारावरच्या खाकीवाल्यांना चांगली दोनतीन रुपये टिप टिचली. आणि त्यांच्या चेहऱ्यावरचे आश्चर्य पाहून लगेच ओळखले की खरे व्ही. आय. पी. असले काही देत नाहीत. त्यांनी द्यायच्या दोनच गोष्टी — आश्वासने किंवा दमदाटी!

त्या खोलीकडे एकदाही मागे वळून न पाहता तडक वजनाच्या काँट्यापुढे जाऊन उभा राहिलो. प्रथम काट्यावर सामान चढले. ते प्रत्येकी चव्वेचाळीस पौंडांहून थोडे कमीच भरल्यावर पहिला सुटकेचा निःश्वास टाकला. माझ्या पत्नीला मात्र 'थोडे पापड बरोबर घेतले असते

तरी चालू शकले असते ' या विचाराने खंत वाटल्याचे मला जाणवले. पण मी तिच्याकडे दुर्लक्ष केले आणि अपराध्यासारखा चेहरा करून कस्टमच्या अधिकाऱ्यांपुढे उभा राहिलो.

कस्टमच्या अधिकाऱ्यांपुढे उभे राहण्याचा आमच्या आयुष्यातला हा दुसरा प्रसंग! काही वर्षांपूर्वी गोव्याहून परत येताना सातर्ड्याच्या नाक्यावर असेच एकदा कस्टमसाहेबांपुढे आम्ही उभे राहिलो होतो. माझ्या आधी रांग धरून राहिलेल्या मंडळींची कसोशीने तपासणी चालली होती. आम्ही जागच्या जागी उगीचच घाबरलो होतो. वास्तविक त्या सर्व गर्दीत गोव्याहून चार आण्यांचे चॉकलेटदेखील न आणलेली अशी आम्ही दोघेच असू. परंतु ह्या काही चमत्कारिक जागा आहेत. तिथे उगीचच धडधडायला होतं. बरीच माणसे दंतवैद्याच्या खुर्चीला घाबरतात. आजवर मी अनेक वेळा दाताच्या डॉक्टरकडे गेलो असेन. एका दंतवैद्याने तर माझ्या साध्या दाढदुखीची तपासणी ती दाढ अत्यंत आसुरी पद्धतीने उपटून केली होती. मला चित्रगुप्ताचा पट्टेवाला जवळ जवळ दिसला होता. तरीही दुसऱ्या खेपेला ( दुसऱ्या एका ) दंतवैद्याकडे जाताना मी कुलकर्ण्यांच्या हॉटेलात बटाट्याची भजी खायला जावे इतक्या सहजतेने गेलो होतो. परंतु नाही त्या ठिकाणी मला धडधडते हे खरे!

माझ्या अकारण वैऱ्यांच्या यादीत भलतेच लोक आहेत. लिफ्टमन ह्या इसमाचे मला उगीचच भय वाटते. लिफ्टचे कधीच वाटले नाही. किंबहुना लिफ्ट चालवताना मला कधीच भीती वाटत नाही. परंतु निदान मुंबईतल्या तरी बहुतेक लिफ्टवाल्यांचे ते थंडगार चेहरे पाहिले की माझा उत्साह मावळतो—नव्हे, त्यांच्या त्या बर्फाळ चेहऱ्यांकडे पाहण्याचे मला धैर्यच होत नाही. एखाद्याला आपण वरच्या मजल्यावर नेतो म्हणजे बढती देतो अशी या लोकांची समजूत असते की काय कोण जाणे! लिफ्टवाल्याप्रमाणेच मला मोठ्या हॉटेलातल्या वेटर्सचेदेखील भारी भय वाटते. बाजूला तो उभा असला की माझ्या हातून नेमका चहा सांडतो. मला मास्तरांची कधीच भीती वाटली नाही. मास्तरणींना

मी भितो आणि डॉक्टर्सच्या तर माझे ऑपरेशन चालू असताना मी गळ्यात गळा घालून गाणे म्हणेन, पण नर्सला बिल देताना देखील माझा हात थरथरतो ! अशा या भलभलत्या वेळी माझे ऊर का धपापते कोण जाणे ! मातब्बरांच्या कस्टम ऑफिसरने तर माझा भयंकर अपमान केला होता. माझा नंबर लागल्यावर त्याने माझे नाव विचारले, पत्ता विचारला आणि धंदा विचारला. त्या वेळी मी एका कॉलेजात मराठी साहित्याविषयी द्वेष निर्माण करण्याच्या कामावर होतो ! मी प्रोफेसर आहे—आणि मराठीचा, एवढे ऐकल्यावर 'प्रोफेसर ? जा — जा — अगदी दिल्या घरी तू सुखी रहा' असा चेहरा करून ट्रंकदेखील न उघडता मला त्याने जायला सांगितले ! दारू, सोने, सिगरेटी ह्यांपैकी काहीही चोरून आणणे अशक्य — नव्हे मला परवडणार नाही अशा थाटात त्याने माझी 'गरीब बिचारा माधुकरी' म्हणून केलेली बोळवण मी कधीही विसरणार नाही. त्यापेक्षा त्याने माझी कसून दोन तास तपासणी केली असती तरी मला काही वाटले नसते.



आता हा विलायतेच्या वाटेवरला कस्टमसाहेब काय करतो ते पाहू म्हणून मी त्याच्यापुढे उभा राहिलो. त्यानेही माझ्या बॅगा पाहिल्या — एकदा मान वर करून माझ्या तोंडाकडे पाहिले आणि बॅगांवरून खडू फिरवला. मी आणि माझी पत्नी त्या खात्यातून निघालो आणि पासपोर्ट तपासणाऱ्या पोलिस अधिकाऱ्यापुढे आलो. आमचे पासपोर्ट दोन वर्षांपूर्वी

काढलेले होते आणि अजून तीन वर्षे तरी त्याना मरण नव्हते. परंतु विमानतळावर मला कुणी तरी हा पासपोर्ट चालणार नाही असे सांगून भेडसावले होते. त्यामुळे आता काय होते कोण जाणे असे म्हणत मी पासपोर्ट दाखवला; आणि त्या अधिकाऱ्याने तो पाहून लगेच परत केला. मला त्या पासपोर्टवरच्या फोटोचे भय होते. परंतु त्या अधिकाऱ्याला त्या फोटोत आणि माझ्यात कुठे तरी साम्य आढळले असावे. त्याने पासपोर्ट लगेच परत दिला आणि शेवटी आरोग्याचे दाखले तपासणाऱ्या साहेबाने आमच्या दंडातून हव्या त्या सुया गेल्याची खात्री करून घेऊन आम्हाला मुक्त केले.

एकदा कस्टमच्या अडसरापलीकडे गेले, की परत माणसात येता येत नाही. त्यामुळे निरोप द्यायला आलेल्या मंडळींची आणि आमची फारकत झाली. आम्ही एकाएकी ' निराळे ' झालो. परदेशात पाठवायला लायक असा शेरा आम्हांला मिळाला आणि आता फक्त विमान केव्हा सुटते याची वाट पाहत आम्ही बसलो. मध्यरात्र उलटून चालली होती. सांताक्रूझच्या विमानतळावरील ती कस्टम कचेरी अद्ययावत पद्धतीने सजवलेली आहे. उतारूंनी बसण्याचे कोचही अत्यंत आरामशीर आहेत. परंतु आम्ही दोघेही तिथे अवघडून बसलो होतो. आमच्या समोरच एक युरोपियन जोडपे बसले होते. हिंदी चलनाचा त्यांच्या डोक्यात गोंधळ झाला होता. रुपयांच्या नोटा, नये पैसे आणि चवल्या पावल्या यांचा मेळ जमत नव्हता. शेवटी भारतातून जाताना तरी त्यांच्या मनात काही चांगली आठवण असावी म्हणून मी त्यांना थोड्या आगाऊपणानेच नाण्यांचा हिशेब समजावून सांगण्याचा प्रयत्न केला आणि दोनचार मिनिटांत त्यांच्या मूळ गोंधळात आणखी काही भर घातली. शेवटी माझी सहधर्मचारिणी मदतीला आली आणि ते जोडपे हिंदी चलनाविषयी पुरुषांपेक्षा हिंदी स्त्रियांना अधिक चांगली माहिती आहे असा ग्रह करून आपल्या विमानाच्या वाटेने चालू लागले.

नया पैशांचा हिशेब ही एक मला अजूनही न जमलेली गोष्ट आहे. तीन आण्यांच्या टप्प्यावर एकोणीस नये पैसे झाले की माझ्या गणिताला

कोंब फुटतात. कधी कधी माझ्या हिशेबात रुपयाचे शंभर पैसे बसतात तर कधी काटा एकशे तीन ते साडेसत्त्याण्णवापर्यंत कुठेही झुकतो. आणेल्या आणि नये पैसे यांचे गोत्र जमले तर प्रवर जमत नाहीत आणि दोन्ही जमली तर साडेसात आणे वगैरे आडवळणावर एकनाड येते. दुकानदाराने दिलेली मोड डोळे मिटून खिशात टाकणे हा चलन कळण्याचा सर्वांत सोपा उपाय आहे. त्या परदेशी जोडप्याशी आर्थिक वाटाघाटी करण्यात पाचदहा मिनिटे गेली. त्यानंतर आमच्या सोबतीला कुणी मराठी मंडळी आहेत की काय ते पाहावे असा एक कोता प्रांतीय विचार आला आणि पाटील नावाचे गृहस्थ भेटले, जोशी नावाचे विद्यार्थी भेटले. मी देशपांडे होतोच. उणीव फक्त कुलकर्ण्यांची होती. म्हणजे देशपांडे-जोशी-पाटील आणि कुलकर्णी असे भारतीय ग्रामव्यवस्थेचे चार खांब जमले असते. पण त्या दिवशीच्या विमानावर कुलकर्णी नव्हते ही उणीव नाडकर्णी नावाच्या पायलटने कैरोनंतर भरून काढली. किंबहुना नाडकर्णी हे कुलकर्ण्यांचेच दक्षिण कानडा जिल्ह्यातील रूप आहे; तेव्हा एका अर्थी संच जमला.

एकच्या सुमाराला कुठल्याशा विमानाचे पंख फडफडले आणि आमच्या मांडवात गर्दी उसळली. प्रत्येकजण त्या दिशेने जाऊ लागला म्हणून आम्ही उठलो आणि महाजनांचा पंथ धरला. कठड्यापलीकडे आप्त-स्वकीयांची दाटी होती. वृद्धांच्या डोळ्यांत अश्रू होते आणि मित्रमंडळी आमच्या खात्यावर नवेजुने विनोद खपवीत होती. विमानाजवळ पोचल्या-वर हेच आमचे विमान याची खात्री करून घेतली. हो, नाहीतर पहाटे कैरोला उतरण्याऐवजी कोचीनला उतरावयाचे ! अनेक वर्षांपूर्वी कोल्हा-पूरला जायला निघालो असता रात्रभर पुण्याच्या यार्डापर्यंत प्रवास केलेल्या डब्यात झोपून राहिल्याची एक कटू आठवण झाल्याशिवाय राहिली नाही. मैत्रिणीबरोबर सिनेमाला गेल्या दिवशी नेमक्या एखाद्या खवट नातलगाला तोच सिनेमा पाहण्याची त्याच वेळी हुक्की येते तसा हा फजितीच्या प्रसंगाचा प्रकार आहे. आठवणींच्या अडगळीतून असल्या आठवणीची गंजलेली टाचणी केव्हा बोचेल हे सांगणे अवघड आहे.

विमानाच्या प्रवेशद्वाराशी ' यजमानीणबाई ' उभ्या होत्याच. काळ्या-निळ्या विजारी, पांढरेशुभ्र शर्ट आणि निळ्या टोप्या घातलेले, अंगा-खांद्यांवर पंखांच्या मुद्रा लावलेले आणि तसल्याच ढंगाच्या मिश्या ठेवलेले हवाई कर्मचारी चपळतेने इकडून तिकडे जात होते. विमानतळावर दिव्यांची रोषणाई होती. आम्ही त्या गोल काचेच्या खिडक्यांतून त्या मध्यरात्री आम्हांला निरोप द्यायला आलेली मंडळी कुठे दिसतात की काय ते पाहण्याचा प्रयत्न करीत होतो. विमानात बसल्यावर आता आपण बहुतेक इंग्लंडला जाणार असा अर्धवट निःश्वास टाकला आणि पोटावर पट्टा बांधला. एक एक पंखा फिरू लागला—आणि विमानाने गती घेतली. सुमारे मैल, दोन मैल जमिनीवरून धावून विमानतळाच्या दुसऱ्या टोकाला जाऊन विमान थांबले. विमान थांबल्यावर मनात अनेक विचारांची गर्दी उसळली. यांत्रिक बिघाडामुळे त्या विमानाला उशीर झाला होता. दुरुस्ती झाली होती की व्हायची होती हा अंदाज नव्हता. जुन्या सर्व्हिस मोटारीत पाशिंजर कोंबून त्यांना चांगले शिजवायला घालून मग मोटारीचा जबडा उघडणाऱ्या ड्रायव्हरची आणि त्याच्या म्हमद्याची आठवण येणे अपरिहार्य होते.



परंतु तसे काही झाले नाही. विमानाने एकदम गती घेतली आणि एखाद्या चित्रपटासारखा तो झगझगता विमानतळ डोळ्यांपुढून सरकला आणि—आमच्या ' झाशी की रानी 'ने त्या प्रचंड झगझगाटातून वरच्या अनंत आणि अंधाऱ्या अवकाशात झेप घेतली. हा हा म्हणता मुंबई एखाद्या रत्नजडित अलंकारासारखी चमकू लागली. त्या अलंकाराखाली चाळीस लाखांची वस्ती मध्यरात्रीची स्वप्ने मिटल्या डोळ्यांनी पाहत होती. माझे वृद्ध श्वशुर आणि आई आनंदाने भिजलेल्या डोळ्यांनी घरी परतत होती

आणि उघड्या डोळ्यांनी मी परदेशाला जाण्याचे माझे स्वप्न साकार झाल्याचे पाहत होतो. सोबत माझी सहचारिणी होती. आम्ही दोघांनीही गेली बारा वर्षे अनेक किल्ले हवेत बांधले होते. जमिनीवर वाडा बांधायचा विचार आमच्या मनात कधी आला नाही. किंबहुना आमचे घरकूल दोनअडीच वर्षांवर एका जागी फारसे कधी राहिले नाही. दत्ताने केलेले गुरू आणि मी केलेल्या नोकऱ्या ह्यांत फारसा फरक नाही. त्यामुळे दत्तमहाराजांप्रमाणे आमचाही वास अनेक क्षेत्री झाला. चारपाच महिन्यां-पुरते आम्ही इंग्लंडला बिऱ्हाड थाटणार होतो—आणि त्याप्रमाणे थाटलेही.

बराच वेळ विमानात झोप येत नव्हती. बाहेर अंधारगुडूप होता. विमान भरगच्च भरलेले होते. सराईत मंडळी केव्हाच झोपली होती. यजमानीणबाई जपानी होत्या. (कदाचित चिनी असतील.) अत्यंत तत्परतेने हातातील तबकातल्या लवंगा, वेलदोडे, पेपरमिंट वगैरे प्रवाशां-पुढे आणीत होत्या. चेहऱ्यावर अभ्यासक्रमात शिकवलेले हास्य होते. चालण्यात चपळाई होती आणि बोलण्यात वाऱ्यावरच्या पानांची सळसळ होती. विमानात प्रचंड उकडत होते. माझ्या अंगावरचा सूट मला चिलखतासारखा वाटू लागला. इतक्यात माझे लक्ष समोरच्या एका गोऱ्या प्रवाशाकडे गेले आणि मी थक्क झालो. मी त्याच्या देशाला जाण्यासाठी नखशिखान्त पाश्चात्त्य पोशाखात गुंडाळून घेतले होते—आणि हा पठ्ठ्या अक्षरश: बटाट्याच्या चाळीतल्या कोचरेकर मास्तरासारखा§ अर्ध्या—नव्हे, चतकोर खाकी विजारीत शरीराचा (उभ्या नकाशाच्या हिशेबात) दक्षिण भाग कोंबून उत्तर भागात पंचवीसएक खिसे असलेला एक शर्ट, वर एखाद्या गुरख्याने विणलेला स्वेटर आणि डोक्यावर केवळ पेट्रोल गाळण्याच्या लायकीची फेल्ट हॅट (तिला एक पाडगावकरांच्या कवितेत येते तसले 'पीस'ही लटकावले होते!) घालून, चष्म्याची एक काडी डोक्यावर व दुसरी डाव्या कानावर अशा अवतारात बसला होता. त्या

§ पहा: 'बटाट्याची चाळ'. लेखक: पु. ल. देशपांडे, 'भ्रमण मंडळ', मौज प्रकाशन. 'एका श्रेष्ठ विनोदकाराने केलेले मावळत्या संस्कृतीचे हृद्य चित्रण...' इत्यादी! मिळण्याचे स्थळ – कुठेही आणि कदाचित केव्हाही.

निमित्ताने माझ्या आसपासचे सर्व गोरे प्रवासी पाहिले. माझ्याइतका जावईपोषाख केलेला त्या मंडळीत एकही नव्हता. माझा नवखेपणा माझ्या नव्याकोऱ्या सुटामुळे मला अधिकच जाणवू लागला. तेवढ्यात ती जपानी यजमानीण माझ्यापुढे एका थाळीत भिजविलेले टॉवेल घेऊन आली! रात्री दोनच्या सुमाराला त्या भिजवलेल्या टॉवेलांचे प्रयोजन मला कळेना. परंतु समोर वाढून आलेले ताट परतवायचे नाही म्हणून मी एक टॉवेल उचलून पाहिला. माझी समजूत त्याच्याखाली काही असेल. परंतु नाही! माझी पत्नी थकून झोपली होती. मी बरा त्या बाईला जागा सापडलो. मी टॉवेल घेतला आणि तिची अधिक प्रेक्षणीय पाठ फिरल्यावर आजूबाजूला पाहिले. शेजारचा माणूस त्या टॉवेलाची घडी तोंडावर ठेवून हलक्या हाताने पुसत होता. मीही ती घडी तोंडावर ठेवली. कोलन वॉटरच्या घडीचा त्यापूर्वी तापाखेरीज कधीच संबंध आला नव्हता. परंतु उकाड्यावरदेखील तो एक बऱ्यापैकी इलाज आहे हे पृथ्वीवरून सुमारे पंधरा हजार फूट उंच गेल्यावर मला कळले. प्रवासाने मनुजा चातुर्य येते म्हणतात ते असे!

आमचे ते प्रचंड विमान त्या महान अंधारात देशोदेशींच्या डोंगरांच्या आणि समुद्रांच्या माथ्यांवरून वाट काढीत होते. भूगोलाच्या प्रश्नपत्रिकेतले माझे सारे शत्रू त्या अंधाराखाली चेपले गेले होते. आता अधूनमधून डुलकी येत होती. इतर प्रवासी अधिक सराईत असल्यामुळे की काय कोण जाणे, परंतु गाढ झोपी गेले होते. माझ्या पलीकडला तो गोरा कोचरेकर मास्तर तर विमानाच्या इंजिनाच्या स्वराशी सुसंवादी स्वर काढून चांगला तोंड उघडे टाकून षड्जगंधार भावात घोरत होता. इंग्रज लोकदेखील तोंड उघडे टाकून घोरतात हे पाहून मला जरा बरे वाटले. परदेशाच्या प्रवासात माझ्या मनात ती एक भीती होती. कारण मी थोडासा 'त्यातला' आहे. परंतु माझ्या आयुष्यात मी काही चांगले वरच्या पट्टीचे घोरणारे पाहिले आहेत. निर्मळ मनाचा माणूस अधिक घोरतो असे माझी आजी म्हणत असे. किरट्या स्वभावाची माणसे घोरत नसावी. मोठ्या देहाचा मोठ्या मनाशी संबंध आहे की नाही कोण

जाणे— असायला हरकत नाही. 'औदार्य' हे 'उदारा'प्रमाणे 'उदरा'चेही भाववाचक व्हावे! दुसऱ्या प्रकारच्या औदार्याचा मात्र घोरण्याशी संबंध असावा. कारण तुंदोदर मंडळी हमखास घोरतात. आणि तंबोऱ्याच्या भोपळ्याच्या विस्ताराचा जो खर्जाशी संबंध असतो तोच अशा महाकायांचा घोरण्याच्या स्वराशी असतो. विमानात पडल्या पडल्या मी 'घोरणे' ह्या विषयाचा विचार करीत होतो हे मला निश्चित स्मरते. परंतु ही विचारांची रेषा कृतीत केव्हा मिसळली गेली हे काही आठवत नाही. कारण मी जागा झालो त्या वेळी बाहेर उजाडत होते. कुठल्या तरी वाळवंटावरून आमचे विमान चालले होते. माझ्या आयुष्यातली ती एक निराळीच पहाट होती. मी आदल्या रात्री आयुष्यभर पुरेल इतका अंधार— नव्हे, जणू काय अंधाराचा गाभा पाहिला होता. हा उष:काल पाहताना रात्रीच्या गर्भातून निघालेल्या उष:कालाची मला आठवण झाली. माझ्या खिडकीतून खालच्या जगावर कांचनाचे स्वप्न फुलताना मला दिसत होते. माझ्या नेहमीच्या आयुष्यात क्वचितच पहाट फुलते. मुंबईतील धकाधकी रात्री एक एक वाजेपर्यंत आवरत नाही आणि त्या मुंबईत गिरणोदय होतो त्या वेळी पहाट माझ्या जागे होण्याची वाट पाहून दुसऱ्या दिशेला निघून गेलेली असते.

आमची ती जपानी एअर होस्टेस पुन्हा 'प्रफुल्ल होओनि सुपुष्प ठेल्या'—सारखी लोकांच्या पुढे 'शय्या पेय' आणून देत होती. हे सकाळचे पेयप्राशन मला कधीही जमले नाही! मी अत्यंत गंभीरपणाने तो चहा नाकारला आणि प्रसाधनगृहाच्या दिशेने वाट काढली. विमानातही वर्गविग्रह असतो. मी आपला मुशाफिर दर्जाचा प्रवासी; कुणाचाही निद्राभंग न होईल अशा बेताने जाऊन दार उघडले ते वाहकाच्या कोटराचे! तिकडील मंडळींना माझ्या चेहऱ्यावरील करुण भाव कळला असावा. त्यातील एका सज्जनाने मला न बोलता न सांगता इष्ट स्थळ दाखवले. मुखप्रक्षाळणादी विधी आटपून मी माझ्या जागी पोचेपर्यंत दारावरच्या विजेरी पाटीवर 'पोटाला पट्टे आवळा' अशी सूचना मिळाली आणि मला पट्टा सापडेपर्यंत विमान धडाक्याने जमिनीच्या दिशेने जाऊ लागले. मी

खाली पाहिले. एका वाळवंटवजा बेटाच्या दिशेने विमान उतरत होते. विमानाचा पहिला 'हॉल्ट' कैरोला होता. मी आजूबाजूला एखादा पिरामिड दिसतो की काय ते पाहू लागलो. एका उंचवट्याकडे बोट दाखवून बहुधा तो पिरामिड असावा असे मी माझ्या पत्नीला सुचवीपर्यंत विमान जमिनीला लागले आणि विमानतळावर हा हा म्हणता थांबले.

कैरोसारख्या प्रसिद्ध शहराचा विमानतळ हा अगदीच येष्टीच्या थ्यांडासारखा असावा याचे मला दुःख झाले, पण विमानातून बाहेर पडल्यावर आमचे पाय कैरोला लागले नसून बेहरीन नावाच्या बेटाला लागल्याचे कळले. कोलंबसाला आपले पाय हिंदुस्थानला लागले असे वाटले होते; पुढे ती अमेरिका आहे हे कळल्यावर त्याला जे वाटले असेल तशासारखेच मलाही वाटले! एक तर 'बेहरीन' हे प्रकरण कुठे आहे ह्याचा पत्ता नव्हता. शेवटी तिथे सकाळचा चहा मिळतो हे कळल्यावर उपाहारगृहाच्या दिशेने आम्ही गेलो. दूरवर तेलाच्या खाणी असल्याचे कळले आणि बेहरीन हे लहानसे बेट तेलाच्या खाणीविषयी प्रसिद्ध आहे. याउपर या बेटाविषयी काहीही कळले नाही. आम्ही उपाहारगृहात चहाची वाट पाहत बसलो. विमानात तेल भरले जात होते. बऱ्याच प्रतीक्षेनंतर चहा आला. त्याच्या चवीवरून या बेटावर खजुरीची पाने वाळवून चहा करीत असावे अशी शंका आली आणि दूध उंटणीचे असावे याची तर खात्रीच पटली! मी आजवर तो मॉंजिनीतला हुकलेला चहा सोडून अनेक जातींचा चहा प्यालो आहे. कोकणी बंदरातल्या टावराणात मिळणारा चहा, नर्मदेपलीकडे मातीच्या भांड्यातून मिळणारा चहा, पितळी कपबशीतला मद्रासी नमुना, उकळत्या दुधातील मसालानी चाय, रेल्वे स्टेशनचा चहाऐवजी कोळशाची भुकटी मिसळलेला चहा, बिनदुधाचा चहा, बिनसाखरेचा चहा, आणि जुईच्या कळ्यांचा चिनी चहा. परंतु बेहरीनच्या विमानतळावरील चहा मी जन्मात विसरणार नाही. मंजिष्ठेचा काढादेखील त्यानंतर मी चवीने प्यालो असतो. ह्या चहापानातला एकच आनंदाचा भाग म्हणजे हा चहा आम्हाला फुकट मिळाला. 'वाटेत विमान जिथे जिथे थांबते तिथला चहा विमान कंपनी प्रवाशांना

स्वखर्चाने देते ' हे ज्ञान होण्यासाठी बेहरीनच्या त्या चहाची आम्हाला फी भरावी लागली.

अर्धापाऊण तासाच्या विश्रांतीनंतर प्रवासी मंडळी विमानाच्या पोटात पुन्हा शिरली आणि त्या गरुडाचे पंख पुन्हा फडफडू लागले. यापुढला कैरोपर्यंतचा प्रवास म्हणजे एका वाळवंटातून दुसऱ्या वाळवंटात चालला होता. मधून मधून दृश्यपालट म्हणून एखाद्या समुद्राची पट्टी दिसे. एरवी औषधालाही कुठे हिरवा रंग दिसत नव्हता. ह्या वाळवंटातून इस्लामची हिरवी पताका का फडफडली ते आता कळले. पैगंबराने आपल्या निशाणाचा रंग हिरवा ठेवण्यात कमालीची चतुराई दाखविली. ह्या वाळवंटातले लाखो अरब त्या हिरव्यामागून का गेले हे त्या वाळवंटावरून उडत जाताना चटकन उमगते. महंमदाच्या कुराणाइतकेच, किंबहुना अधिक ते हिरवे निशाण आकर्षक आहे. रात्रीच्या वेळी, त्या महान वालुकासागरावर दिसणारा तो चंद्र आणि दिवसाच्या रखरखाटात डोळ्यांना विसावा देणारा तो हिरवा रंग यांची सांगड घालून महंमदाने त्याच्या डोळ्यांचे पारणे इस्लामच्या निशाणावर फेडले आहे. सकाळचे साडेआठ-पावणेनऊ वाजले असावेत. मी वाळवंटात एखादा उंटांचा तांडा दिसतो की काय ते पाहत होतो.



त्या रखरखाटात आपला काफिला घेऊन जाणारा उंटावरचा शहाणा अर्थातच निघाला नाही. वाळवंटातला प्रवास बहुधा नक्षत्रांच्याच सोबतीने होत असावा. वाळवंटात अधूनमधून कोरड्या नद्या आढळत होत्या. कदाचित काफिल्यांचे ते मार्ग असावेत.

दिवस वर येत होता आणि विमानातून खाली पाहणे अशक्य होऊ लागले होते. इतक्यात त्या वाळवंटाच्या मधून निघून आमचे विमान

समुद्राच्या विस्तारावरून जाऊ लागले. मी मनातल्या मनात त्या समुद्राला तांबडा समुद्र, कास्पियन समुद्र, काळा समुद्र, भूमध्य समुद्र अशी सगळी नावे ठेवून घेतली. काही वेळाने कुणी तरी आमचे विमान सुवेज कालव्यावरून जात असल्याची हूल उठवली. आणि प्रत्येकाने आपापल्या मगदुराप्रमाणे कुठला तरी एक पाण्याचा पट्टा डोळ्यांपुढे ठेवून तो सुवेज कालवा असल्याची समजूत करून घेतली. सारेच पाण्याचे पट्टे फर्ग्युसन कॉलेजच्या कॅनॉलएवढे दिसत होते. एका कालव्यात मात्र बोटी मीही पाहिल्या आणि तो सुवेज कालवा आहे अशी गुप्तपणे खूणगाठ बांधून घेतली. हाच तो सुवेज कालवा! ह्याच्यावरून जागतिक युद्ध पेटणार होते. विमानाच्या त्या अफाट उंचीवरून करंगळीच्या रुंदीचा दिसणारा तो पाण्याचा एक ओघळ हा निम्म्या जगाला उद्ध्वस्त करणार होता आणि उरलेल्या निम्म्या जगाला असंख्य व्याधींनी पोखरून टाकणार होता. एखाद्या माथेफिरूच्या डोक्यात जर नव्या पर्जन्यास्त्राची किंवा वाय्वस्त्राची कळ फिरविण्याची लहर आलीच तर त्या करंगळीभर सुवेजच्याच भोवती काय पण साऱ्या जगाचे वाळवंट झाले असते. आणि ह्या प्रळयातून वाचलेल्या एखाद्या नखाएवढ्या तृणपात्यातून पुन्हा नव्या सृजनाची सुरुवात झाली असती.

खाली आकाश आणि वर आकाश अशा अवस्थेत विमानातून ढगांच्याहीवरून जात असताना जीवनासंबंधी विचार करण्याच्या दृष्टि-कोणात इच्छा असली नसली तरी फरक होतो! विमानात विमान कोसळण्याची भीती वाटतच नाही. जिथून महासागर हे बशीभर पाण्याएवढे दिसतात तिथे स्वतःचे जीवित ही अत्यंत नगण्य गोष्ट वाटायला लागते. ज्या वाळवंटाच्या माथ्यावरून आम्ही कैरोच्या दिशेला निघालो होतो त्याच्या आसपास बाबिलोनियन, सुमेरियन आणि असीरियन संस्कृतींचे बगीचे फुलले होते! अलेक्झांड्रियाच्या ग्रंथशाळेतील ग्रंथ म्हणे लाखांच्या संख्येने जाळले गेले होते. कुठल्या तरी बड्या चौघांची किंवा पाचांची त्या वेळीही एक परिषद भरली असेल आणि ते भांडार भस्मसात केले गेले असेल. शेवटी महान आकाशाचे, महान समुद्राचे आणि महान

मरुभूमीचे दर्शनही ह्या ढगांवरून विमान जाताना होणाऱ्या महान अवकाशाच्या दर्शनाने थिटे वाटू लागते. आणि हा सगळा करिष्मा काय आहे हा प्रश्न मनाला छळायला लागतो. काही वेळाने आमचे विमान कैरोला जाऊन पोचणार होते. इजिप्त हादेखील भारताइतकाच प्राचीन देश. परंपरेच्या गाठी शतकाशतकापूर्वी बांधल्या गेल्या. एवढेच काय, शतकाचा हिशेब येशूच्या जीवनाशी जुळण्यापूर्वी इथे असंख्य शतके मोजली गेली आणि येशूच्या जन्मकाळी उगवलेला तो तेजस्वी तारा ह्याच वाळवंटाच्या छतावर त्या कुणी पथिकांनी पाहिला आणि ह्याच भागात यहुद्यांनी, ख्रिस्त्यांनी आणि महंमदीयांनी मानवतेची शिकवण देण्यासाठी आपापली निशाणे मानवी रक्तात भिजवून नाचवली.

विचारदेखील विकारांप्रमाणेच कालांतराने गुंगी आणतात. माझ्या नकळत त्या उंचीवर येऊन झोप पोचली आणि कुणाच्या तरी 'काहिरो' या आवाजाने मला जाग आली. कैरोच्या विमानतळावर मला प्रथम दर्शन झाले ते युद्धासाठीच सज्ज असलेल्या लष्करी विमानांचे! विमानसंहारक तोफांनी आकाशाच्या दिशेने आपली तोंडे वासली होती. नव्या युद्धाचा छोटासा रंगपट इथेही मांडला होता. नाटकाला केव्हा आणि कोण सुरुवात करणार होते ते ती 'समरी विहरत' असणारी माताच जाणे! देशो-देशींचे धैर्यधर रंगून तयार होते. 'धनी मी पति वरिन कशी अधना' म्हणणाऱ्या भामिनीच्या एंट्रीचीच काय ती उणीव होती! 'इजिप्तमध्ये तुमचे हार्दिक स्वागत असो' ही विमानतळावरची पाटी वाचल्यावर मला मनस्वी उकाड्यात गार पाण्याचा फवारा तोंडावर उडाल्यासारखे वाटले. हे स्वागत कोणाही मानवाचे कुठेही का होऊ नये! जोवर पासपोर्ट आणि व्हिसा नावाची माणसावर अविश्वास दाखविणारी शिक्कामोर्तबे जगात सरकारमान्य आहेत तोपर्यंत मानवतेची भाषा तरी कशाला! 'इजिप्तमध्ये तुमचे स्वागत असो!' आमचे? आम्ही कोण, काय, काही ठाऊक नाही अशा सर्वांचे—आमचे स्वागत असो!—हीच पाटी सर्वत्र का जाऊ नये? विमानसंहारक तोफांच्या पलीकडली ती सुंदर पाटी वाचताना मला ह्या विचित्र मनुष्यस्वभावाची खरोखरच मौज

वाटली. इजिप्तच्या विमानतळावरील त्या पाटीने माझ्या मनात विचारांचा कल्लोळ उठवला. तिथल्या उपाहारगृहातील परिचारिकांनी




अत्यंत आदबीने आमचे स्वागत केले आणि उत्तम इजिप्शियन कॉफी दिली. मुंबईच्या विमानतळाच्या मानाने कैरोचा विमानतळ फारच लहान असावा. सभोवती नवीन बांधणी चालू होती. इजिप्तचा नवा इतिहास घडतो आहे. हा नवा राष्ट्रपुरुष कोणते स्वरूप धारण करणार याकडे साऱ्यांचे डोळे लागले आहेत. कैरोच्या विमानतळावरील हॉटेलात बसलो असताना प्रथम मला 'इजिप्शियन' नावाच्या मनुष्यप्राण्याचे दर्शन झाले. मुंबईत इजिप्शियन लोक असतील. परंतु हेच ते हे कळणे अशक्य आहे, कारण आपल्या व त्यांच्या दिसण्यात ठळक फरक काहीच नाही. बाळपणी सक्तीने शिकवलेल्या इतिहासापलीकडे, म्हणजे पिरामिड, ममी आणि नाईल नदी यांवरील दोन मार्कांच्या लायकीची टीप याउप्पर इजिप्तविषयी माझे अज्ञान वाळवंटाइतके अगाध होते. क्लिओपात्रा, जनरल नजीब आणि आता नासर यांपरते दुसरे कुणीही इथे राहत असल्याचे ज्ञान नाही. इथला प्राथमिक शाळामास्तर, वकील आणि मामलेदार कसा दिसतो ते ठाऊक नाही. इथल्या हॉटेलात 'गरम' काय मिळते याचा पत्ता नाही. इथल्या बायका नवऱ्याला नावाने हाका मारतात की इजिप्शियन भाषेतही 'इकडून खजूर आणणं झालं' वगैरे वाक्प्रचार आहेत याचा विचार कधी डोक्याला शिवला नाही. क्षणाक्षणाला अज्ञानाच्या वाळवंटाचा विस्तार वाढताना दिसत होता. त्या हॉटेलमधले

परिचारक बोलू इच्छीत होते – पण त्या फुटा-दोन-फुटांच्या अंतरात एक प्रचंड अदृश्य पडदा उभा होता. आम्ही फक्त जगातल्या मानवांना कळणाऱ्या हास्याच्या भाषेत बोलू लागलो. तो हसत होता आणि आम्ही हसत होतो. ह्या विमानतळावर काम करणाऱ्या मंडळीविषयी मला कुतूहल वाटले. दिवसातून पंचवीस वेळा नाना देशांतले नाना लोक तिथे अर्ध्या पाऊण तासापुरते एकत्र येतात आणि एखादे पेय घेऊन पुन्हा दाही दिशांना पांगतात. सर्वांच्या चेहऱ्यावर तेच कुतूहल—तीच उत्सुकता. आंतरराष्ट्रीय नावयात्रच्या ह्या नव्या पाणपोया आहेत. जुन्या पाणपोयांच्या आश्रयाला येणारे पथिक एवढ्या घाईत नसतील आणि इतक्या दूरदेशातून एकाच क्षणी जमणारे नसतील. दोनशे–चारशे मैलांच्या परिघातले, दोन–चार तास बसून आपल्या देशीची वार्ता सांगणारे, त्यांच्या देशीची ऐकणारे असे होते. आम्ही त्या उपाहारगृहात भुरूभुरू आलो आणि भुरूभुरू गेलो. विविध पोशाखांतला, विविध वर्णांचा आणि चेहरे-पट्टयांचा हा थवा त्या उपाहारगृहातून एखाद्या चित्रपटासारखा सरकत असतो.

इजिप्तचा विमानतळ सोडल्यानंतर आमचा दुसरा टप्पा होता स्वित्झर्लंडमधल्या जिनिव्हाचा. आता हळूहळू वाळवंटाची सोबत संपली आणि आम्ही इटलीच्या माथ्यावरून झेप घेतली. इजिप्तची भूमी संपूर्णपणे अज्ञात, तर इटलीची ओळख पुस्तकांच्या पानापानांतून झालेली. रोम, व्हेनिस, नेपल्स ही नावे पुन्हा आठवू लागली. जाता जाता विमान कोसळायचेच असले तर नेपल्सच्या आसपास कोसळावे असे वाटायला लागले. नेपल्स ही शिल्पीजनांची काशी! तिथे जावे, त्या वास्तूंचे भरल्या डोळ्यांनी दर्शन घ्यावे आणि मग डोळे मिटावे! पण तसे काही घडले नाही. नेपल्स आणि व्हेनिस काही दिसले नाही, पण रोमच्या माथ्यावरून मात्र आम्ही त्या पुरातन शहराचे कळस पाहिले आणि समाधान मानून घेतले. गिबनने लिहिलेला रोमन साम्राज्याचा विकास आणि विनाश अजून वाचायचा राहिला आहे हा विचार तेवढ्यात चटका लावून गेला. जगाच्या

डोक्यावरून उडताना शेवटी काय काय वाचले आहे, आणि समजून घेतले आहे यापेक्षा काय काय वाचायचे आणि समजून घ्यायचे राहिले आहे हा विचारच मनाला अधिक अस्वस्थ करतो. तास-दीड-तासात आल्प्स दिसायला लागले आणि विमानाने युरोपचे नंदनवन गाठले. युरोपीय थंडीचा पहिला साक्षात्कार जिनिव्हाच्या विमानतळावर पाय ठेवल्याबरोबरच झाला आणि त्या क्षणी एका प्रचंड रेफ्रिजरेटरमध्ये शिरल्यासारखे जे वाटले ते पुढे सहा महिने वाटत होते! त्या थंडीला गारठा म्हणणे म्हणजे थंडीचा अपमान करण्यासारखे आहे. विमानातून बाहेर पाऊल टाकल्याबरोबर वयाचे घड्याळ वीस वर्षांनी मागे गेले. पुण्याच्या कॉलेजात शिकत असतानाचे दिवस आठवले. अशी एखादी पहाट असायची की जगाच्या अंतापर्यंत धावत सुटावे असे वाटे! त्या हवेत यौवनाला आव्हान असायचे. गारठा म्हातारा असतो. ही थंडी नवयौवना होती. जिनिव्हाच्या विमानतळावरचे विश्रांतिगृह हे आधुनिक फुलांच्या दुकानासारखे दिसत होते. सारे चेहरे कसे ताजेतवाने. प्रत्येकाच्या चालीत नृत्य होते. वय हा घटकच मुळी गैरहजर होता. आणि मग ज्या विशीच्या आसपास होत्या त्यांच्याविषयी काय लिहावे? टेबलावरच्या काचपात्रांत पेये लखलखत होती. इथल्या कॉफीच्या पेल्यांत जर वेहोषी होती तर इतर दैवी पेयांबद्दल काय सांगावे? जिथे जरादेखील आपले सौंदर्य घेऊन येते, तिथल्या यौवनाला आपली लीला करायला आल्प्स ठेंगणा वाटला तर आश्चर्य कोणते!

विमानतळावरची ती पंधरा मिनिटे कधी संपली हे कळले नाही. त्या वातावरणातल्या सौंदर्याला दिमाख नव्हता — तारुण्याचा ताल सुटला नव्हता — आणि थंडी आकसून टाकत नव्हती. जीवनाला नकळत नवे दान देऊन जात होती. परत विमानाच्या कुशीत शिरताना स्विज्झर्लंडचा तो तेवढाच परिसर मी डोळे भरून पाहून घेतला. दूरवरच्या सूचिवृक्षांच्या आडोशाला असलेल्या टुमदार घरांत दिवेलागणी होत होती. दूरवरचे पर्वत आकाशात मिसळत होते. आल्प्सच्या दऱ्यांत आता काळोख शिरत असावा. विमान उडाले तेव्हा खाली पाहता पाहता एक चिमुकली नदी

वळणे घेत पळाली आणि एकाएकी ढगांच्या प्रचंड पांघरुणाखाली स्वित्झर्लंड चिडीचूप करून नाहीसे झाले.

पुढला टप्पा जर्मनीतला ड्युसलडॉर्फचा. मुंबई सोडल्याला वीसएक तास होऊन गेले होते. वाटेत घड्याळाच्या काट्यांची बरीच फिरवाफिरवी केली होती. तासातासाने विमानाचा सारथी एक पत्रक पाठवीत होता. त्यात किती हजार फुटांवरून विमान चालले आहे, वारा सुखाने वाहतो आहे की नाही, घड्याळात अमुक इतके वाजवा वगैरे इशारे असत. आसपासचे प्रवासी 'अरे वा! अठरा हजार फूट उंच का?' वगैरे उद्गार काढीत. ढगांच्या पायघड्यांवरून विमान जात असल्यामुळे अठरा हजार काय आणि अठरा लाख काय, मला तरी उंचीतील फरकच कळत नव्हता. विमानातच काय पण जमिनीवरचा उंचीरुंदीचा फरक मला कधी कळला नाही. कोर्टात साक्ष देताना साक्षीदार 'सदर आरोपी हा माझ्यापासून एकोणीस फुटांवर होता' वगैरे सांगताना ऐकून मला त्या साक्षीदाराचे सदैव कौतुक वाटत आले आहे. माझ्या बुटाचे माप, हॅटचे माप, कॉलरचे माप, मोज्याचे माप यांचे इंचदेखील मला स्मरत नाहीत. 'काय सायजची चप्पल काढू साहेब?' ह्या प्रश्नाला आपला पाय अगर जुनी चप्पल दाखविणे हा बाळबोध उपाय आहे. 'दोन नंबर काढा' वगैरे सांगणाऱ्यांविषयी मला आदर आहे. आणि तारखा सांगणाऱ्यांना तर मी गहिवरून मिठीच का मारीत नाही हे मला कळले नाही. 'सत्रा जुलईची गोष्ट आहे...' वगैरे प्रस्तावना करून बोलणाऱ्याची खरोखर मला कमाल वाटते. शिवाजीमहाराज सोळाशे ऐंशीत वारले आणि अठराशे सत्तावनचे बंड अठराशे सत्तावन साली झाले ही ऐतिहासिक तिथी, आणि माझी आणि पराकाष्ठेच्या परिश्रमांनी लक्षात ठेवलेली माझ्या पत्नीची जन्मतारीख याउप्पर कोणतीही तारीख म्हणून माझ्या स्मरणात नाही. वजन, माप, उंची, लांबी, रुंदी ही परिमाणे हे आपले काम नव्हे हे मी केव्हाच ठरवून टाकले आहे. त्यामुळे अठरा हजार फूट उंचीवरून जाणारे आमचे विमान ड्युसलडॉर्फला केव्हा उतरले हे समजायच्या आतच 'आ...झोऽऽ' 'गूऽऽट गूऽऽट'

यांसारखे शब्द कानावर आदळले! जोशी आणि पाटील इथे उतरले आणि मीदेखील आंबलेल्या अंगाने लंडनच्या विमानतळाची वाट पाहू लागलो.

प्रवासात शेवटला टप्पा अति त्रासदायक! पुण्याहून ठाण्यापर्यंतचा प्रवास लोणावळ्यापर्यंतच्या चहात आणि पुढे कर्जत ते ठाणे चिवड्यात हा हा म्हणता संपतो. पण मुलुंड, भांडूप, विक्रोळी वगैरे स्टेशने भारी चिकट! निघता निघत नाहीत. प्रवास लहान असो वा मोठा, आपल्या सहनशक्तीचा 'मीटर' आपण आधीच लावलेला असतो. मुंबई-दिल्ली प्रवासात तो मथुरा स्टेशनपर्यंत असतो तर मुंबई-नागपूर मार्गावर तो वर्ध्याला पडतो. तिथून पुढे जांभया आणि आळोखेपिळोखे. डयुसलडॉर्फ ते लंडन टप्पा असाच त्रासदायक वाटला. आणि शंभरावी जांभई संपता संपता विमानाने जमिनीच्या दिशेने झेप घेतली. एकाएकी लक्ष दीप उजळल्यासारखे वाटले आणि चारपाच जणांच्या तोंडून एकदम उद्गार आला—"आह! लंडन!"





संध्याकाळचे आठ-साडेआठ वाजले होते. पण सरत्या उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळे संधिप्रकाश अजून रेंगाळत होता. विमानातल्या यज-मानीणबाई दाराशी राहून प्रत्येकाचा आपल्या कमावलेल्या हास्यासहित निरोप घेत होत्या. आम्हीही आमच्या परीने येतो म्हणताना स्वरात गद-गदलेपणा आणण्याचा प्रयत्न केला आणि विमानतळाच्या दिशेने निघालेल्या इतर उतारूंच्या मागून जायला सुरुवात केली. एका अधि-काऱ्याने एका बैठ्या घराच्या दिशेने आमची लैन चालविली. या लायनीत मी आणि माझी पत्नी असे दोनच भारतीय उतारू होतो. इथे प्रथम जर कुठल्या एका गोष्टीने माझे लक्ष वेधून घेतले असेल तर लोकांच्या चालण्याच्या गतीने. एकूणच पाश्चात्त्य लोक गाडी गाठायला निघाल्या-सारखे झपाझप चालतात. त्या गतीशी आपली पायमिळवणी करता करता पंधरवडा निघून जातो आणि पुढे पुढे नकळत आपणदेखील त्या घाईत रुळून जातो. हा थंडीचा गुण असावा. माझ्या एका डॉक्टर मित्राने थंडी, जलद चालणे आणि रुधिराभिसरण ह्यांचे वैद्यकीय कोष्टक मला समजावून देण्याचा प्रयत्न केला होता. मी त्या क्षेत्रात फारसे लक्ष देत नाही. रक्ताला कुणी रुधिर म्हटले की त्यापुढे मला एकदम 'शिरच्छेद—धारातीर्थ—बलिदान' वगैरे भारी प्रकृतीचे शब्द आठवतात. तो रौद्र रस हा मला परवडणारा नव्हे !

भाऊच्या धक्क्यावर खांद्यावर 'टरंक नि हातरून-कांबरून' घेऊन उतरलेला वानकोटचा रामा किंवा बोरीबंदरावर गठुळं घेऊन स्वतःलाच शोधीत निघाल्यासारखा दिसणारा 'साताराा-सांगलीकडला' पाव्हना आणि लंडनच्या विमानतळावर उतरलेला मी ह्यांत चाणाक्षाला विलक्षण

साम्य आढळले असते. मात्र लंडनच्या पहिल्या दर्शनाने धक्का दिला. एक तर पावसाची भुरभूर चालू झाली होती. थंडीही होतीच. तसा सर्वत्र शुकशुकाट होता. साता समुद्रावरून आम्ही उड्डाण करून आल्याचे कुणाच्याही चेहऱ्यावर कौतुक नव्हते. महाराष्ट्रातील ख्यातनाम साहित्यिक आणि त्यांच्या सुविद्य पत्नी आल्याची त्या देशात गंधवार्ताही नव्हती. कुठे हार घेतलेली मंडळी दिसतात की काय ते पाहावे म्हणून हळूच ताव-दानाबाहेर मान उंचावून पाहत होतो. पण रस्त्यातदेखील हरताळ असल्यासारखा शुकशुकाट होता. कुणी कुणाशी बोलत नव्हते. आम्हांला त्या खोलीपर्यंत आणून सोडणारा अधिकारी देशी होता आणि त्यामुळे इंग्रजापेक्षाही इंग्रज होऊन मक्ख चेहऱ्याने बोलत होता. हसण्यासारख्या थिल्लर विषयांत त्याला गती नसावी. त्याने आम्हाला पासपोर्ट, कस्टम्स वगैरेच्या दिशा दाखविल्या. पाचदहा मिनिटांत विमानातून आमच्या अठ्या-ऐंशी पौंड वजनाच्या बॅगा कस्टम्स अधिकाऱ्यापुढे आल्या आणि लग्नातल्या पंक्तीत आपापले पान धरतात त्याप्रमाणे आम्ही आमच्या बॅगा धरल्या.

" एनिथिंग टु डिक्लेअर, सर ? " अत्यंत नम्रतेने या कस्टम्स अधि-काऱ्याने आम्हांला विचारले. मी त्याच्या नम्रतेने थोडा गांगरलो. गण-वेशातल्या माणसाने इतक्या नम्रतेने काही विचारलेले ऐकायचा पहिलाच प्रसंग. क्षणात भानावर येऊन मी माझ्या जवळच्या सर्व वस्तूंची यादी दिली. ती देताना माझ्या चेहऱ्यावर कसले भाव प्रगटले होते कुणाला ठाऊक—त्या अधिकाऱ्याने माझ्याकडे अत्यंत सहानुभूतीने पाहून ' वत्सा, तुजप्रत कल्याण असो ' म्हणत आमच्या बॅगांवर खडूची फुली मारली आणि आम्ही तिथून निघालो.

विमानतळ शिरस्त्याप्रमाणे शहरापासून बराच दूर आहे. आमचे सामान परस्पर एका बसमध्ये चढवण्यात आले. ज्या पोर्टरने आमचे सामान चढवले होते तो आमच्याकडे पाहिले न पाहिले करीत उभा होता. त्याला हमाली दिली आणि इंग्रज हमाल " साहेब, पोटावर नका मारू साहेब, पाठीवर मारा " किंवा " पोटाकडे बघून समजून द्या

साहेब" ही वाक्ये इंग्रजीत कशी म्हणतो हे ऐकण्याच्या अपेक्षेने थांबलो, पण तो तसे काही म्हणाला नाही. कदाचित मी त्याच्या एकट्याच्याच काय, बहुधा त्याच्या आळीतल्या सर्वांच्या पोटाचा हिशेब करून त्याच्या हाती पैसे ठेवले असावे.

विमानतळ सोडून बस लंडन शहराच्या दिशेने धावू लागली. नऊचा सुमार झाला असावा. रस्ते संपूर्ण निर्मनुष्य होते. बसमध्येही कोणी बोलत नव्हते. पाऊस भुरभुरत होताच. एकासारख्या एक दिसणाऱ्या घरांच्या दुतर्फा रांगा लागल्या होत्या. सर्वत्र भलतीच भयाण शांतता होती. रहदारीचे दिवे लाल-हिरवे होत होते. बस थांबत होती आणि पळत होती. दुकाने बंद होती. किंचाळून येणारे लाऊड स्पीकरचे सूर नव्हते. पानांची दुकाने नव्हती. कोपऱ्यावर गर्दी नव्हती. सगळा शुकशुकाट होता. राजघराण्यात कुणाचे काही बरेवाईट झाले नाही ना अशी माझ्या भाबड्या मनाला उगीचच शंका येऊन गेली. पण कुणाला विचारणेही शक्य नव्हते. मी हळूच कुटुंबाला कुजबुजलेल्या स्वरात "एवढा शुकशुकाट का?" असे विचारले आणि बाजूच्या चारपाच इंग्रजांनी चमकून कसला एवढा मोठा आवाज झाला अशा थाटात आमच्याकडे पाहिले. त्यामुळे विमानाच्या बसमध्ये स्तब्धता पाळण्या-संबंधी काही सूचना आहे की काय ते पाहू लागलो. मायदेशीचा येष्टीच्या खडखडाटावर आवाज काढून चालणारा पाशिंजरांचा संवाद आठवला.

शहरातल्या विमानउतारू अड्ड्यावर आमची बस आली आणि तिथे नाही तर इथे तरी स्वागतसमितीचे सभासद कुठे दिसताहेत की काय ते मी शोधू लागलो. तसे काही घडले नाही. माझे मित्र रामभाऊ तडकोड उतरून घ्यायला आले होते. त्यांच्याबरोबर माझ्या एका स्नेह्याचा मुलगा त्याच्यासाठी पाठवलेली कसलीशी भेट घ्यायला आला होता. मराठी साहित्याबद्दलची इंग्रजांची अनास्था पाहून मला मनस्वी दुःख झाले. मुंबईत इंग्रजी साहित्यिक आला की आम्ही किती अगत्याने त्याचे स्वागत करून त्याने सांगितलेली प्रत्येक गोष्ट कशी शिरोधार्य मानतो! त्याउलट

इंग्रज साहित्यिक! एकानेही त्या विमानअड्ड्याच्या दिशेने वाट वाकडी केली नाही. इंग्लंडच्या मुक्कामात मी कुठल्याही इंग्रजी साहित्यिकाच्या आमंत्रणाला होकार द्यायचा नाही असे ठरवले. ही कुणकूण बहुधा त्या गोटात लागली असावी. कारण कुठल्याही साहित्यसंस्थेने मला आमंत्रण देण्याचे धारिष्ट दाखवले नाही!

रामभाऊंच्याच घरी पहिल्या दिवशी उतरल्यामुळे अजून लंडनला पोचल्यासारखे वाटत नव्हते. लंडनमध्येही महाराष्ट्र-मंडळ आहे. त्यांच्यात आपापसांत 'तत्त्वासाठी झालेले मतभेद' किंवा सामान्यांच्या भाषेत ज्याला भांडणे म्हणतात ती आहेत, आणि सालाबादप्रमाणे मराठी नाटक बसविण्याचे कार्य चालू आहे ही माहिती पहिल्या सलामीतच मिळाली. 'नाटक' हा मराठी लोकांचा अती आवडीचा विषय. विशेषत: मध्यमवर्गीयांचा. आपल्याइतके नाटक आणि नट ह्यांविषयी तळमळीने बोलणारे भारतातल्या इतर प्रांतांतले फारसे लोक मला भेटले नाहीत. पण ह्या बाबतीत इंग्रजांचे आणि मराठी मंडळींचे जमते. आमचे म्हातारे (आणि काही म्हाताऱ्या) भावड्याच्या, गणपतराव जोशांच्या कथा जशा गहिवरून सांगतात तशा जुन्या नटांच्या गोष्टी अगदी रंगवून सांगणारे इंग्रज अण्णासाहेब–तात्यासाहेबदेखील मला काही दिवसांनी भेटले. ह्या विषयात साहेबाचे आणि आपले छत्तीस गुण जमतात. फक्त त्यांच्या मंडळात नाटक बसवताना आपल्यासारखी भांडणे होतात की नाही हे नीटसे कळले नाही. तालमींना वेळेवर न येणे, एकूण नाटकात काम करून मराठी रंगभूमीवर एक उपकारांचे गाठोडे टाकून जाणे, 'तिच्या-सारखे आम्हांला पुढे पुढे करता येत नाही म्हणून ... नाही तर हीरॉइनचं काम मलाही मिळालं असतं ...' एवंगुणविशिष्ट वाक्ये कुजबुजणे, 'दिग्दर्शकाला कार्डाची अक्कल नाही' हा सिद्धान्त उराशी बाळगणे, 'आयत्या वेळी मारून नेतो की नाही बघा!' ही प्रतिज्ञा करणे, असले प्रकार हे खास आपले आहेत की साहेबांच्या मंडळातदेखील हे होते हे पडताळून पाहण्याची खूप इच्छा होती. परंतु शेवटपर्यंत तो योग आला नाही.

सकाळी उठून फिरायला जाण्याचा निश्चय ही एक माझ्या आयुष्यात वारंवार ठरवून मोडलेली घटना आहे. लंडनची माझी पहिली पहाट फुटली आणि ह्या निश्चयाने पुन्हा एकदा उचल खाल्ली. अचानक पहाटे मला जाग आली. खिडकीबाहेर पाहिले, पाऊस नव्हता. सूर्य उगवला की नाही हे लंडनमध्ये केव्हाच कळत नाही. पण बाहेर उजेड होता. मी माझा पहाटे फिरायला जाण्याचा निश्चय जाहीर केला. बायको कुत्सितपणे हसली. त्या हसण्याला दाद न देता मी तो सूट पुन्हा एकदा चढवला. गळ्याला मफलर गुंडाळला, कारण उन्हाळ्याचे दिवस असले तरी थंडी होतीच. पुण्याला डिसेंबरात असते तशी थंडी होती. (हल्ली पुण्याला पूर्वीची थंडी पडत नाही म्हणतात. मी पस्तीस-छत्तीस साला-नल्या हवेविषयी बोलत आहे, हा खुलासा मुद्दाम करतो. उगीच वाचकांच्या पत्रांची मारामारी नको.)

किल्बर्न विभागात तडकोड राहतात. मी फिरायला निघताना हातात लंडनचे रस्ते दाखवणारे नकाशाचे छोटे पुस्तक घेतले होते.

"पहिल्याच दिवशी रस्ता चुकू नका!" हे वाक्य धर्मपत्नीखेरीज कुणाचे असणार?

"चुकायला काय झालं?— शिवाय देवानं मला तोंड दिलंय आणि इंग्रजी भाषा मला येते!" मी कणखरपणाने बोललो.

माझ्या त्या कणखरपणामुळे तड-कोडांपैकी रामभाऊंचे मत माझ्या बाजूचे आणि सौ. तडकोडांचे जरासे माझ्याविरुद्ध झालेले मला दिसत होते. लोकांच्या पुढे बायकोने सूचना देणे हे रामभाऊंना आणि मला दोघां-नाही नापसंत आहे हे पुढे एकदा आमची कुटुंबे 'सेल्फ्रिजिस' दुकानात खरेदीला गेल्याची संधी साधून आम्ही बोलून घेतले.

मी उत्तर ध्रुवाचा शोध करायला निघालेल्या प्रवाशांच्या आत्मविश्वा-माने ख्राइस्ट चर्च ॲव्हेन्यूमधून किलबर्नच्या रस्त्याला लागलो. सकाळी नऊचा सुमार होता. रस्त्यात संपूर्ण शुकशुकाट होता. दुतर्फा टुमदार इंग्रजी बंगल्यांसमोर रंगीबेरंगी फुलांनी फुललेल्या बागा! मधूनच दुकानांच्या रांगा, पण दुकाने बंद. सुमारे वीस मिनिटे चालल्या-वर सायकलवर वर्तमानपत्रांचा गठ्ठा घेऊन जाणारी एक मुलगी मला दिसली. तिने दिव्याच्या खांबाला आपली सायकल टेकवली आणि गठ्ठयाच्या वजनाने ती सायकल खाली आदळून वर्तमानपत्रे इतस्तत: पडली. मी चटकन पुढे जाऊन तिची सायकल उचलली आणि तिने वर्तमानपत्रे गोळा करून पुन्हा गठ्ठा बांधला आणि सायकलवर चढवला.

त्या षोडशवर्षदेशीय गौर युवतीने माझे आभार मानले. एका भारतीयाच्या या परोपकाराच्या भावनेचे दृश्य पाहायला तिथे सकाळी नऊ वाजतादेखील कुणीही नव्हते याचे मला मनस्वी दु:ख झाले. माझ्या मनात त्या मुलीला बरेच काही विचारायचे होते, पण ती युवती सायकलवरून ( टांग टाकून म्हणणार होतो पण 'टांग' हा शब्द त्या तरुणीच्या संदर्भात योग्य नाही. ) शेजारच्या गल्लीत अदृश्य झाली. त्या रम्य पहाटे गठ्ठयापलीकडून दिसणाऱ्या त्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहत मी काही क्षण उभा होतो. वाऱ्याने तिचे सोनेरी केस भुरभुरत होते.…जाऊ दे, इतकेच पुरे! इतक्या थंडीत अंगात जाड कोट वगैरे न घालता उघड्या पायांनी साय-कलीवरून वर्तमानपत्रे टाकण्याचे तिला काम करावे लागते अं! असे मी मनातल्या मनात पुटपुटलो. पुढे मला कळले की ही कामे विद्यार्थी-विद्यार्थिनी सुटीच्या दिवसांत चार पैसे मिळविण्यासाठी आनंदाने करतात. मी त्या निर्जन रस्त्यावरून आणखी पुढे गेलो. बाजूच्या घरात माणसे राहत असल्याचा कुठेही पुरावा नव्हता. मधूनच एखादी मोटार जायची, त्यात माणसे असत. माणसे अजिबात नसलेली मोटार रस्त्यातून जाताना मला तरी आढळली नाही.

काही वेळाने दुरून हॅम्लेटच्या बापाच्या भुतासारखे काही तरी सरकत माझ्याकडे येत आहे असा मला भास झाला. मी 'त्रस्त समंधा, शांत

रहा' वगैरे वाक्ये आटवेपर्यंत ती आकृती समोर येऊन ठेपली. सहा फूट उंच आणि डोक्यावरच्या शिरस्त्राणामुळे आणि लांब डगल्यामुळे अधिकच उंच वाटणारी ती आकृती लंडनच्या सुप्रसिद्ध पोलिसाची होती. लंडनचा पोलिस हा साऱ्या जगाच्या कौतुकाचा विषय आहे. 'बॉबी' हा आबाल-वृद्धांचा मित्र आहे. तो कधी रागवत नाही, चिडत नाही, चिरीमिरी मागत नाही. सदैव मदतीला तयार. फक्त त्याला हसता येत नसावे. त्या रम्य पहाटे मी त्या पोलिसाला पाहिल्यावर मला स्थितप्रज्ञदर्शन झाल्याचा आनंद झाला. अहिंसा-सत्य-अस्तेयांचा तो पुतळा. त्याच्या हातात शस्त्र नाही. समोर गुन्हेगारांची टोळी चाल करून आली तरी तो हात उगारत नाही. चोराला चोरी करताना-देखील त्याच्या भावना न दुखावतील अशा बेताने तो पकडतो. चोर पकडल्याचा त्याला आनंद नाही, निसटल्याचे दुःख नाही. रस्त्यात भलतीकडे गाडी उभी असली तर निमूटपणे आपली वही काढून तो नंबर टिपून घेतो. राग-लोभ-क्रोधांच्या पलीकडे गेलेल्या ह्या महात्म्याचे दर्शन मला लंडनच्या पहिल्या प्रभातफेरीच्या वेळी व्हावे ह्याचा मला मनस्वी आनंद झाला. आपल्याकडे पोलिस आडवा आला



तर काही ठिकाणी परत घरात येऊन माणसे जरा बसून मग पुन्हा बाहेर पडतात — असे मी ऐकले आहे. लंडनमधला बॉबी हा अलौकिक पुरुष आहे. आपल्याकडे अपघात, चोरी, मारामारी अशा प्रसंगाला पोलिस कधीही स्वतःच्या उपस्थितीने अधिक शोभा आणीत नाहीत. 'आणि माणसाचा मुडदा पडला' की दोन तासांनी बाजूच्या जिवंत गर्दीला दंडुके हाणीत पोलिस पार्टी येते. लंडनमध्ये तर मी ऐकले की चोरीच्या

ठिकाणी चोराच्या आधी पोलिस उभा असतो! चोराला चांगली चोरी करू देतो आणि मग पकडतो. चोर कोर्टात वेळेवर हजर राहतो. जी शिक्षा असेल ती मुकाट्याने भोगतो. तुरुंगात टेलिव्हिजन, रेडिओ वगैरे असल्यामुळे त्याचा वेळ बरा जातो. फक्त रविवारी पाद्री येऊन प्रवचन देतात तेवढा वेळ त्रासात जातो म्हणतात.

लंडनला दुधाच्या बाटल्या कोणीही चोरीत नाही. नाक्यावर वर्तमानपत्रे असतात. पण विकणारा पबमध्ये लागर पीत असतो. गिऱ्हाइके पेटीत पैसे टाकतात, नेमके सुटे पैसे उचलतात आणि जातात. इंग्रजांचा प्रामाणिकपणा अवर्णनीय आहे. अधूनमधून पोलिसांना काम मिळावे म्हणून खून, बँकेचे दरोडे वगैरे दुष्काळी कामे काढण्यात येतात. हल्ली बरेचसे पोलिस फुटबॉल पूल्सची कोडी सोडवतात. माझ्या मुक्कामात चौदा चौदा पोलिसांच्या टोळ्यांना वीस की तीस हजार पौंडांची लॉटरी फुटली होती. अशा या भाग्यवंतांच्या वंशातल्या सुपुत्राची आणि ज्ञानदेवाच्या मराठीचिये नगरीतल्या दुसऱ्या सुपुत्राची त्या शुभ पहाटे किलबर्न रोडवर गाठ पडली. रस्त्यात अजूनही माणसे नव्हती. एका अर्थी हे बरे होते. मी आणि बॉबी चार घटका बोलू शकलो असतो. मी समोरून येणाऱ्या त्या सहा फूट उंचीच्या महामानवाला सहास्य वदनाने म्हटले—

"गुड मॉर्निंग!"

"गुम्मॉग" असे काहीसे कुरबुरत तो सरळ तरंगत पुढे निघून गेला. माझे मनाशी रचलेले सर्व संभाषण कोसळले. 'यां चिन्तयामि सततं मयि सा विरक्ता...' हे एकूण प्रेयसीप्रमाणे पोलिसालाही लागू पडावे ह्याचे नवल करीत मी आल्या वाटेने परतलो. कदाचित त्याची ड्यूटी संपली असेल. कारण ड्यूटीवरचा इंग्रज आणि खाजगीतला इंग्रज यांत फार फरक आहे.

आता रस्ता हळूहळू हलायला लागला होता. येताना ज्या बागेत फक्त फुले होती तिथे मुलेही दिसू लागली. गुटगुटीत सुंदर मुले. आणि अत्यंत दरिद्री पोषाख अंगावर चढवून, हातात खुरपी घेऊन त्यांचे बाप बागेत राबत होते. इतर युरोपीय देशांत आणि इंग्लंडमध्ये हा महत्त्वाचा

फरक आहे. रविवार म्हटला की युरोपियन लोक आपल्या मुलाबाळांसह उत्तम पोषाख चढवून चर्चमध्ये जातात. इंग्रजमात्र अगदी गचाळ पोषाख



घालून स्वतःच्या बागेत काही खणत, नाही तर उकरीत बसतो. बागेत खणणे आणि उकरणे हे कार्य समस्त इंग्लंडभर रविवारी सकाळी चालू असते.

बाग खणणे हा इंग्रज पुरुषांचा लाडका षोक आहे आणि कुत्र्याचे कौतुक करणे हा बायकांचा ! इंग्लंडमध्ये जन्माला यायचे असेल तर फूल म्हणून यावे किंवा कुत्रे म्हणून यावे. (इतक्या चांगल्या संस्कारांत वाढलेली इंग्रज कुत्रीं देखील दिव्याच्या खांबांचा उपयोग 'तस्साच' करतात, हेही जाता जाता नमूद करावेसे वाटते.) दुर्दैवाने माझे आणि कुत्र्याचे बरे नाही. धनाजीच्या शत्रूंच्या घोड्यांना म्हणे पाण्यात धनाजी दिसायचा. कुत्र्यांच्या डोळ्यांत मला सदैव सैतान दिसतो. एक तर बऱ्याचशा कुत्र्यांना धोब्याकडून पात्रा-विचारी लाच मिळत असावी. स्वच्छ कपडे घालून गेले की चिखलाने लडबडलेल्या पायांचे ठिके अंगावर उठवल्याशिवाय कुत्र्यांना हाडूक गोड लागत नाही. पाहुण्यापुढे चहा आणून ठेवला की त्या कपबशांवर झेप घेणे हा दुसरा धर्म. आणि अत्यंत महत्त्वाच्या संवादात बोलणाराचे लक्ष स्वतःकडे वेधून घेण्यासाठी प्रसंगी देहधर्माचा उपयोग करणे हा तर कुलधर्म. पण इंग्लंडात ह्या प्राणिविशेषाशी मला राजनैतिक

संबंध जोडावे लागले. मी कुत्र्याशी संबंध जोडायचे म्हणजे कसायाने गोरक्षणसंस्थेचा अध्यक्ष होण्यातला प्रकार होता. पण मनातला सगळा राग गिळून मी कुत्र्याशी लांगूलचालन करीत होतो, घरमालकिणीच्या कुत्र्यापुढे गोंडा घोळीत होतो. माझी विजार फाडली, नवी घेतलेली फेल्ट हॅट बिस्किट समजून तिचा तुकडा मोडला तरी हसण्यावारी घालवत



होतो. न घालवून सांगतो कुणाला? कुत्र्याविरुद्ध तोंड वर करून बोलण्याची माझी काय प्राज्ञा होती! माझे सामान फिंचली रोडवर येऊन पडले असते आणि वर मालकीण मला ' गुड मॉर्निंग ' म्हणाली असती. एखाद्याला घालवून देतानासुद्धा या ' गुड 'चा उपयोग होतो. ' गुड मॉर्निंग ' हे ' आता निघा ' ह्या अर्थानेही वापरले जाते हे मी इंग्लंडात शिकलो.

माझ्या हिशेबाने मी बराच वेळ हिंडून परत घरी आलो. तडकोडांच्या दारात उभा राहिलो. दारावरच्या घंटीशेजारी एक बैलाचे तोंड असलेली घड्याळाच्या तबकडीसारखी तबकडी होती, आणि घड्याळाच्या काट्या-सारखा परंतु त्या बैलाच्या शेपटीच्या आकाराचा काटा एक-दोन-तीन-चार अशा आकड्यांवर वाटेल तिथे फिरू शकत होता. त्याचा अर्थ काही मला उमगला नाही. मी तो काटा खूप फिरवून पाहिला पण बेलचा आवाज झाला नाही. म्हणून बेलचे बटण दाबले आणि बेल वाजली.

" इतक्यात परत आलात ! " बायको उद्गारली.

" इतक्यात म्हणजे? चांगला तासभर भटकत होतो. इंग्लंडमध्ये कितीही फिरले तरी घाम येत नाही."

" पण अजून सव्वानऊदेखील झाले नाहीत."

" म्हणजे? फक्त पंधरा मिनिटं फिरलो मी?" हे वाक्य मी आतल्या आत जिरवले. कारण माझ्या हिशेबाने मी चिक्कार हिंडून आलो होतो.

" पहिल्या दिवशी एकदम जास्त वेळ फिरणं बरं नाही. शिवाय थंडी आहे. निमोनिया झाला म्हणजे?—" बायको निरुत्तर झाली. सवयीप्रमाणे तिने आंघोळ उरकून घेण्याविषयी हुकूम सोडला. वाचनात दंग व्हावे, मित्रांशी गप्पा रंगात याव्या, अशा वेळी बायकोला नवऱ्याला आंघोळीला पाठवण्यात काय आनंद होतो देव जाणे! कित्येक वेळा तर एकदा आंघोळ उरकून आल्यानंतरदेखील केवळ नवरा वर्तमानपत्र वाचण्यात रंगला आहे हे पाहून बायकोने त्याला आंघोळीला काढल्याचे मी ऐकले आहे.

लंडन शहरातली माझी पहिली आंघोळ मी केव्हाही विसरणार नाही. वास्तविक इंग्रजाला स्नानाचे फारसे कौतुक नाही. खुद्द लंडन शहरात हजारो घरे अशी आहेत, की ज्यांत स्नानगृहे नाहीत. सार्वजनिक स्नानगृहे असतात. तिथे सणासुदीला माणसे जाऊन अंग विसळून येतात. एरवी मुखप्रक्षाळणावर भागते. त्या थंड देशात आंघोळीची दैनिक आवश्यकताही भासत नाही. पुढे पुढे मीही हा कार्यक्रम साप्ताहिक कोष्टकात बसवला होता. पोरवयात दोन पायांवर चालायला लागण्यापूर्वी साधारण इंग्रजांच्या बालदेहाची जी काही धू-पूस होत असेल तीच खरी. एरवी आंघोळ ही चैनीची बाब. फ्रान्समध्ये तर कुणी आंघोळ केली तर वर्तमानपत्रात छापून येते म्हणतात. मी स्वतः काही वाचले नाही, कारण मला फ्रेंच वाचता येत नाही. पण इंग्लंडात मात्र स्नान हे प्रकरण एकूण कष्टाचे हेच खरे. एक तर टबबाथ हा प्रकारच मुळात अवघड. त्यातून त्या टबमध्ये गरम पाणी भरायला दर वेळी एक शिलिंग टिचावा लागतो. आपल्याला 'गंगे—भागीऽऽरथीऽऽ' म्हणत डोक्यावर बादल्या रिकाम्या करायची सवय झालेली असते. वाहत्या पाण्यात हात धुऊन घेण्याची इंग्रजाला

सवय नाही. वॉश-बेसिनमध्येदेखील ते बेसिन भरून घेऊन त्यातच पुन:पुन्हा हात बुचकळण्याची पद्धत आहे. चूळ भरणे हे वर्ज्य. आणि टबमध्ये आंघोळीला बसल्यावर खळखळून चूळ भरणे अशक्य. एकदा त्या टबात शिरले की पाणी घाण होते. तसल्याच पाण्यात अंग बुचकळीत राहणे हे अशक्य आहे. त्यातून पाण्याचा थंडपणा आणि गरमपणा पाहत तोव्या फिरवीत राहण्याचे एक तंत्र सांभाळावे लागते. फवाऱ्याखाली उभे राहून स्वच्छ आंघोळ करून नंतर टबमध्ये पाण्यात आरामात पडून राहणे निराळे आणि एकदम त्या टबात शिरणे निराळे. त्यातून आजूबाजूला पाणी न उडवता बुचकळावे लागते. परदेशाच्या सहा-सात महिन्यांच्या मुक्कामात मला शेवटपर्यंत जर कुठले तंत्र जमले नसेल तर आंघोळीचे. इंग्रजांची वैयक्तिक स्वच्छता आणि सामाजिक स्वच्छता यांचे गणित आपल्याशी ताडून पाहिले तर ते व्यस्त प्रमाणात आढळेल. आपली खाजगी स्वच्छता पुष्कळ बरी; पण सामाजिक स्वच्छता काय पुसावी ! आपल्या कुठल्याही गावातला कुठलाही चौक, सार्वजनिक बागा याची भरपूर साक्ष देतील. इंग्लंडमधल्या सार्वजनिक स्वच्छतेने आपण थक्क होतो. रस्त्यात केळ्याची साले नाहीत, पानाच्या पिचकाऱ्या नाहीत, बागेत भेळ खाऊन टाकलेले कागद नाहीत. इमारतीच्या मधल्या चौकात खरकट्या पत्रावळी नाहीत. रस्ते, बागा, क्रीडांगणे कशी अगदी लखख ! टबमधल्या पाण्याशी सुमारे अर्धापाऊण तास दंगामस्ती करून मी बाहेर पडलो; आणि दुसऱ्या दिवशी आम्हांला ‘ इंग्लिश स्पीकिंग युनियन ’ नावाच्या संस्थेत लंचचे आमंत्रण होते म्हणून लंडन शहराचा नकाशा असलेले पुस्तक घेऊन बसल्या बसल्या आम्ही रस्ता शोधायला सुरुवात केली.

इंग्रज लोक आपल्या रस्त्यांना नावे ठेवण्यात विलक्षण कद्रूपणा करतात. आपल्या देशात त्या मानाने पुढाऱ्यापासून ते पेंढाऱ्यापर्यंत नावे ठेवायला पुष्कळ मंडळी आहेत. पण खुद्द लंडन शहरात खाइस्ट चर्च ॲव्हेन्यूज निदान डझनभर असतील. आपल्याला हवा असलेला रस्ता एन्‌मध्ये आहे की एन-डब्ल्यूत आहे, एसमध्ये आहे की एस-ईत आहे ह्या साऱ्या तपशिलाची शेवटपर्यंत खात्री करून घ्यावी लागते. ती

झाली की चुकतो म्हटले तरी रस्ता चुकणे शक्य नाही. एरवी मात्र एक जेम्स हे नाव धरले की त्याचा जेम्स स्ट्रीट, जेम्स रोड, जेम्स पार्क, जेम्स स्क्वेअर, जेम्स ॲव्हेन्यू, जेम्स सर्कल, जेम्स क्रेसेंट, जेम्स हिल, जेम्स गार्डन, जेम्स बॅंक, जेम्स लेन, जेम्स आर्क, जेम्स कॉर्नर असे अनेक पर्याय होतील आणि एक पर्याय दुसऱ्या पर्यायापासून दहा दहा मैल दूर असू शकेल. 'मॅजेस्टिक सिनेमासमोर' म्हटले, की मुंबईत पत्ता कळतो. पण 'ओडियन सिनेमापुढे' म्हटले की लंडनला पंचवीसएक ओडियन असतील, त्यातला कुठला हे कळणे अशक्य! फिंचली निराळा, फिंचली रोड निराळा आणि फिंचली फ्रॉग्नल निराळा. शेवटी पुस्तकात आमचा पत्ता सापडला. ती पुस्तके मात्र अती उपयुक्त. रस्ता तर सापडतोच, पण जवळचे भुयारी स्टेशन, बस रूट कोणता हेदेखील कळते. पॅरिसमध्ये तर त्यांच्या भुयारी गाड्यांच्या स्टेशना-जवळ कुठले कुठले रस्ते आहेत हेदेखील स्टेशनावर नकाशात दिलेले असते. तिथे अडचण फक्त नावाच्या उच्चाराची. 'इन्‌व्हॅलिड्‌स' असा इंग्रजी उच्चार होऊ शकणाऱ्या शब्दाचा फ्रेंच उच्चार 'आंवालीद' असतो आणि 'इटॉइल'चा उच्चार 'इतवाल' होतो हे कळायला बरेच फ्रेंच धक्के खावे लागतात. अर्थात स्वतःला इंग्रजी येत असल्यामुळे लंडनमध्ये रस्ता चुकायची भीती नाही असा दांडगा आत्मविश्वास होता. त्यातून तो जगमित्र बॉबी!

लंडनच्या भुयारी रेल्वेचा पहिला प्रवास मी जन्मात विसरणार नाही. भुयारी रेल्वेला इंग्लिश लोक ट्यूब म्हणतात आणि युरोपात तिला मेट्रो म्हणतात. ह्या ट्यूबने सारे लंडन पोखरले आहे. इतका सुखाचा आणि बिनचूक प्रवास पृथ्वीतलावर अन्यत्र नसेल. जागोजागी पाट्या लावून तुमच्या मनातल्या सगळ्या शंकांचे निरसन केलेले. एका छोट्याशा कार्डावर रंगीबेरंगी ओळींचा सुबक नकाशा. प्रत्येक स्टेशनाचे नाव जवळ जवळ दुसरे स्टेशन लागेपर्यंत बोर्डावर लिहिलेले. त्यामुळे 'शेणोली आली का हो?' हा प्रश्न विचारावा लागत नाही. आपल्याकडे स्टेशनांची नावे गुप्त ठेवण्याकडे का प्रवृत्ती आहे देव जाणे! आणि फलाटाच्या दोन

टोकांना नावाच्या पाट्या लिहिण्याची ज्या महाभागाला कल्पना सुचली त्याला तर लक्ष प्रणाम ! एक तर त्या पाट्या फलाटाशी काटकोन करून असतात. त्यामुळे खिडकीबाहेर दीड हात तोंड काढल्याखेरीज वाचता येत नाहीत. आणि उरलेल्या, एवढ्याशा अक्षरात कंदिलांच्या काचांवर लिहिलेल्या. त्यामुळे दहा लोकांना ओरडून विचारून खात्री करावी लागते. लंडनमध्ये या ट्यूबच्या स्टेशनावर, डोळे असलेल्या आणि इंग्रजी वाचता येणाऱ्या माणसाला अमुक एका ठिकाणी कसे जायचे हे विचारण्याची गरजच नाही. रस्त्यातदेखील रस्त्याच्या नावां-नंबरांचे बोर्ड स्वच्छ अक्षरात लावलेले. मुंबईसारख्या शहरातदेखील रस्त्याच्या नावाच्या पाट्या दुर्मीळ. इतक्या वर्षांत मी ' बापू खोटे स्ट्रीट ' आणि ' सोनापूर लेन ' एवढ्या दोनच पाट्या वाचलेल्या आठवतात. एरवी धोबीतलाव सुरू कुठे होतो आणि संपतो कुठे हे पोस्टमनला कळते कसे हे मला कोडे आहे. घरनंबर तर अजून वाचण्याचा योग यायचा आहे. पोस्टमन बहुधा अंतर्ज्ञानी असावे. एरवी दोनशे पंधरा नंबर आणि गिरगाव रोड या पत्त्यावरचे पत्र दोनशे पंधरा नंबर आणि गिरगाव रोड या दोन्ही पाट्या अजिबात अस्तित्वात नसताना त्या पत्त्यावर राहणाऱ्या गृहस्थाला मिळते कसे याचा मला तरी शोध लागायचा आहे. पुण्याला वाड्यावरच्या दर्शनी गणपतीच्या उंदराखाली कुठे तरी कोळिष्टके — धूर — काजळी यांच्यात घरनंबर लपलेला असतो. पेठा तर एकमेकींच्या कधी गळ्यात गळा घालून तर कधी पायात पाय टाकून उभ्या आहेत. घराचा एक खण बुधवारात आणि दुसरा शनिवारात असू शकतो — एवढेच नव्हे तर माझ्या एका मित्राची वरची माडी शुक्रवारात आणि माजघर सदाशिव पेठेत आहे असे ऐकतो. खरे खोटे देव जाणे !

किलबर्न स्टेशनातल्या तिकिटाच्या खिडकीतल्या बुवाला मला पिकॅडलीचे तिकीट हवे आहे हे कळायला दोन मिनिटे लागली. सगळ्याच साहेबांना आपल्यासारखे शुद्ध इंग्रजी येत नाही.

" टू पिकॅडली प्लीज. "

" मे ग्यॉ फाऊन. "

"टू टिकेट्स ऑफ दि टयूब रेल्वे फॉर पिकॅडली स्टेशन"— मीदेखील चिडलो. त्याने हताशपणाने मान हलवली. शेवटी मी एका कागदावर "दोन पिकॅडली" असे स्वच्छ लिहून दिले. "ओऽऽ! यू मीन फिल्याडली" असे म्हणून त्याने फिल्याडलीची तिकिटे दिली. इंग्रजीचा पहिला दणका इथे बसला आणि आपले शुद्ध तुपातले इंग्रजी इथे उपयोगाचे नाही हे मनातल्या मनात मी ओळखले. साहेबांचे इंग्रजी एकूणच निराळे. आपल्या देशात इतकी वर्षे राहून त्याने खरे इंग्रजी आपल्यापासून, काही खांसाहेब चिजा चोरून ठेवतात तसे, चोरून ठेवलेले दिसते.

कधी कधी भलत्याच गोष्टीचे मनात आकर्षण असते. फार वर्षे माझ्या मनात रेल्वेच्या इंजिनाची शिट्टी वाजवण्याची महत्त्वाकांक्षा जीव धरून होती ती अचानक मी बेळगावला कॉलेजात शिक्षक असताना पुरी झाली. विलायतेच्या प्रवासाला निघताना मला फिरत्या जिन्याचे असेच कुतूहल होते. अनेक लेखकांनी लिहिलेली विलायतेची प्रवासवर्णने वाचताना ह्या फिरत्या जिन्याचा उल्लेख यायचा आणि आपले पाय त्या जिन्याला कधीकाळी लागतील का असा विचार उगीचच डोक्यात एक कोलांटी उडी मारून जायचा. भुयारी रेल्वेची सगळी स्टेशने भुयारात नाहीत. काही काही स्टेशने तर चांगली गावाच्या डोक्यावर आहेत. किलबर्न यातलेच स्टेशन. तिथे मी आपला साध्या देशी जिन्याने चढलो आणि वेस्ट हॅंपस्टेड, फिंचले रोड, स्विस कॉटेज, संट जॉन्स वुड वगैरे स्टेशनांच्या पाट्या वाचता वाचता भुयारात केव्हा घुसलो याचा अंदाज आलाच नाही.

पिकॅडली स्टेशनवर आम्ही उतरलो ते चांगलेच पाताळात जाऊन पोचलो होतो. दहा दहा वेळा हातातील आणि भिंतीवरले नकाशे पाहत पाहत आम्ही एका फिरत्या जिन्याच्या पायथ्याशी पोचलो. पिकॅडली-सारख्या स्टेशनाचे हे जिने इतके खोल आहेत की, वरून आपोआप खाली येणाऱ्या माणसांकडे पाहताना मला जरा गरगरल्यासारखेच झाले. त्या फिरत्या जिन्याच्या शेवटल्या पायरीवर चटकन पाऊल टाकणे आणि

टोकाला पोचल्यावर न गडबडता सटक करून जमिनीला पाय टेकणे ह्या क्रियेचा सराव व्हायला दोनतीन दिवस लागतात. पायरीची डावी बाजू नेहमी मोकळी ठेवावी लागते, म्हणजे त्या फिरत्या जिन्यावरूनही झप झप पायऱ्या चढून पळत जाणाऱ्यांची वाट मोकळी होते. पहिल्या दिवशी नेहमीप्रमाणे डावी बाजू रिकामी पडलेली पाहून आम्ही तिथेच उभे राहिलो. एक ते सव्वा मिनिटाचा खोळंबा झाल्यामुळे आमच्यामागे अडकून राहिलेल्या इंग्रजांच्या चेहऱ्यावरचे भाव पाठीला डोळे नसल्यामुळे दिसले नाहीत. पुढे पुढे हा प्रमाद इतरांच्या हातून घडला की मागल्या माणसांचे चेहरे कसे होतात ते दिसल्यामुळे पहिल्या दिवशी डझनभर इंग्रजांचे शिव्याशाप आपण नक्की घेतले असतील याची खात्री झाली.

ती भुयारी रेल्वे, फिरते जिने, त्या चिमुकल्या आगगाड्या आणि त्यात बसणारी ती गोरीगोरीपान मंडळी ह्या साऱ्या गोष्टींचा मला तर पुढे पुढे लोभ जडला. माझ्या साऱ्या मुक्कामात मी बसमधून अगदी क्वचितच प्रवास केला असेल. भुयारी रेल्वेइतके सोयीचे आणि बिनधोक वाहन दुसरे कुठलेही नसेल. जमिनीखालच्या त्या प्रचंड बिळातून ह्या पाताळ-यंत्री गाड्या दिवसरात्र सरपटत असतात. ही रेल्वे खोदणारे शिल्पी भलतेच चतुर असले पाहिजेत. बेकर स्ट्रीट, ऑक्सफर्ड स्ट्रीट, पिकॅडली ह्यांसारख्या स्टेशनांवर उभे असताना कल्पनाही येत नाही की डोक्यावर शेकडो वाहने चालली आहेत, हजारो पादचारी जाताहेत, सारे लंडन डोक्यावर उभे आहे! पाहता पाहता माणसे या भुयारी रेल्वेच्या बिळात नाहीशी होतात. आणि वरून चालता चालता पटकन एखादा पाण्याचा नळ फुटावा तसा फुटपाथच्या मधूनच माणसांचा फवारा वर उधळला जातो आणि दाही वाटांनी तुरूतुरू चालायला लागतो.

वास्तविक मी गेलो त्या वेळी उन्हाळा संपला नव्हता. परंतु माझ्या-सारख्या मुंबईच्या अत्यंत आल्हाददायक उकाड्यातून विमानातून चोवीस तासांत लंडनला पोचलेल्या माणसाला तो इंग्लिश उन्हाळाही कुडकुड करायला पुरेसा होता. पिकॅडलीच्या भुयारातून बाहेर आलो आणि क्षण-भर गडबडून गेलो. संध्याकाळची वेळ होती. आणि चारी बाजूंना

दिव्यांचा झगझगाट होता. रंगीत विजेरी नळ्यांमधून रंगीबेरंगी प्रकाशात अनेक तऱ्हेच्या जाहिराती चमचमत होत्या आणि गोऱ्या, तांबड्या, काळ्या, पिवळ्या अशा अनेक वर्णांच्या माणसांचे थवे अंगावरून जात होते. लंडनइतके अठरापगड शहर अन्य नसेल. अंगावरून जाणाऱ्या माणसांच्या तोंडून येणारे कितीतरी भाषांतल्या वाक्यांचे तुकडे कानावरून जातात. हिंदी लोक तर अपेक्षेपेक्षा जास्त आढळतात. 'पिकॅडली सर्कस' हे नाव लहानपणापासून कानावरून गेले होते. असंख्य वेळा पुस्तकात डोळ्यांखालूनही गेले होते. पिकॅडली सर्कसचे माझ्या डोळ्यांपुढले चित्र आणि प्रत्यक्षातली पिकॅडली ह्यांत मात्र फार फरक पडला. मुंबईचा काळबादेवी भाग उद्या जर अधिक स्वच्छ झाला, माणसे वाहतुकीचे नियम सांभाळून चालू लागली, मुंबईची हवा एकदम थंड झाली आणि त्या भागातल्या रहिवाशांनी पान खाऊन थुंकायचे नाही असे ठरवले तर धोबीतलाव—काळबादेवी भागालाही मुंबईची पिकॅडली म्हणायला हरकत नाही. लंडन शहरातला हा सर्वांत अधिक गजबज-लेला भाग.

मात्र लंडन शहरातले गजबजणे आणि मुंबईचे किंवा हिंदुस्थानातल्या इतर मोठ्या शहरांचे गजबजणे ह्यात जमीनअस्मानाचा फरक आहे. ज्याला खऱ्या अर्थाने गर्दी म्हणतात तशी काही नाताळासारखे प्रसंग सोडले तर लंडनमध्ये क्वचितच आढळते. सकाळी कचेऱ्या भरताना आणि संध्याकाळी सुटताना काय थोडी गर्दी दिसत असेल तेवढीच. एरवी रस्त्यात शुकशुकाटच! रस्ते आणि माणसे यांचे प्रमाण अगदीच व्यस्त. संध्याकाळी सहासाडेसहाच्या सुमाराला कर्फ्यू ऑर्डर असल्या-सारखी शांतता असते. साहेब त्या वेळी संध्याकाळचे भोजन करण्यात गुंग असतो. दुकाने पाच म्हणजे पाचला बंद होतात. खरेदीची वेळ सामान्यत: सकाळी अकरा ते बारा आणि दुपारी दोन ते चार-साडेचार. एकूणच सारे जीवन घड्याळाच्या काट्यांतून जाणारे असल्यामुळे गर्दीच्या आणि शुकशुकाटाच्या वेळादेखील ठरलेल्या असतात. संध्याकाळचे जेवण आटपले की मग साहेब स्वत:ची करमणूक करून घ्यायला बाहेर पडतो.

त्या वेळी पुन्हा एकदा रस्ते गजबजतात.

परदेशातले रस्ते हीदेखील एक पाहण्यासारखी गोष्ट आहे. लंडन मुन्सिपाल्टीलासुद्धा मुंबई मुन्सिपाल्टीसारखे रस्ते उखडून ठेवायची खोड आहे. मात्र जिथे रस्ते उखडलेले असतात तिथले मजूर काम करताना आढळतात.

जेवायची सुटी झाली की त्या घटकेला हातातली आयुधे ठेवून भोजनाला सुरुवात करतील. एरवी मात्र रस्ता उकरून तंबाखू चोळीत त्या रस्त्यावर पानांच्या पिचकाऱ्यांचे उद्‌घाटन करीत बसलेले मजूर आढळत नाहीत. रस्त्याने हिंडणारी माणसेदेखील फुटपाथ सोडून हिंडत नाहीत. मोटारवाले तांबडा दिवा दिसला की थांबतात. दडपून गाडी हाकण्याकडे प्रवृत्ती कमी. आणि बहुधा रहदारीचे कायदे मोडल्याचे खटले भरले जातात ते इंग्रजेतर लोकांवर ! ह्या मंडळींचे स्वतःच्या देशातल्या प्रत्येक सजीव आणि निर्जीव वस्तूवर विलक्षण प्रेम आहे. ठिकठिकाणी ‘ आपले शहर सुंदर आहे, ते सुंदर ठेवण्याची शिकस्त करा ’ अशी विनंती असलेल्या पाट्या आहेत. घाण टाकण्यासाठी पत्र्याचे डबे आहेत आणि लोक त्यातच घाण टाकतात. वरच्या मजल्यावरून केर टाकणे, पानाची पिचकारी मारणे, आसपास न पाहता थुंकणे, न विझलेल्या विड्यांची थोटके फेकणे वगैरे प्रकार अजिबात आढळत नाहीत. आणि तसा एखादा वीर निघाला तर त्याच्या सत्काराला लंडनचा बॉबी लगेच हजर असतो. हा बॉबी परमेश्वरासारखा सर्वव्यापी आहे. तो आणीबाणीच्या प्रसंगी अगदी आधी वर्दी दिल्यासारखा उपटतो. कोणी पाहत नाही असे समजून लाल दिव्याला न जुमानता रस्ता ओलांडा, पलीकडल्या फुटपाथवर स्वागताला बॉबी हजर ! साधारणतः काळोखात भिंतीला पाठ लावून तो गुपचूप उभा असतो. तुम्ही बावरल्यासारखे दिसलात तर तो तुम्हांला वाट दाखवतो. शिवाय नाक्यानाक्यावर पोलिसांचे टेलिफोन आहेत. तुम्ही नुसता रिसीव्हर उचलला की कुठून तरी आवाज येतो—‘ तुम्ही अमक्या अमक्या ठिकाणी आहात ! तुम्हाला कुठे जायचे आहे ? ’ तुम्ही स्थळ सांगितले की लगेच ‘ अमकीकडून असे

जा; इकडे वळा, इथे पहा, तिथून पंचाहत्तर पावले उत्तरेला जा ...' अशासारख्या सूचना मिळतात. त्यामुळे आपण चुकायचे ठरवूनही चुकू शकत नाही. इंग्रजांची सारी शिस्त, सारी टापटीप त्यांच्या रस्त्याकडे पाहिले की लक्षात येते.

माझे एक सौंदर्यशास्त्री टीकाकार मित्र लंडनला कुरूप शहर म्हणतात. त्यांची काही सौंदर्याची समीकरणे आहेत. त्या 'अ = ब' आणि 'ब = ब² + क²' पद्धतीच्या सौंदर्यचिकित्सेत मला गती नाही. परंतु मला मात्र लंडन आवडले. तिथे पावसाची सारखी बुरबूर आहे — तिथे प्रचंड धुके पडते — पिवळे भयानक धुके पडते — इमारती जुन्या आहेत — एकासारख्या एक आहेत — सारे मान्य करूनदेखील मला लंडन सुंदर वाटले. ह्या शहरात विलक्षण टापटीप आहे. मजूरवस्तीतून हिंडा नाही तर हुजूरवस्तीतून जा, प्रत्येकाच्या घराला छोटी छोटी बाग आहे. रेल्वेच्या फलाटावरदेखील चिमुकले बगीचे आहेत. वास्तविक फूल ही लंडनमध्ये अत्यंत मौल्यवान वस्तू आहे. एका गुलाबाच्या फुलाला आपल्या हिशेबाने चार चार, पाच पाच, रुपयेदेखील पडतात. हिवाळ्यात तर किमती आणखीही वाढतात. परंतु सार्वजनिक बगीच्यातल्या फुलांना मूलदेखील हात लावत नाही. केवळ एक चावटपणा म्हणून मोडतोड करायची प्रवृत्ती मला परदेशात कुठेही आढळली नाही. रस्त्यातल्या जाहिरातींवरून थुंकून ठेवायचे, दगड मारमारून पोस्टर्स फाडायची, नट्यांचे चेहरे विद्रूप करायचे आणि आपल्या शहराला एक गलिच्छ कळा आणायची — असले प्रकार शोधूनही सापडले नाहीत. शहरभर जाहिराती लागलेल्या असतात. भुयारी रेल्वेच्या फिरत्या जिन्यांच्या दुतर्फा तर जाहिरातींच्या सुंदर तसबिरी लटकलेल्या असतात. पण कुठेही काच फुटलेली आढळली नाही किंवा कुठल्याही नटीला टिपू सुलतानासारख्या मिशा काढलेल्या दिसल्या नाहीत. इंग्रजांना ही गंमत अजून कळलेली दिसत नाही !

ह्या युरोपीय शहरांच्या आकाशरेखा मोठ्या सुरेख दिसतात. काही गिरणगावांचे अपवाद सोडले तर बहुतेक शहरांचे दर्शन दुरून फार रम्य असते, आणि आतून स्वच्छ असते. त्याला मुख्य कारण म्हणजे आकाशात

शिरलेली खिस्ती प्रार्थनामंदिरांची शिखरे. ह्या शिखरांमुळे प्रत्येक दृश्याला एक सुंदर टोक येते. पण आकाशाची शोभा मात्र आपल्या देशात ! लंडनचे आकाश सदैव ढगाळलेले. सूर्यदर्शनाची पंचाईत. चंद्रदर्शन किंवा चांदणे जवळ जवळ नाहीच. सूर्यदेखील सदैव पेन्शनीत गेलेल्या फौजदारासारखा करुण वाटतो. चांदोबा तर बिचारा सदाचाच भागलेला. परंतु ही उणीव हिरवळींनी आणि वृक्षांनी भरून काढली आहे. झाड सहसा तोडायचे नाही असा दंडकच आहे. इंग्रजी घरांचे परसू बहुधा मोठे असते. शिवाय जागोजागी प्रचंड उद्याने ! लंडनच्या मध्य वस्तीत हाईड पार्कसारखे केवढे विस्तीर्ण उद्यान आहे. पिकॅडली सर्कसइतकेच मला हाइड पार्कचेही आकर्षण होते. मार्बल आर्चच्या कमानीतून ह्या विस्तीर्ण उद्यानात शिरले की आजूबाजूला एक महाप्रचंड शहर आहे याची जाणीव नष्ट होते. तिथे गगनचुंबी वृक्ष आहेत, फुलझाडे आहेत, छोटी तळी आहेत, नौकाविहाराची सोय आहे — सारे काही आहे. जरा ऊन पडले की हा हाइड पार्क माणसांनी फुलून जातो. आरामखुर्च्या भाड्याने घेऊन माणसे शांतपणे बसलेली असतात, किंवा तोंडावर टाइम्स घेऊन झोपतात. ( लंडन टाइम्सचा मुख्य उपयोग तोंड लपविण्यासाठी होतो. आगगाडीत प्रत्येकजण त्या टाइम्सच्या बुरख्याआड लपलेला असतो. ) गोरीगोरीपान लहान लहान गुटगुटीत मुले हिरवळीवर बागडत असतात.

एखाद्या तरुतळी प्रणयी युग्मे गुजगोष्टी करीत प्रणयलीला करीत असतात. सुरुवातीला मला उगीचच ते दृश्य पाहून विचकल्यासारखे होत होते. परंतु त्या जोडप्यांना भोवतालच्या जगाचा विसर पडलेला असतो. प्रेम करणे ही पाश्चात्त्य देशांत एक सुंदर गोष्ट मानली जाते. त्यामुळे तशीच काही भानगड असल्याखेरीज त्यात लपवालपवीचा मामला नाही. प्रणयी युगुले हा असल्या उद्यानांचा तिथल्या तरुपर्णांइतकाच एक अविभाज्य घटक आहे. मात्र पाश्चात्त्य जोडपी त्या लीलांमध्ये विरून जातात. खरोखरीच प्रेमाचे ते क्षण ती उत्कटपणाने जगताहेत असे वाटते. आणि ज्या सौंदर्यदृष्टीने आपण एखाद्या अजंठा-

वेरूळच्या लेण्यांतल्या पाषाणमूर्तींकडे पाहतो त्याच दृष्टीने याही



दृश्यांकडे पाहू लागतो. त्या मीलनामध्ये कुठे वखवख आढळणार नाही. रम्य आणि भव्य अशा त्या उद्यानातील ही प्रणयदृश्ये म्हणजे जणू सजीव शिल्पे आहेत.

अस्सल भारतीयाप्रमाणे मीदेखील सुरुवातीला ही दृश्ये पाहून नाक मुरडले. पुढे पुढे इंग्लिश घरांमधून अधिकाधिक जाण्याचा मला प्रसंग आला आणि लंडनच्या हवेचाही अनुभव यायला लागला तेव्हा आकाशाच्या या विस्तीर्ण वृक्षाच्या छताखाली दिवसभर पडून राहणे हा काय विलक्षण आनंद आहे याची जाणीव होऊ लागली. इंग्रजाचे घर ही आता दिवसेंदिवस केवळ व्यावहारिक संस्था होऊ लागली आहे. स्वयंपाकघर हे यांत्रिक पाककेंद्र आहे आणि दिवाणखाना हे छोटे टेलिव्हिजन थिएटर झाले आहे. त्यामुळे घराचे घरपण जवळजवळ नष्ट होत आले आहे. यांत्रिक सुधारणा आणि तयार अन्न यांमुळे गृहिणींना ' रांधा, वाढा, उष्टी काढा ' फारसे करावे लागत नाही. नवरा आणि बायको दोघांनाही नोकरी करणे जवळ जवळ अपरिहार्य आहे. किंबहुना पुरुष आणि स्त्री यांतला नैसर्गिक भेद सोडून अन्य भेद उरलाच नाही म्हटले तरी चालेल. ' इश्य ' किंवा ' अय्या ' म्हणणारी इंग्रज स्त्री काही दिवसांनी लंडनच्या म्यूझियममध्ये पाहावी लागेल. मुलांनादेखील पालकांच्या जबाबदाऱ्या आणि आपले हक्क यांची कायदेशीर जाणीव होऊ लागली आहे. मी लंडनला असताना निष्काळजीपणाने आपला आंगठा दारात चिमटला म्हणून एका सुपुत्राने आपल्या पित्याविरुद्ध खटला भरून कोर्टातून नुकसानभरपाई मिळवली होती; आणि दुसऱ्या एका खटल्यात मुलाला कुठल्या शाळेत पाठवावयाचे यावर आई आणि बाप यांच्यात भांडण होऊन प्रकरण कोर्टात गेले होते.

'घर' या संस्थेचा आधार जिव्हाळ्यातून उठून कायद्यावर गेल्यामुळे प्रणयाचा काळ हा 'घर' करण्यापूर्वीचा व्हावा ह्यात आश्चर्य नाही. मला अनेक तरुण आणि तरुणी अशाही भेटल्या, की ज्यांची लग्ने ठरून पाच पाच वर्षे झाली होती; परंतु विशिष्ट तऱ्हेचा फ्लॅट, फ्रीज, टी. व्ही., वॉशिंग मशीन, ठराविक मेकची मोटरगाडी यांची जुळवाजुळव अद्याप होऊ न शकल्यामुळे मंत्राक्षता पडायच्या तशाच राहिल्या होत्या. विवाहोत्तर जीवनापेक्षा विवाहपूर्व जीवनातच अधिक सौख्य असल्यामुळे की काय कोण जाणे, विवाहित जोडप्यांपेक्षा अविवाहित जोडपीच पाश्चात्त्य देशांत फार आढळतात. त्यातून पुन्हा बॉय फ्रेंड आणि गर्ल फ्रेंड हे एक मला अजूनही न उमगलेले कोडे आहे. बी. बी. सी.-त माझ्या वर्गातले सहकारी कधी कधी आपल्या गर्ल फ्रेंडचा उल्लेख करीत. मुंबई-मध्येही हा शब्दप्रयोग मी आता-आताशा ऐकू लागलो आहे. आमच्या वेळी हे नव्हते. जाऊ द्या. या विषयाच्या फार खोलात शिरण्यात अर्थ नाही.

स्त्रीविषयक आकर्षण हा फार प्राचीन विषय आहे. आपल्या देशात आपण जरा बेतानेच या विषयावर बोलतो. पाश्चात्त्य देशांतील चिरतरुण राहण्याची स्त्रियांची धडपड पाहिली म्हणजे मात्र कौतुक वाटते. एका बाजूने पुरुषांच्या खांद्याला खांदा लावून साऱ्या सामाजिक, आर्थिक, राष्ट्रीय जबाबदाऱ्या उचलणारी नवी स्त्री आढळते, तर दुसऱ्या बाजूने सौंदर्यप्रसाधनाच्या साऱ्या शस्त्रास्त्रांची जुळवाजुळव करण्याची ह्या स्त्रीची ती सनातन धडपड चालू असते. बसमध्ये दोन्ही मजल्यांवरच्या पाशिं-जरांना सांभाळण्याचे कार्य करणारी खंबीर स्त्री-कंडक्टर पोलिसाने जरा अधिक वेळ ट्रॅफिक अडवला की आपल्या गणवेषाच्या खिशातून हळूच ओष्ठशलाका काढून ओठांचे धनुष्य नीट ताणून घेते; किंवा रेल्वे स्टेशनांची स्टेशनमास्तरीणबाई गाडी निघून गेली की नव्या केशभूषांचे नमुने पाहण्यात गढून जाते. कचेऱ्यांमधून तर स्त्रीराज्यच! इकडून तिकडे टणाटण उड्या मारीत पळणाऱ्या चुणचुणीत सेक्रेटरी पोरी कामांचे ढीग उपशीत असतात आणि तेवढ्यात शनिवार-रविवारी

आपल्या प्रियकराबरोबर कुठे जायचे याचे संकेत ठरवीत असतात. एखाद्या विमा कंपनीची मॅनेजर म्हणून काम करणारी बाईदेखील सेल्फ्रिजिससारख्या प्रचंड दुकानात झगे विकत घेताना आपल्या इथल्या एखाद्या द्वारकाकाकूंच्या नजरेने वाण आणि पोत तपाशीत असते. अगदी पुरुषी पोषाख करणाऱ्या बायकादेखील अशी एखादी पोषाखाची किंवा केशरचनेची गंमत करतात, की त्यातून स्त्रीचे ते ईव्हने दिलेले सनातन आव्हान व्यक्त व्हावे.

इंग्रज नवरा होणे ही मात्र एक निराळीच गुलामगिरी आहे. कचेरीतून येऊन 'हुश्श' करीत जॅकसनसाहेब बसले आहेत आणि जॅकसनीणकाकूंनी त्यांच्यापुढे पोह्यांची बशी आणून ठेवली आहे, हे दृश्य पाहू जाता आढळणार नाही. घरच्या कामाचा बराचसा भाग यजमानांना उचलावा लागतो. मनुष्यबळ अत्यंत मर्यादित असल्यामुळे घरची बरीचशी कामे साहेबांनाच करावी लागतात. विशेषत: भोजनोत्तर ताटेवाट्या विसळणे हे काम 'ह्यांचे' असते. "जेवल्यावर पान खाऊन 'केसरी' वाचत पडू म्हणतो" हे वाक्य इंग्रज नवऱ्याच्या बाबतीत संभवत नाही. 'स्वावलंबन' हा शब्द न उच्चारता ही मंडळी स्वावलंबी आहेत. 'आलाच आहात तर जेवून जा' हा आग्रह इथे होऊ



शकत नाही. प्रत्येक गोष्टीची गृहिणीला पूर्वसूचना द्यावी लागते. कचेरीतून येता येता बंडोपंत चार मित्रांना घरी चहाला घेऊन येऊ शकतात तसला प्रकार इंग्रजांना मानवत नाही. सारे काही आधी व्यवस्थित ठरवून. इंग्रजी जेवण अगदीच साधे असते. त्यातून मोठमोठ्या दुकानांतून भोजनविभाग असतात. त्यांत निम्मा स्वयंपाक तयार असतो.

उकडणे, उकळणे अगर तळणे एवढेच कार्य घरी करायचे. आपल्यासारख्या चटण्या-कोशिंबिरी–सांप्रदायातल्या मंडळींना ते जेवण जेवणच वाटत नाही. शिवाय दुकानात मिळणारे 'फ्रोझन फूड' अगर इतर मांसाहारी पदार्थ इतक्या स्वच्छ रीतीने ठेवलेले असतात की, बाजारी म्हणून आपण ज्याला समजतो तो बाजारी गलिच्छपणा तिथे अजिबात नसतो. त्यातून थंड हवेत माश्या, चिलटे हे प्रकार नाहीत. प्रत्येक वस्तू पारदर्शक कागदात गुंडाळून काचेच्या कपाटात ठेवलेली. दुकानदार ती चिमट्याने उचलून देणार. ह्या बाबतीत इंग्रजांचे सोवळे-ओवळे फार कडक आहे. तिथला खाटिकदेखील सर्जनसारखा दिसतो.

इंग्लिश हॉटेले तर स्वच्छतेच्या बाबतीत विलक्षण जागरूक असतात. लंडनमध्ये गरिबांची हॉटेले आहेत, श्रीमंतांची आहेत; परंतु पदार्थ मात्र दोन्ही ठिकाणी सारखेच मिळतात. किमतीत फरक पडतो तो मुख्यत: स्थानमाहात्म्यामुळे! एरवी जे स्टेक पाय सेविलसारख्या महागड्या हॉटेलात तेच लायन्ससारख्या जनता उपाहारगृहात! कमी पैशाची म्हणून गलिच्छ खाद्यवस्तू विकायची हा प्रकार तिथे संभवतच नाही. इंग्रजाला डुक्कर, बैल आणि बटाटा यापलीकडे इतर खाणे फारसे परवडतही नाही. मात्र खाण्याचे शिष्टाचार दांडगे! उकडलेले अर्धे अंडे जरी तो खात असला तरी त्याला ते विशिष्ट काटेचमचे लागणार. त्यामुळे इंग्रजी खाण्यात खाण्यापेक्षा खाण्याची उपकरणीच अधिक असतात. मात्र एखाद्या इंग्रज कुटुंबात बसून जेवणे हा एक अत्यंत आनंददायक अनुभव आहे. छोटे तीनचार लोकांचे कुटुंब असायचे. बहुधा आई, बाप आणि एकदोन मुले हा संच! तिथे थट्टा करीत, गप्पा मारीत भोजन चालायचे. एखादाच पदार्थ पण आईच्या पाककौशल्याचे कौतुक करीत खायचा.

एरवीचा अबोल इंग्रज जेवताना बोलका होतो आणि बडबड्या फ्रेंच जेवायला बसला की स्वादसमाधीत मूक होतो. इंग्रज गप्पा मारण्यासाठी जेवेल आणि फ्रेंच माणूस जेवायची वेळ झाली की जागतिक युद्धाच्या तहाची बोलणीदेखील थांबवून जेवायला उठेल. इंग्रजाला बटाटा

खाण्यापेक्षा आपल्या चिमुकल्या बागेत तो लावण्यात आनंद आहे. मला वाटते, इंग्रज हा हाडाचा शेतकरीच आहे. हार्वे स्ट्रीटमधला मोठ्यांतला मोठा सर्जन असो किंवा ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीतला तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक असो, त्याला चिखलात हात बुचकळून काढल्याखेरीज चैनच पडत नाही. तिथले मला भेटलेले गायक आणि नटदेखील कलेवरील चर्चा संपल्याबरोबर आपल्या बागेतील स्वतःची करामत दाखवायला मला घेऊन गेले. मला वाटते, बरेचसे इंग्रज बाग करायला कारण म्हणून घर घेत असावेत. स्वतःच्या परसातला कोबी किंवा टमाटो पाहूनच त्याला ढेकर येते; आणि म्हणूनच लंडनमध्ये नोकरी करणारे बहुतेक इंग्रज सुटी पडली रे पडली की खेड्यांच्या दिशेने पळतात, आणि मायभूमीच्या मातीत हात खुपसतात. म्हणूनच की काय कोण जाणे, इंग्रजांचे आपल्या मायभूमीवर अतोनात प्रेम आहे. माझी माती आणि माझे आकाश असे आपण अभिमानाने म्हणतो; पण आमचा पांढरपेशा कधी भरल्या डोळ्यांनी आकाश पाहात नाही आणि कधी आपले दोन्ही हात मातीने भरत नाही. नेहमीचे ढगाळलेले आकाश उजळले की इंग्रज धावत त्याच्या छताखाली येतो आणि मोकळा वेळ मिळाला रे मिळाला की त्या मातीशी खेळत राहतो!

लंडनला पोचल्यानंतर तीनचारच दिवसांनी मला एडिंबराचा नाटय-संगीतोत्सव पाहायला जायचे होते. त्या दोनतीन दिवसांत आम्ही लंडन-मधील काही प्रेक्षणीय स्थळे 'उरकून' घ्यायचे ठरवले. स्थळे पाहण्याच्या बाबतीत अमेरिकनांचा हात धरणारे प्रवासी अन्यत्र आढळणे विरळा! प्रेक्षणीय स्थळे आणि अमेरिकन प्रवासी हे हल्ली एक अविभाज्य जोडपे झाले आहे. गळ्याभोवती कॅमेऱ्याचा पट्टा लटकावून, कॅमेऱ्याच्या डोळ्यांनी पटापट स्थळे पाहून टाकण्याची त्यांची ताकद फारच मोठी आहे. किंबहुना प्रत्यक्ष स्थळ पाहण्यात वेळ न घालवता त्याचे घेता येतील तितके फोटो घेऊन परत अमेरिकेला पोचल्यावर ते फोटो सावकाश पाहत बसणे हीच त्यांची स्थळे पाहण्याची कल्पना असावी. पहिले दोन-तीन दिवस मीदेखील त्याच उत्साहाने लंडन पाहण्याचा बेत आखला होता, पण हा वेग केव्हाच ओसरला. कारण पहिल्या स्थळानेच माझा संपूर्ण दिवस खाल्ला.

बेकर स्ट्रीटच्या भुयारी रेल्वेतून बाहेर आले की मेरिलिबोन रस्ता लागतो. डाव्या बाजूला चारपाच मिनिटांच्या अंतरावरच एक घुमट दिसतो. नकाशात पाहून आम्ही तीच मादाम तुसॉदच्या मेणाच्या मूर्तींच्या प्रदर्श-नाची इमारत आहे याची खात्री करून आत शिरलो. तिकिटांची बरीच बारी लागलेली होती. बारी लावणे ही एक इंग्रजाला उपजत हौस आहे. दोन इंग्रज एकाशेजारी एक म्हणून कधी राहायचे नाहीत. लगेच रांग सुरू करतील. तिकिटांच्या खिडक्या असोत, आत्मसेवा उपाहारगृहे असोत, सभासंमेलने असोत, लिफ्ट असो किंवा टॅक्सी स्टँड असो — तीन इंग्रज एकत्र आले की 'बारी' सुरू! लग्नात वधूवर आणि पाद्रीदेखील बारी

लावतात म्हणे !

त्या तुसॉदबाईच्या दारात लांब ' क्यू ' होता; आम्ही त्यात नंबर लावून उभे राहिलो. तिकिटे काढून आलो. मामला निराळाच दिसू लागला. मेणाचा कुठे मागमूस नव्हता. या प्रदर्शनाबद्दल यापूर्वी बरेच ऐकले होते. तिथली सजीव माणसे व मेणाची माणसे यांत गोंधळ होतो, असे ऐकले होते. त्यामुळे जिन्यावरून जाताना शेजारचे माणूस खरे आहे की मेणाचे आहे हे आपले उगीचच पाहत होतो. लोकांच्यामागून निमूटपणाने जाता जाता एका गोलाकार प्रेक्षागारात शिरलो आणि आमच्या ध्यानात आले की, मेणाचे प्रदर्शन सोडून आम्ही ' कृत्रिम तारांगणात ' आलो होतो. यापूर्वी मी ' कृत्रिम तारांगण ' पाहिले नव्हते. पुण्याला न्यू इंग्लिश स्कूल-मध्ये एक तारांगण आहे ते पाहण्याचा संकल्प तसाच राहिला आहे. महादजी शिंद्यांची छत्री, रे इंडस्ट्रियल म्युझियम आणि ते तारांगण इतकी वर्षे पुण्यात राहून अजून ' घडायचा ' योग आला नाही. त्यामुळे अचानक-पणे कृत्रिम तारांगणात शिरण्याचा योग आल्यामुळे मला बरे वाटले. तसे मी खरे तारांगणसुद्धा नीटसे पाहिले नाही. सप्तर्षी, ध्रुव, व्याध, वगैरे मंडळींची व माझी फारशी ओळख नाही. सूर्य, चंद्र वगैरे हपीसर मंडळी सोडली तर बाकीच्या आकाशस्थ पदाधिकाऱ्यांचा माझा दुरूनच संबंध आला आहे. निळ्या, तांबड्या, हिरवट, पिवळ्या तेजाची सांडणी करणारी व्याधाची चांदणी माझ्या पत्नीने मला अनेक वेळा दाखविली आहे. आणि दर वेळी मी ती नव्या उत्साहाने पाहून त्यातली निळी, तांबडी, हिरवट तेजे मोजली आहेत. चुकून आकाशात नजर गेलीच आणि कुठल्याही दोन चांदण्या जवळ आलेल्या दिसल्या की, शनिमंगळयुती असावी असे मानून मी नाक्यावरच्या मारुतीला एक नमस्कार ठोकून देतो.

तारांगणातून निघून आम्ही मेणपुरीत शिरलो. इथे पुन्हा तिकिटांची बारी होतीच. वाराणशीत काशीविश्वेश्वराला जे महत्त्व आहे ते लंडनमध्ये ह्या मादाम तुसॉदच्या मेणाच्या प्रदर्शनाला आहे. आज जवळ जवळ दोन-अडीच शतके हे प्रदर्शन उभे आहे. तुसॉदबाई मूळ फ्रेंच. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळी ती इंग्लंडला पळून आली. तेव्हापासून आजतागायत

हे प्रदर्शन तिच्या वंशजांनी चालवले आहे. प्रासादतुल्य इमारतीत हे प्रदर्शन आहे. आत शिरल्याबरोबरच एका बाजूला मेणाचा द्वाररक्षक हशा पिकवतो. चार पायऱ्या चढून गेले की एक मेणाचा ' बॉबी ' आहे. वाढत्या कुतूहलाने आपण आत शिरतो आणि शेवटी बाहेर येताना मात्र तितक्याशा उत्साहाने परत येत नाही. ' हुबेहूब ' माणसांसारखी माणसे हेच या प्रदर्शनाचे कौतुक ! इंग्लंडच्या आणि युरोपच्या इतिहासातील प्रसिद्ध स्त्री-पुरुषांचे इथे आखबंद पुतळे आहेत. राजकारणी, संगीतज्ञ, शास्त्रज्ञ, साहित्यिक, खेळाडू असे निरनिराळे मृत आणि जिवंत लोक इथे मेणातून ओतले आहेत. ऐतिहासिक प्रसंग आहेत. मी आपले भारतीय थोर पुरुष कुठे सापडतात की काय पाहत होतो. शेवटी मला व्हिक्टोरिया क्रॉस मिळवलेले काही बहादर आढळले. आणि एका कपाटात महात्मा गांधी, नेहरू आणि पाकिस्तानचे पहिले गव्हर्नर जनरल म्हणून वर्णन केलेले महमदअली जिना हे तीन ओळखीचे चेहरे आढळले. त्यांपैकी गांधी बऱ्यापैकी जमले आहेत. बेंगरूळ काळा डगला घातलेले नेहरू हे मात्र आपल्याकडच्या एखाद्या दे. रु. ब्रा. संघाच्या कार्यवाहासारखे दिसतात. नेहरूंचा वर्ण इतका भाजणीच्या थालीपिठासारखा आहे हे मला तिथे कळले आणि जिनांच्या चेहऱ्यावरचा भाव अगदीच मऊ मेणाहूनी असा आहे. परिचित मंडळींच्या पुतळ्यांनी जराशी निराशाच केल्यामुळे ते प्रदर्शन माझ्या मनातून एकदम उतरले. कारागिरीच्या दृष्टीने पाहायचे म्हणजे कांबळे यांचे मेणाचे प्रदर्शन ह्या जागतिक कीर्ती संपादन केलेल्या प्रदर्शनाहून तसूभरही उणे नाही. पण कांबळे बिचारे दादरला एखाद्या उसाच्या गुऱ्हाळाशेजारी आपला तंबू ठोकतात आणि आण्या-दोन आण्यांत आपली कामगिरी दाखवतात. तुसॉदबाईच्या प्रदर्शनाचे तिकीट दोन रुपये असते !

लंडनला पहिले दोनतीन दिवस इतर काही मामुली खरेद्या, जागा पाहणे वगैरे प्रकरणांत गेले. कॉपेन गार्डन्स नावाच्या रस्त्यावर असलेल्या एका घरात आम्हांला एक खोली मिळाली. ह्याच खोलीत माझे एक मित्र राहिले होते आणि त्यांनी मालकीणबाईंना हिंदुस्थानातून पत्र लिहिले होते.

आम्ही जागा पाहायला गेलो. एका रुक्ष चेहऱ्याच्या इंग्रज बाईने आमचे स्वागत केले. आम्ही इंग्लंडला आल्याबद्दल कडक आनंद व्यक्त केला. मीदेखील माझ्या बुटाच्या नाडीशी खेळणाऱ्या तिच्या कुत्र्याचे दरोबस्त कौतुक केले, तिच्या बागेबद्दल दोन गोड शब्द बोललो. तिनेही हिंदी माणसांबद्दल चार तितकेच गोड शब्द काढले. आणि दीडएक पौंड भाडे वाढवून, ही जागा तुमच्यासाठी गेला महिनाभर सारखे नुकसान सोशीत राखून ठेवली आहे, असे आम्हांला सांगितले.

सुमारे दहा-बाय-बाराची ती खोली होती. त्यात एक वंग नाट्यविशारद सपत्नीक राहत होते. ते इंग्लंडला नाट्यशास्त्राचा अभ्यास करायला आले होते व एका आठवड्यानंतर परतणार होते. मीदेखील त्यातलाच आहे असे त्यांना सांगितले. पण मला फारसे बोलू न देता त्यांनी इंग्रजी रंगभूमीत हल्ली फारसा अर्थ कसा नाही वगैरे कथा ऐकवल्या. हल्ली नाट्याचा अभ्यास हा एके काळी थिऑसॉफी ज्या वर्गाच्या हाती होती त्या मंडळींच्या हाती गेला आहे. मला असल्या सैद्धान्तिक नाट्यकुशलांची




भीती वाटते. आम्ही बालगंधर्वांची नाटके, चिंतामणराव, गणपतराव, केशवराव दाते यांच्यासारख्यांच्या खड्या अभिनयावर पोसलेले; त्यामुळे

अभिनयाची सूक्ष्मातिसूक्ष्म लफडी आम्हांला कळत नाहीत. स्थूलावर प्रेम अधिक. त्यामुळे त्या चर्चेत माझी भूमिका नकळतच गरीब बिचाऱ्या माधुकऱ्याची झाली. मराठी रंगभूमीवर मी काही बोलण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याने कलकत्याच्या कुठल्याशा मंडळाने केलेले मराठी नाटक पाहून मराठी रंगभूमीविषयी आपली नापसंती मनात नोंदवून ठेवली होती. तो गेल्यावर त्या खोलीत जाताना ही खोली आपण एकदा स्वच्छ झाडून आत शिरले पाहिजे, एवढाच एक विचार मनात पक्का करून मी ती खोली पसंत असल्याचे मालकीणबाईंना सांगितले.

लगेच बाईंनी एक अटींची यादी माझ्यापुढे ठेवली. त्यात आठवड्याचे भाडे आगाऊ वगैरे 'घरमालक' ह्या संस्थेला साजेशा साऱ्या अटी होत्या. आम्ही दुसरी चांगली जागा मिळेपर्यंत इथेच तळ ठोकू, असा विचार करून आगाऊ भाडे भरले. उरलेल्या एक-दोन दिवसांत आणखीही काही जागा पाहण्याचा प्रयत्न केला आणि प्रथम आपण काळे आहोत याची जाणीव झाली. 'जागा भाड्याने देणे आहेत'च्या जाहिराती वाचून एखाद्या घरात जावे तर मालकीणबाई एक नजर टाकून 'अरेरे, आत्ताच जागा गेली' असे सांगत, तर काही प्रामाणिक मंडळींनी कृष्णवर्णीयांना जागा नाही, असे स्वच्छ लिहूनच ठेवले होते.

एका मालकिणीने 'आत्ताच जागा गेली' ही थाप मारल्यानंतर माझ्या पत्नीने "तुम्हांला आम्ही काळे आहोत म्हणून जागा द्यायची नाही असे स्पष्ट कां सांगत नाही?" असा खडा सवाल केला. त्या मालकीणबाईंनी तिला प्रेमाने आत बोलावले आणि तिच्या घरात राहणाऱ्या दोन हिंदी विद्यार्थ्यांच्या खोल्या उघडून दाखवल्या.

टेबलावर भाताची शिते व खरकटी भांडी पडली होती. खोलीभर सिगरेटची थोटके, कॉटवर बेसुमार कपडे, उघड्या ट्रंका, बूट अस्ताव्यस्त—

"तुमचं बरोबर आहे!"—माझ्या पत्नीने निमूटपणे कबुलीजबाब दिला आणि आम्ही मिळालेल्या त्या एका खोलीत राहायचे ठरवले.

लंडनमधल्या दोनतीन दिवसांच्या वास्तव्यानंतर आमचा पहिला मुक्काम होता स्कॉटलंडमधल्या पिटलॉक्री नावाच्या एका छोट्या खेड्यात. तिथे एक खास ग्रामीण वातावरणात नाट्यमहोत्सव होता. आम्ही पिटलॉक्रीला जायला लंडनमधल्या यूस्टन स्टेशनवर गेलो. मुंबईच्या बोरीबंदर, मुंबई सेंट्रल यांसारखी एका लंडन शहरात अनेक मोठी स्टेशने आहेत. स्कॉटलंडच्या दिशेने जाणाऱ्या गाड्या या यूस्टनवरून जातात; पण स्टेशनांची कळा मात्र आपल्या बोरीबंदरसारखीच. फरक एवढाच की गर्दी अजिबात नाही. ह्या प्रवासात मला इंग्लिश खेड्यापाड्यांचे आणि रानाकुरणांचे जे दर्शन झाले ते मी कधीही विसरू शकणार नाही. इटलीसारख्या निसर्गरम्य देशात राहूनदेखील ब्राउनिंगला 'अहाहा!— या वेळी इंग्लंडात असायला हवे होते. तिथे वसंत आला असेल आता!' अशा ओळी स्फुरल्या यात नवल नाही. इंग्लंडची सारी शोभा या ग्रामीण इंग्लंडमध्ये आहे. छोटी छोटी वने, उपवने, ओहोळ आणि ओढ्या-एवढ्याच चिमुकल्या नद्या, लहानग्या टेकड्या, त्यांतून डोकावणारी ती टुमदार इंग्लिश खेडी, आकाशात घुसणारे प्रार्थनामंदिरांचे कळस, उतरणीवर चरणारे गायींचे किंवा मेंढरांचे कळप, तारांच्या कुंपणावर बसून धावत्या गाडीला हात दाखविणारी इंग्लिश मुलेमुली, एखाद्या नदीकाठी पाण्यात गळ टाकून बसलेला म्हातारा, मधून मधून दृष्टीपुढून सरकणारे एखादे हिरवेगार क्रीडांगण, त्यात रंगात आलेला गावठी क्रिकेटचा सामना, टेकडीवर नागमोडी धावत पळणारे रस्त्याचे मोहक वळण, रंगीबेरंगी लोकरी कार्डिगन्स घातलेल्या, सफरचंदी गालाच्या, सोनेरी केसांच्या तरुणींचा सायकलवरून पिकनिकला निघालेला आणि रेल्वेच्या लेव्हल क्रॉसिंगशी

अडकलेला घोळका, आगगाडीची टुमदार स्टेशने, एवढ्या-एवढ्याशा घरातून डोकावून कडेवरच्या गुबगुबीत गुंड्याला आगगाडी दाखवणारी एखादी गृहिणी, खेड्यातल्या चर्चच्या दाराशी थबकलेल्या पावसात इंग्लिश रमा-काकू ठमाकाकूंचा काळ्या झग्यांतला थवा, ओक वृक्षाखाली तोंडावर हॅट ओढून स्वस्थ झोपलेला एखादा म्हातारा, धिप्पाड घोड्यांची जोडी नांगराला जोडून शेतात राबणारा शेतकरी, ठिकठिकाणी दिसणारी व्हिटनेज एलची जाहिरात, गावागावांना जोडणाऱ्या रस्त्यांतून पळणारी लालभडक बस ह्यांतले एक एक दृश्य म्हणजे कवी-चित्रकाराला आव्हान आहे.




आमच्या सुदैवाने आकाश बरेचसे निरभ्र होते आणि सूर्य-नारायण प्रसन्न होता. आमच्या डब्यात मी, माझी पत्नी आणि इतर एकदोनच सहप्रवासी होते. इंग्रजांच्या अबोल स्वभावाची खरी कल्पना आगगाडीच्या प्रवासातच येते. समोरासमोर बसायचे — तास न् तास एकत्र बसायचे, परंतु एक अक्षर बोलायचे नाही, ही मौनसाधना तोच करू जाणे.

पण बर्फासारखा तो काही कारणाने वितळला तर मग त्याच्यासारखा सोबती नाही. आपल्या विनोदबुद्धीचे सारे गर्वहरण तो एका क्षणात करतो.

इंग्लंडमधल्या आगगाड्यांतून दूरचा प्रवास करताना स्टेशने लागली की एक गोष्ट खटकते. स्टेशनात ' चाय गरऽऽम ' किंवा तत्सम आरोळी नाही. सारे काही सामसूम. त्या मानाने आपल्या स्टेशनावरचा गोंधळ पाहण्यासारखा असतो.

" हमाल — हमाल ! "

" हं बगे, घूस, आत घूस — बघतेस काय वेंधळ्यासारखी ! "

" फिरकीचा तांब्या आला का ? "

" सोडा-लेमन हेऽऽ "

" पान-बिडी-माचीस — "

" बरंय मग बापूसाहेबांना सांगा. म्हणावं, जळगावहून अण्णाचं पत्र आलं की कळवतो — "

" डोळे फुटले का — "

" जागा नाही, पुढे जा, पुढे जा — "

" बापाची गाडी का तुमच्या ? "

" साहेब, तळेगावला थांबते का गाडी ? "

" गार्डाला विचारा ! " — अशांसारखे एकही वाक्य ऐकू येत नाही. निमूटपणे गाडी येते. माणसे निमूटपणे चढतात — गाडी तडक पुढल्या स्टेशनच्या दिशेने जाते.

आमच्या समोरचा प्रवासी पहिले दोनतीन तास स्वस्थ बसला होता. पुढे कशामुळे कोण जाणे, पण त्यालाही कंठ फुटला. आणि पुढे पर्थला गाडी बदलेपर्यंत अनेक गोष्टींवर गप्पा झाल्या. दीडशे वर्षे आपल्या देशात तळ ठोकूनही सामान्य साहेबाचे भारत व भारतीय ह्या विषयांवरचे अज्ञान गाढ आहे. माझ्या सहप्रवाशाला हिंदुस्थानात हत्ती आणि वाघ आहेत, एवढी मौलिक माहिती होती. मीदेखील ' आताशा पूर्वीसारखे हत्ती राहिले नाहीत,' असे सांगून सुस्कारा सोडला. पर्थला गाडी बदलावी लागली. गाडी बदलायचा प्रसंग आला की माझ्या पोटात गोळा उभा राहतो.

इतकी वर्षे कोल्हापूरला जाऊनही मिरजेला गाडी बदलताना आपण बार्शी लाईट रेल्वेमध्ये शिरलो नाही ना, याची मी खात्री करून घेतो. आम्ही पर्थला उतरलो. तेव्हा दिवेलागणी होऊन गेली होती. स्टेशनात रेल्वेचे अधिकारी सोडून प्रवासी असे एकूण तीन किंवा चार असतील. ह्या ब्रिटिश रेल्वेज चालतात कशा, हे मला खरोखरीच कळत नाही. फलाटावर पाचाच्यावर माणसे क्वचितच आढळतात. पर्थच्या त्या भयाण फलाटावर पिटलॉक्रीच्या गाडीतून जाणारे फक्त आम्ही दोघेच होतो. एकदोन पोर्टरना आम्ही 'पिटलॉक्रीला जाणारी गाडी हीच का हो?' असे विचारून पाहिले परंतु आमच्या इंग्रजीचे बी त्यांच्या कानात रुजले नाही. इंग्रजीचे ग्रामीण अवतार अगम्य आहेत. बी. बी. सी.—वरचे इंग्रजी व जनतेचे इंग्रजी ह्यांत, जमीनअस्मानाचा फरक आहे. लंडनमधले कॉकने-इंग्रजी, लँकेशरचे इंग्रजी, मिडलंड्समधले इंग्रजी, स्कॉट-लंडमधले इंग्रजी, हे पुणेरी मराठी, कोकणी, मालवणी, हळवी आणि कारवारी इतके भिन्न आहे. त्यातून आमचे शुद्ध तर्खडकरी इंग्रजी असल्यामुळे पहिले काही दिवस जरा अवघडच गेले.





संध्याकाळी आठच्या सुमाराला आम्ही पिटलॉक्रीला पोहोचलो. आपल्या मळवली स्टेशनासारखे ते छोटेसे स्टेशन आहे. स्टेशनाजवळ 'मॅक्केज'







नावाच्या हॉटेलमधे आमची राहण्याची सोय झाली होती. आम्ही त्या खाजगी हॉटेलात शिरलो आणि एका मध्यम वयाच्या बाईने 'घेशफँडे' असा आमच्या उपनावाचा उच्चार करीत आमचे स्वागत केले. ब्रिटिश कौन्सिल ह्या संस्थेच्या कार्यक्षमतेबद्दल लिहावे तेवढे थोडेच आहे. आमची राहण्याची व्यवस्था, नाटकांची तिकिटे, प्रेक्षणीय स्थळांची यादी, ओळखपत्रे सर्व काही तिथे तयार होते.

आपल्याकडल्या जैनांसारखा साहेबदेखील सूर्यास्तापूर्वी जेवून घेतो. त्यामुळे आम्ही खोलीचा ताबा घेऊन जेवायला खाली आलो तेव्हा जेवणाची वेळ टळली होती. सुटीचे दिवस असल्यामुळे ते लहानसे हॉटेल संपूर्ण भरलेले होते. प्रत्येकजण 'खा, प्या, मजा करा'च्या रंगात होता. आम्ही लाउंजमध्ये शिरल्याबर कॉफी प्यायला जमलेल्या सर्व अनोळखी मंडळींनी आमचे स्वागत केले. आणि स्कॉटिश लोकांच्या मोकळ्या स्वभावाचा अनुभव आला. लंडनमधल्या पहिल्या तीनचार दिवसांत

मी जरा हबकलो होतो. साहेब चेहऱ्याची घडी मोडायला तयार नसायचा. इथे प्रकार वेगळा होता. हॉटेलमधल्या बायकांनी माझ्या पत्नीची आपण होऊन ओळख करून घेतली; आणि पहिल्याच दिवशी त्या हॉटेलच्या लाउंजमधे आमच्या गप्पा रात्री बारापर्यंत रंगल्या. तिथल्या प्रवासी तरुणतरुणींनी दुसऱ्या दिवशीच्या सहलीत आमची ही जिम्मा करून घेतली.

दुसऱ्या दिवशी सकाळी आमची टोळी फिरायला निघाली. पिटलॉक्री आपल्या खंडाळ्यासारखे गाव आहे. फार फार तर पाचसहा हजार वस्तीचे हे गाव असेल. परंतु स्कॉटलंडमधल्या प्रेक्षणीय स्थळांपैकी हे एक स्थळ असल्यामुळे गावातील निम्मी घरे म्हणजे छोटी छोटी हॉटेले आहेत. आमचे हॉटेलदेखील एका छोट्याशा कुटुंबाच्या मालकीचे होते. मालकीण व तिची म्हातारी सासू राबताना दिसत असे. मालक मात्र मधूनच दिसायचे आणि 'हलो ऽऽ' अशी आरोळी देऊन आपल्या खोलीत पळायचे. फ्रेंच चित्रकाराप्रमाणे छोटी दाढी ठेवलेला सडपातळ बांध्याचा हा हॉटेलवाला आपल्या खोलीत बसून करतो काय, हे मला कोडेच होते.

पिटलॉक्रीला रपेट करताना सह्याद्रीच्या कडेकपारीतून आपण हिंडत आहोत असे वाटते. भोवताली डोंगर, दोन्ही बाजूंना गर्द झाडी, खोल दऱ्या, सुंदर प्रपात, वळणावळणावर डोकावणारी टमेल नदी, या नदीवर ठिकठिकाणी टाकलेले पूल आणि पुलांच्या कठड्यांना रेलून भोवतालच्या दृश्याने भारावून गेलेले तरुणतरुणींचे मेळावे! त्या टुमदार स्कॉटिश घरांच्या भिंतीवर गुलाबांचे वेल चढवलेले होते आणि ती घरे गुलाबांनी अक्षरशः मढली होती. परदेशात स्प्रिंग, समर, ऑटम आणि विंटर हे चारच ऋतू! एरवी वर्षा ऋतू वर्षभर, आणि शरदाचे चांदणे हा अनुभव जवळ जवळ नाहीच.

"आणखी पंधरा दिवसांनी तुम्ही इथे या, तुम्हाला सारे रंगच पालटलेले दिसतील." आमच्या कंपूतला एक तरुण म्हणाला. तो डंडीला एका बँकेत कारकून होता. दुसराही बँकेतच नोकर होता. ते दोघेही स्कॉटिश होते. शिवाय दोन इंग्रज पोरी होत्या, आणि एक जर्मन मुलगी होती. वर्षभर नोकरी करून पैसे साठवायचे आणि मग दोन किंवा चार आठवड्यांची

उन्हाळी सुटी घेऊन ते खर्च करून टाकायचे, असा सरळ हिशेब आहे. सारे इंग्लंड, युरोप त्या वेळी प्रवासात असते. तरुणतरुणीच काय, पण जख्ख म्हाताऱ्यादेखील एकट्यादुकट्या प्रवासाला निघतात. काही कुटुंबे आपल्या मोटारींना 'कारवान' जोडतात. ह्या कारवानमध्ये सारा फिरता संसार असतो. सुंदर स्वयंपाकघर असते, ते गुंडाळून झोपायची खोली होते, लिहिण्यावाचण्याची अभ्यासिका होते——सारे काही होते. असे शेकडो कारवान उघड्यावर तळ ठोकून पडलेले होते——मध्यमवयस्क आणि म्हातारी माणसे गोल्फ खेळत होती. बोलिंग ग्राउंडावर गोळे फेकत होती. आमच्या गटातल्या मंडळांच्या डोक्यात डोंगरमाथा गाठायचे आले आणि आम्ही एका डोंगराच्या दिशेने मोर्चा वळवला.

मी हिंदुस्थानातला असल्यामुळे हिमालय तीनचार वेळा चढून आलो आहे अशी बहुतेकांची समजूत असावी. त्यातून आमचा महाराष्ट्र असाच डोंगराळ आहे, असा कबुलीजबाब मीच दिला होता. त्यामुळे डोंगरमाथा गाठणे ही परीक्षेची वेळ होती. त्यातून सोबत नूतनपरिचित तरुणी! मायभवानीचे नाव घेऊन डोंगर चढायला सुरुवात केली. शाळेत स्काऊट-मध्ये असताना सिंहगड एकदा चढलो होतो. त्यानंतर सुमारे पंचवीस वर्षांनी डोंगराचा आणि आमचा योग आला होता. एकूण स्वभाव बैठ्या मैफलीतला असल्यामुळे प्रकरण बिकट गेले. त्यातून त्या पोरींना गाण्याची लहर आली. माझ्या छातीच्या भात्यांनी लोहाराची भट्टी तापली असती. तशा अवस्थेत मी त्या गिर्यारोहणात आठवतील ते हिंदी-मराठी शब्द दडपून 'कदम कदम बढाये जा' ठोकून दिले; आणि त्या पोरींनी माझा आवाज भलताच 'स्वीट' आहे म्हणून मला त्या डोंगराच्या जोडीने हरभऱ्याच्याही झाडावर चढवून टाकले. डोंगर हा एक लुच्चा प्रकार आहे. शिखर आल्यासारखे वाटते आणि चढण मात्र संपत नाही. मात्र शेवटी एकदाचे आम्ही त्या माथ्यावर जाऊन पोचलो आणि भोवती पसरलेले स्कॉटलंड डोळे भरून पाहिले, तेव्हा त्या श्रमांचे चीज झाल्यासारखे वाटले.

वास्तविक मी पिटलॉक्रीला निसर्गसौंदर्य पाहण्याच्या अपेक्षेने आलो

नव्हतो. एवढेच काय पण पिटलॉक्री हे इतके रमणीय स्थळ आहे याची देखील मला कल्पना नव्हती. मी आलो होतो तिथला नाट्योत्सव पाहायला. त्या एवढ्याशा गावात हा उत्सव एकोणीसशे एक्कावन्न साली सुरू झाला. जॉन स्टुअर्ट नावाच्या, आपल्या मुंबई मराठी साहित्य संघाच्या डॉ. भालेरावांसारख्या नाट्यप्रेमी गृहस्थाने ह्या डोंगराळ मुलखात एका मोठ्या तंबूत नाटके करायला सुरुवात केली; आणि ह्या नाट्योत्सवात अपार श्रम करता करता त्याचे निधन झाले. सध्याचे सूत्रचालक मि. केनेथ आयर्लंड ह्यांना मी भेटलो. त्यांच्याशी गप्पा मारताना मला भालेरावांच्या परिश्रमांची आठवण झाली. जॉन स्टुअर्टची आणि भालेरावांची किंवा नागपूरच्या नाना जोगांची धडपड अगदी सारखी! तशाच आर्थिक अडचणी, तेच नटनटींना गोळा करण्याचे परिश्रम आणि उत्तमोत्तम नाटके पाहण्यासाठी लोकांना नाट्यगृहांकडे खेचून आणण्याची ह्या लोकांची तीच मनीषा; आणि ह्या कार्यात गुंतलेले असताना ह्या तिघांचाही तसाच अचानक अंत! हा योगायोग पाहून मला विलक्षण आश्चर्य वाटले. पक्के थिएटर बांधण्यातल्या त्यांच्या अडचणी आणि आपल्या अडचणी ह्यांत काहीच फरक नव्हता. सुरुवातीला हा एक मोठा तंबू होता. पुढे एका मोसमात वादळाने तो उडून गेला. त्यांनी सर्वस्व पणाला लावून एक ॲस्बेस्टसचे सुमारे सातआठशे लोक बसू शकतील असे टुमदार थिएटर बांधले आहे आणि आतून मात्र जुन्या तंबूच्याच कापडाने ते सजवले आहे.

दर वर्षी उन्हाळ्याच्या सुटीत ठिकठिकाणची प्रवासी मंडळी इथे जमतात आणि लंडनहून नटसंच येऊन ह्या चिमुकल्या थिएटरात नाटके करतात. एप्रिल ते ऑक्टोबर हा नाट्य, संगीत आणि चित्रकला महोत्सव ह्या एवढ्याशा खेड्यात चालत असतो. ह्या नाट्यगृहाला 'स्कॉटलंड्स थिएटर इन द हिल्स' असे म्हणतात.

परदेशातील रंगभूमीवरचे पहिले नाटक मी ह्या पिटलॉक्रीच्या रंगमंचावर पाहिले. 'व्हाइट फाल्कन' नावाचे आठवा हेन्री आणि ॲन बुलिन यांच्या प्रेमप्रकरणावर आधारलेले हे नाटक होते. लेखकही नामवंत नव्हता आणि नटही नामवंत नव्हते. इथे मला प्रथमच लंडनच्या वेस्टएंडपर्यंत

नाटक पोचविणे ही एक किती दुरापास्त गोष्ट आहे, याची जाणीव झाली. आपल्याकडे गंधर्व कंपनी किंवा बलवंत, ललितकलादर्श यांच्यासारख्या मातब्बर कंपन्या पुणे, मुंबई, अमरावती, नागपूर करीत असताना प्रभात संगीत मंडळी किंवा देशबंधू वगैरे दुय्यम दर्जाच्या फिरत्या कंपन्या खेड, मंचर, वाशीम, खामगाव, एरंडोल, पाचोरे करीत हिंडत असत. इंग्लंडमध्ये आजतागायत हीच अवस्था आहे. पिटलॉक्रीच्या उत्सवात असल्या दुय्यम दर्जाच्या, वेस्ट एंडवर ज्यांचा नंबर नाही अशा कंपन्या येतात. प्रथम नाटक अशा आडगावी काढायचं आणि ‘पब्लिक’ कसे काय उठाव देते ते पाहून मग लंडनच्या दिशेने खटपट सुरू करायची. काही काही रिपर्टरी कंपन्या आयुष्यभर इतरत्रच वाट काढीत असतात. मी असल्या कंपन्यांनी केलेली नाटकेही पाहिली. अभिनयाच्या किंवा निर्मितीच्या दृष्टीने हीदेखील मंडळी उणी नसते. पुष्कळदा तर ह्यातल्या काही गुणी कलावंतांचा अभिनय पाहिला की ‘तकदीर आणि तदबीर’च्या सिद्धान्तावर विश्वास बसायला लागतो. मी पिटलॉक्रीला पाहिलेला आठव्या हेन्रीचे काम करणारा नट असाच गुणी होता. ॲन बुलिनचे काम करणारी नटीदेखील अतिशय रेखीव काम करून गेली. चार्ल्स लॉटनने चित्रपटात रंगविलेला आठवा हेन्री आणि ह्या प्रसिद्धीचा झगझगाट न लाभलेल्या नटाने उभा केलेला आठवा हेन्री ह्यांत डावे-उजवे ठरवणे अवघड गेले असते. वागण्यातला तोच एक निर्बुद्ध स्वार्थ, आवाजात तीच अधाशी वखवख आणि शकारासारख्या स्वभावाचे एकमेकांत वेडे-वाकडे जाऊन गुंता झालेले अस्सेच धागेदोरे! पण चार्ल्स लॉटन आज अनेक वर्षे कीर्तीच्या शिखरावर मुक्काम ठेवून बसला आहे. अर्थात ती त्याची निर्विवाद योग्यता आहे. पिटलॉक्रीच्या त्या आठव्या हेन्रीची भूमिका करणाऱ्या अनोळखी नटालाही कधीकाळी असे स्थान मिळावे असे मला राहून राहून वाटले. ते वास्तविक मी परदेशात पाहिलेले पहिले नाटक! त्यानंतर मी माझ्या पुढच्या मुक्कामात नाटकाचे अर्धशतक गाठले — पण पिटलॉक्रीचा तो आठवा हेन्री आजही माझ्या डोळ्यांपुढे उभा आहे! विशेषतः ॲन बुलिनकडे प्रथम पाहताना ज्योतिबाच्या जत्रेत एखाद्या

शेतकऱ्याच्या पोराने हलवायाच्या दुकानातले साखरेचे रंगीत चित्र ज्या अधाशीपणाने पाहावे तसे तो पाहात होता. त्या पाहण्यात अधाशीपणा होता आणि एक अजाण असहायताही होती. त्या डोळ्यात ' हे पाखरू मजसि येइल काय कामा 'च्या धर्तीचा पटाईत कामुकाचा साचेबंद अभिनय नव्हता आणि म्हणूनच त्याच्या त्या तसल्या पाहण्यातून त्याच्या त्या कामुकतेविषयी प्रेक्षकांच्या अंतःकरणात त्याने एक सहानुभूतीचा रंग मिसळण्यात यश मिळवले. स्वभावातला दुष्टपणा दाखवण्याऐवजी ' आदतीतली मजबूरी ' तिथे दिसली आणि क्षणार्धातच तो नट एक सुंदर अभिनयाची सीमा गाठून गेला.

ह्याच रंगमंचावर मी शॉचे ' यू नेव्हर कॅन टेल ' हे विनोदी नाटक पाहिले. शॉने दाखवलेले ते सामाजिक उच्चनीचतेचे थर आज आंग्ल समाजात अपवादानेच आढळतात. आणि म्हणूनच शॉवर प्रासंगिकतेचा आरोपही केला जातो. परंतु शॉचे संवाद प्रेक्षागाराला टोलवीत होते आणि हशाच्या घावावर घाव निघत होत्या. आठव्या हेन्रीचे काम करणाऱ्याच नटाने त्यातल्या बोहम ह्या वकिलाची भूमिका केली. इथे त्याचा अवतार अगदी निराळा होता. फक्त आवाजात आठवा हेन्री डोकावून जायचा. कदाचित आदल्याच दिवशी त्याचे ते नाटक पाहिल्यामुळे त्याच्या आवाजाच्या अनेक छटा माझ्या लक्षात राहिल्या असाव्यात.

पिटलॉक्रीचे हे थिएटर कच्चे असले तरी रंगमंचावरची साधने अत्याधुनिक आहेत. प्रकाशयोजना त्यानंतर मी पाहिलेल्या अनेक सुसज्ज नाट्यगृहांत असते तशीच होती.

ह्या नाट्यगृहाइतकेच पिटलॉक्रीचे दुसरे मोठे आकर्षण म्हणजे तिथल्या टमेल नदीचा बांध आणि त्यातील सामन माशांची शिडी! सामन हा पाश्चात्त्य देशात किंग सामन म्हणून ओळखला जातो. भगवंतांनी स्कॉटलंडमध्ये गीता सांगितली असती तर ' मासानां मार्गशीर्षोऽहम् '-च्या जोडीला ' मत्स्यानामस्मि सामनः ' असे म्हटले असते. ह्या मत्स्यराज सामन नृपतींना आपल्या राण्यांसमवेत रासक्रीडा करायला फार स्वच्छ पाणी लागते. टमेल नदीचा बांध चढून ते आपला कबिला घेऊन रतिरंग

करायला वर येतात. पाण्याच्या प्रचंड नळांना ठिकठिकाणी काचेच्या खिडक्या लावल्या आहेत. त्यात डोळा घालून बसायचे आणि प्रवाहाच्या उलट दिशेला आपला झनाना घेऊन सामनराज वर जाताना पाहायचे, हा इथे येणाऱ्या प्रवाशांचा उद्योग. मी तीन वेळा सकाळी जाऊन खिडकी धरून बसलो, पण त्या टमेल नदीतला सामन माशांचा राजवंश त्या वेळी व्रतस्थ असावा! माझ्या हॉटेलपासून ही ' शिडी ' जवळच होती. कोणी सांगत —— ऊन पडले की सामन रंगात येतात. ऊन पडल्यावर धावत जाऊन पाहून आलो. एक दोन मासे प्रवाहाच्या उलट दिशेला गेल्याचा भास झाला. तेच सामनसाहेब असावे असे मनाशी ठरवून मी देखील लाउंजमधल्या गप्पांत सामन आणि त्याचा तो रतिसोपान ह्या विषयावर माझी मते देऊ लागलो. पिटलॉक्रीला जाऊन सामन पाहिला नाही असे सांगणे म्हणजे गायकवाडवाड्यात जाऊन ' टिळकांचा एकही फोटो अथवा पुतळा आढळला नाही बुवा! ' म्हणत येण्यापैकी आहे. ते पाप कबूल करण्याचे मला तरी धैर्य नव्हते.

पिटलॉक्रीचा आणि आमचा अवघ्या चारपाच दिवसांचा ऋणानुबंध. पाश्चात्त्य जीवन आम्ही अगदी जवळून पाहण्याचा प्रथमच योग आलेला. मॅकीज हॉटेलमध्ये जमलेले स्त्रीपुरुष हॉलिडे मूडमध्ये असल्यामुळे दिवसभर भटकणे, संध्याकाळी नाटक पाहणे आणि रात्री बारा बारा वाजेपर्यंत लाउंजमध्ये गप्पा मारणे असा झक्क कार्यक्रम चालला होता. इतक्या दिवसांत त्या हॉटेलचा मालक मात्र ओझरता दिसायचा. दोन-तीन बायकाच राबताना दिसायच्या. शेवटल्या दिवशी रात्री कुणी तरी पिआनो वाजवायला सुरुवात केली, आणि साहजिकच भारतीय संगीताची अब्रू राखण्याचे काम माझ्यावर आले. मी पिआनोवर चक्क ' वद जाउ कुणाला शरण ' वडवायला सुरुवात केली, आणि मालक वरून धावत आला. मी जरासा चरकलो. पण त्याने लगेच माझ्याशी मेलडी आणि हार्मनी यांवर चर्चा केली. त्याला जोगियाचे सूर अरबी कारवानच्या संगीतासारखे वाटले. शेवटी नेहमीप्रमाणे आपल्या खोलीत तो गुप्त झाला.

दुसऱ्या दिवशी सकाळच्या गाडीने आम्हांला निघायचे होते. म्हणून

सकाळी उठल्याबरोबर बिल चुकते करावे म्हणून त्याची खोली उघडली आणि मी थक्कच झालो. खोली नाटके आणि नाट्यविषयक ग्रंथांनी भरलेली होती. भिंतीवर अत्याधुनिक धर्तीची जलचित्रे होती. एका टेप रेकॉर्डरवर कुणाचे तरी नाटकातले भाषण ऐकत स्वारी तोंडात पाईप घेऊन बसली होती. हा खाणावळवाला ' माझिया जातीचा ' निघाला हे पाहून मला अतिशय आनंद झाला. त्या एवढ्याशा खेड्यात त्याची एक नाट्य-संस्था होती आणि त्याची नव्या नाटकाची तयारी चाललेली होती. त्या नाटकात इफेक्ट म्हणून ओरिएंटल मेलडी हवी होती आणि ' वद जाउ कुणाला 'च्या धर्तीवर इंग्रजी स्वर तो भाषणाच्या पार्श्वभूमीवर पार्श्वसंगीता-सारखे गुणगुणून पाहात होता. माझी गाडी सुटायला फक्त पंधरावीस मिनिटे अवकाश होता. " रात्रभर मी तुझे स्वर लक्षात ठेवायचा प्रयत्न करीत होतो. दे वेअर हॉटिंग मी — मी ते रात्रीच रेकॉर्ड करून घ्यायला हवे होते. " माझाही नाइलाज झाला. कारण गाडी चुकवणे मला शक्य नव्हते. मला त्या संध्याकाळी एडिंबराला पोचणे आवश्यक होते. त्या सर्वांचा




निरोप घेऊन आम्ही बॅगा उचलून स्टेशनात आलो. स्टेशनात शुकशुकाट होता. स्टेशनमास्तरचा पत्ता नव्हता. तिकिटाची खिडकी बंद होती. गाडीची वेळ होत आली आणि तेवढ्यात ताकारी किंवा शेणोली स्टेशन-वरच्या मास्तरांसारखे हे स्टेशनमास्तर डुलत डुलत आले.

" गाडी लेट आहे का ? "

" कुठली ? "

" एडिंबराला जाणारी—"

" एडिंबराला जाणारी गाडी आता कुठे आहे ! "

" म्हणजे ? सकाळी साडेनऊला गाडी आहे असं आपणच मला काल सांगितलंत. "

" पण आज रविवार आहे. रविवारी फक्त संध्याकाळी इथून गाडी निघते. "

" पण काल आपण मला तसं सांगितलं नाही ! " मी साऱ्या मराठी शिव्या मनात मोजून उद्गारलो.

" पण आज रविवार आहे हे मला काय ठाऊक ? "

" स्कॉटलंडमध्ये रविवार शनिवारनंतर येत नाहीत वाटतं ? " ह्या आमच्या संतापापोटी जन्मलेल्या विनोदाला तो मात्र जोरात हसला आणि आपल्या हपिसात नष्ट झाला. आम्ही निमूटपणे बॅगा उचलून खाली मान घालून हॉटेलच्या दिशेने पावले टाकू लागलो. आम्ही सारे सगळ्यांचा गळा भरून निरोप घेतला होता. आमची ही खट्टू परिस्थिती पाहून एका इंग्लिश जोडप्याला आमची दया आली. त्यांनी आम्हांला आपल्या गाडीत घातले आणि मग त्यांच्या गाडीतून हायलंडच्या त्या रम्य प्रदेशातून आम्ही दिवसभर भटकलो. व्हाईट पतिपत्नी आणि त्यांची मुलगी आमच्या हॉटेलात राहात होती. आपली गाडी घेऊन हे कुटुंब स्कॉटलंड पालथा घालीत होते. त्यांच्याबरोबर दिवसभर आम्ही त्या डोंगराळ मुलखातून घाटाची वळणे घेत घेत लॉक टमेलच्या काठाकाठाने टुमदार खेडी ओलांडीत तो भाग पाहून घेतला. दिवस मावळताना एका डोंगरमाथ्यावर आम्ही गाडी थांबविली. खाली खोल दरी होती. दरीतच एक खेडे वसले होते. घरांच्या चिमण्यांमधून कापरा धूर येत होता. हायलंडर्सचे संध्याकाळचे भोजन तयार होत होते. गुबगुबीत मेंढरांचे कळप उतरणीला लागले होते. अशी भरदार मेंढरे मी आयुष्यात पाहिली नव्हती. मधून स्कॉटिश लोकांचा तो विशिष्ट पद्धतीचा स्कर्टवजा चट्टेरी पट्टेरी आखूड

झगा घातलेले तगडे हायलंडर्स रपरप करीत जाताना दिसत होते आणि त्या अंधुक प्रकाशात टमेलचे विस्तीर्ण सरोवर उंच सूचिवृक्षांतून डोकावत होते. कोणत्याही सुंदर संध्यासमयी वाटणारी हुरहूर मनाला वाटत होती. सोबतचे व्हाईट कुटुंबही मोठे सौम्य होते. अशा त्या गूढ वातावरणात त्या खोल दरीतून एकाएकी बॅग-पाईपचे स्वर त्या डोंगरमाथ्यावर उधळले गेले. त्या रम्य सांध्यभावात ते पुंगीसारखे स्वर इतके मिसळून गेले की, ते दृश्य मनात चित्रांकितच नव्हे तर स्वरांकितही होऊन गेले ! लोणावळ्याला ' टायगर्स लीप 'च्या कड्यावरून तळकोकणची हिरवी शोभा पाहता पाहता पायथ्याच्या खेड्यांतून असेंच अचानक सनई-चौघड्यांचे कुण्या पाटलाच्या पोराच्या लग्नाच्या मांडवात वाजलेले सूर साऱ्या दरीत तुडुंब भरले होते. सनईची एक जादू आणि ह्या बॅगपाईपची दुसरी ! एकेका वाद्याची मौज आहे···सनई देवळाच्या नगारखान्यातून वाजावी आणि देवाच्या तळ्यात पाय बुडवून कानात भरून घ्यावी. सतार कुशल वादकासमोर बसून हितगुज केल्यासारखी ऐकावी. सारंगी हिरव्या माडीत तरी मन-मोकळेपणाने बोलते, नाही तर ऑर्गनच्या सुरात नाट्यगृहात खुलते. एकतारी विठोबाच्या देवळाच्या पायरीवर साजरी दिसते. तंबोऱ्याचे गुंजन हंड्या-झुंबरांच्या माडीत एके काळी ऐकले, त्याच्या आठवणी अजून बुजत नाहीत. पावा कुरणाच्या एका टोकाला वाजावा आणि दुसऱ्या टोकाला वडाच्या सावलीत पडून ऐकावा. पण बॅगपाईप हे स्कॉटिश सुषिरवाद्य ऐकायला मात्र स्कॉटलंडच्याच डोंगराळ मुलुखात यायला हवे ! हे रणवाद्य



म्हणून आपण ओळखतो. पण हायलंडर्सच्या मुलुखात संध्याकाळी हे वाद्य वाजले की प्रणयिनी व्याकूळ होत असाव्यात, आणि मेंढरांची वाटचाल आपोआपच घराच्या दिशेने होत असावी. हे वाद्य केवळ समरभूमीवरच नव्हे तर स्मरभूमीवर देखील आर्त आव्हान देते !

ते स्वर आणि ते विलोभनीय दृश्य भरल्या डोळ्यांत घेऊन आम्ही एडिंबराच्या मुक्कामासाठी पिटलॉक्री सोडली. भोवतालची गर्द बने वाढत्या थंडीत काळोखाची कांबळी ओढत होती. वातावरण पऱ्यांच्या पानापानांवरील नृत्याची वाट पाहत गूढ-गूढतम होत होते. पिटलॉक्रीतला तो आठवा हेन्री, ते लॉक टमेल, ती सूचिवृक्षांची भव्य जंगले, तांबूस सोनेरी अशा लांब लांब केसांच्या वनगायी — ' भारतात येण्याइतके पैसे जमवून आम्ही नक्की तुमच्या घरी येऊ, ' असे आश्वासन दिलेल्या त्या इंग्लिश पोरी. काहीशा भारावलेल्या अवस्थेत आम्हांला आमची गाडी तीनचार तासांच्या प्रवासा-नंतर एडिंब्राला घेऊन आली.

एखाद्या अनोळखी गावी रात्रीच्या वेळी पोचण्यात एक अनोखी गंमत असते. त्या गावी पोचण्यापूर्वी आपण मनातल्या मनात त्या शहराबद्दल काही अंदाज बांधीत असतो; आणि मग अंधार पडल्यावर रस्त्यातल्या दिव्यांच्या प्रकाशात काही निराळेच दिसायला लागते — आणि सकाळी उठून खिडकीबाहेर नजर टाकली की आपले सगळे अंदाज कसे चुकले ते लक्षात येते.

एडिंबरा हे स्कॉटलंडचे पुणे! स्कॉटलंडमधल्या साऱ्या सांस्कृतिक, शैक्षणिक आणि राजकीय विचारांचे हे आगर आहे. एडिंबरा म्हटल्यानंतर मेरी क्वीन ऑफ स्कॉट्स, जॉन नॉक्स, कादंबरीकार स्कॉट, बर्न्स अशी अनेक नावे डोळ्यांपुढे येतात. ह्या शहराच्या नावाच्या उच्चाराबद्दल अजूनही माझ्या डोक्यात घोटाळा आहे. काहींना मी एडिंबरा असा उच्चार करताना ऐकले. काहीजण एडिंबरो असे म्हणतात. पण शब्दांच्या निश्चित उच्चारांच्या कल्पना परदेशातल्या प्रवासात नेहमीच बदलत जातात. फ्रेंच लोक लंडनचा उच्चार लॉंद्रे असा करतात; आणि जर्मनीला इंग्लिश लोकांखेरीज कोणीच जर्मनी म्हणत नाही. फ्रेंच लोक जर्मनीला 'लालमान्य' म्हणतात आणि खुद्द जर्मन स्वतःच्या देशाला 'डॉयशलँड' म्हणतात. आपल्याकडे एडिंबराला एडिंबरो म्हणण्याची पद्धत आहे. परंतु स्कॉटिश उच्चार 'बरो'पेक्षा 'बरा' ला अधिक जवळ आहे. तेव्हा मीदेखील 'बरा'च बरा मानीत आलो आहे. एडिंबराला दर वर्षी एक सांस्कृतिक उत्सव होतो. देशोदेशींचे नटनर्तक सकल ज़मत असल्यामुळे 'न मिळे अशी मौज पुन्हा पाहण्या नरा —' म्हणत लोक येत असतात. पिटलॉक्रीहून एडिंबराला जाताना गाडीत पंढरीच्या यात्रेसारखी दाटी असेल, अशी माझी अपेक्षा होती. परंतु

एडिंबरा शहरातल्या ' वेव्हर्ले ' स्टेशनात गाडी थांबली तेव्हा त्या फलाटावर आम्ही दोघे आणि इतर काही मिळून फक्त आठदहा उतारू उतरले! मला थोडेसे धस्सच झाले. वाटले की, आपल्या एक तर उत्सवाच्या तारखा चुकल्या किंवा नाशिकच्या कुंभमेळ्यासारखा हा उत्सव बारगळला की काय? नाशिकला दोन वर्षांपूर्वी कुंभमेळ्याची जय्यत तयारी झाली होती. रेल्वेला नवे फलाट टाकले होते. रस्ते रुंदावले होते. किमान पक्षी पाचदहा लाख जत्रा जमेल, असा अंदाज होता. हॉटेलवाल्यांनी कांदेबटाट्यांची शेकडो पोती खरीदली होती; आणि भिक्षुकांनीदेखील दर्भांच्या गासड्या विकत घेतल्या होत्या. पहिली यात्रेकरू स्पेशल आली. त्यातल्या गर्दीच्या स्वागताला खुद्द कलेक्टर, डी. एस. पी. यांच्यासारख्या जिल्हाधिकाऱ्यांच्या खाशा स्वाऱ्या जातीने हजर झाल्या आणि पहिली स्पेशल ट्रेन फलाटाला लागली. त्यातून एकूण चार भिकारी, दोन खिसे-कापू आणि तीन विदाऊट तिकीट पॅसिंजर उतरले म्हणतात. खरेखोटे पंचवटीचा रामच जाणे! मी वेव्हर्ले स्टेशनात उतरलो त्या वेळी प्लॅटफॉर्म-वरचा शुकशुकाट पाहून मनात म्हटले, इथे उत्सव कमिटीत लठ्ठालठ्ठी होऊन भांडणे विकोपाला गेलेली दिसतात. उत्सव दुसऱ्याच दिवसापासून सुरू होणार होता, आणि कार्यक्रमपत्रिकांत तर भरगच्च कार्यक्रम छापले होते. रस्त्यातून आमची टॅक्सी चालली होती. रस्ते निर्मनुष्य. मी टॅक्सी-वाल्याशी दोन शब्द बोलायचा प्रयत्न केला. परंतु माझ्या इंग्रजी गद्याचा मराठी अवतार आणि त्याच्या इंग्रजी गद्याचा स्कॉटिश अवतार ह्यांचे काही पटेना! शेवटी इष्ट स्थळी येऊन पोचलो. दारावरचा घरनंबर आणि ' मिसेस कॅम्पबेल ' ही दारावरची पाटी वाचून बेल दाबली. कॅम्पबेलबाई तिसऱ्या मजल्यावर राहत होत्या. घंटी दाबल्यावर काही वेळाने तळमजल्या वरचे प्रवेशद्वार उघडले गेले आणि मी नमस्काराच्या पोजमध्ये उभा राहिलो. पण दाराच्या पलीकडे कुणीच नव्हते. ही काय भुताटकी झाली ह्या विचा-रात मी असताना तिसऱ्या मजल्यावरच्या जिन्याच्या कठड्याला रेलून एक म्हातारी तिथून ओरडली—

" गुड इव्हिनिंग मिस्टर दशपांदी —"

ह्या प्रवासात मला देशपांडे अशी सरळ हाक मारणारा, लंडनमधले महाराष्ट्र मंडळाचे सदस्य सोडून एकही महाभाग भेटला नाही. ढसपांद, डशपैंडी, डिशपँटी अशा आमच्या नावाच्या असंख्य चिंध्या झाल्या. पुढे पुढे मीदेखील निढावलो. त्यातल्या त्यात आपले नाव वडक्षवालकर किंवा महासुब्रह्मण्यम वगैरे नाही, ह्याचा मला आनंद झाला.

म्हातारी तिसऱ्या मजल्यावरून तुरूतुरू धावत आली. तिने आमच्या हातांतील काही सामान उचलून घेतले. "ही तुमची खोली. प्रवासाचा त्रास झाला असेल तुम्हांला. आराम करा." असे सांगून ती लुप्त झाली. आम्ही खोलीचा ताबा घेतला. इतक्या दूरदेशी आम्ही पाव्हणे अपरात्री पोचलो होतो. पण 'जेवणबिवण झालंय की व्हायचं आहे?' वगैरे प्रश्न नाही. हेच आपल्याकडे असते तर 'पिठलंभात टाकू का?' ही पृच्छा तरी झाली असती. साहेबांच्या देशात एकूण हे कमीच.

खोली छोटीशीच होती. पण सुंदर होती. एका छोट्या टेबलावर आमची तिकिटे, ब्रिटिश कौन्सिलची ओळखपत्रे, एडिंबरात असेपर्यंत काही नाट्यविषयक कार्य करणाऱ्या संस्थांनी दिलेली सन्माननीय सभासदत्वाची कार्डे नीट लावून ठेवली होती. शिवाय एडिंबरातली पाहण्यासारखी स्थळे, नाटकांची वेळापत्रके, लंडनला जाणाऱ्या गाड्यांच्या वेळा, सगळे न बोलता, न सांगता व्यवस्थित मांडून ठेवले होते. मला वाटते, प्रवासी मंडळींच्या शंकानिरसनाचे आता एक शास्त्रच तयार झाले आहे. कुणी तरी बसून नव्या गावात येणारा प्रवासी सामान्यतः कुठे अडतो, याचा अभ्यास केलेला असावा. गावात कुठे काय मिळते, बसचे मार्ग, थिएटरांतले खेळ सुरू व बंद होण्याच्या वेळा, त्या वेळी उघड्या असणाऱ्या हॉटेलांचे पत्ते, तिथे साधारणतः काय खायला मिळेल आणि केवढ्याला मिळेल हा सारा तपशील आधीच छापून तयार! तोंडाचा वापर टाळण्याकडेच प्रवृत्ती फार! प्रत्येक बस स्टॉपवर त्या बसच्या मार्गाचा नकाशा असतो. त्यामुळे "मंडईला जाती का दादा बस?" असले सवाल आणि "काशीला जायला रामेश्वरची गाडी कशी चालंल पाव्हनं!" असली उर्मट थट्टा इथे संभवतच नाही.

दुसऱ्या दिवशीची वर्तमानपत्रे उघडली तेव्हा गावातल्या उत्सवाला काय रंग आला आहे हे कळले. अक्षरश: शेकडो कलावंत त्या सुंदर शहरात जमले होते. नाटके होती, विनोदी रंगीत-संगीत बाऱ्या होत्या, चित्रकलाप्रदर्शने होती, शिल्पकलाप्रदर्शन होते, नृत्य-नाट्ये होती, वृंदवादन होते, कळसूत्री बाहुल्यांचे खेळ होते आणि मिलिटरी टॅटूही होता. परदेशांतून हजारो माणसे जमली होती. उत्सव कमिट्यांनी योजलेल्या कार्यक्रमांची गर्दी होतीच. परंतु त्याबाहेरचीही पुष्कळ कडवाळे होती. आपल्याकडे शेतात मुख्य पिकाच्या जोडीला बांधावर तूर वगैरे कडवाळे पेरतात, त्याप्रमाणे उत्सवातल्या मुख्य कार्यक्रमांखेरीज काठावरचे कार्यक्रमही असतात. त्यांना 'फ्रिंज शोज' म्हणतात आणि त्यांनाही मुख्य कार्यक्रमाइतकीच गर्दी असते. पहिल्या दिवशी आम्ही कुठल्याही जातिवंत प्रवाशाच्या परंपरेला अनुसरून शहर पाहण्याचे ठरविले. ऐतिहासिक स्थळे पाहण्याची मला फारशी आवड नाही. मात्र त्या स्थळी एकदा जाऊन पोचलो की भान हरपते. अनेक वर्षांपूर्वी शनवारवाड्यात आतल्या बाजूने हिंडत होतो. तिथले ते सहस्रदली कारंजे होते ती जागा दाखवताना माहितगार म्हणाला, 'इथे माधवराव पेशव्यांनी (की सवाई माधवराव?—तपशिलातली चू. भू. द्या. घ्या.) उडी मारून आत्महत्या केली होती.' अंगावर काटा आला. 'काका मला वाचवा'—च्या किंकाळ्या ऐकू आल्या. रावजींची पंगत दिसू लागली. केळीची 'थोर पाने' मांडली आहेत. दर पानी दहाबारा द्रोण आहेत. साखरभात, वांगीभात, तुरीचे वरण, सांबारी, भात, क्षीर, पापडसांडगे, फेण्या, तिळवडे चिकवड्या, पंचामृत, रायती, भरते वगैरे पेशवेकालीन महाराष्ट्र डोळ्यांपुढे नाचू लागला आणि नाकात दरवळू लागला. ऐतिहासिक वास्तू मला अगदी भाबडा बनवून टाकते.

मला वाटते, मराठी मनाचीच ही घडण आहे. बालपणी आणि जवानीत आपण इतिहासवासी असतो; मध्यम वयातच ग्यानोबातुकोबांच्या साथी-संगतीत परलोकवासी व्हायला लागतो. ह्या वृत्तीमुळे की काय कोण जाणे मी एडिंबरावर खूष झालो. एकूण स्कॉटिश मंडळांच्यात आणि मऱ्हाटी

लोकांत मला खूप साम्य वाटले. ही माणसे आपल्यासारखीच भाबडी, आपल्यासारखी कष्टाळू, परंपरेची जाज्वल्य अभिमानी. आपल्या गेलीक भाषेवर ‘ गेलीक तेतुका मेळवावा ’ म्हणून साभिमान प्रेम करणारी, संगीताची ‘ षोकीन ’, विश्वविद्यालयांच्या परिसरात रमणारी, चर्चासंवादांना गर्दी करणारी आणि इतिहासाची पाने टवटवीत ठेवण्यासाठी जिवाचे रान करणारी. ‘ इथे शाहिस्तेखानाची बोटे कापली — तिथे नाना फडणिसाने ही करामत केली — पलीकडे मातोश्री अमूक अमूक सती गेल्या — ह्या तीरावर महादजीचा तळ पडला होता आणि ह्या टेकडीजवळ इष्टुर फाकड्याला दुसऱ्या एखाद्या फाकड्याने धूळ चारली ’ ह्या कथा आजतागायत जशा पुण्यात रंगतात, त्याचप्रमाणे ह्या स्कॉटलंडच्या सांस्कृतिक राजधानीत इतिहासाची पाने अजूनही वाळली नाहीत. कुठलीही इमारत पाहा, ‘ इथे अमका राहत होता ’, ‘ इथे अमक्याने अमूक ग्रंथ लिहिला ’, ‘ इथे लॅटिमर ल्यूथरला भेटला होता ’, ‘ तिथे मेरी प्रसूत झाली ’, असे शिलालेख आहेत. एवढेच काय पण शेकडो वर्षांची प्रार्थनामंदिरे आणि तिथली थोर लोकांची आसने जपून ठेवली आहेत. एडिंबरातली माणसेदेखील मला दीडशेदोनशे वर्षे वयाची आहेत की काय अशी शंका आली. वर्तमानात बोलणारी माणसे मला एकूण कमीच आढळली. किंबहुना त्या ऐतिहासिक वास्तूंनी समृद्ध असलेल्या शहरात एखादी आधुनिक इमारतदेखील विसंवादी वाटत होती. स्मारकांची इथे नुसती उधळण आहे. पहिल्याच दिवशी बसमधून जाताना मी व माझी पत्नी सोडून बाकी सर्व म्हाताऱ्या होत्या. इतक्या म्हाताऱ्या एकजिनसी पाहायला मिळणे मुष्किल. पूर्वी बेलबागेतले पुराण झाले की अशा म्हाताऱ्या रस्त्यात सांडायच्या. पण परदेशात एकूण म्हाताऱ्या अधिक! पुन्हा सगळ्या शैशवाला जपणाऱ्या! माझ्या बसमध्ये औषधालादेखील तरुणी नव्हती! अर्थात तरुणींचे औषध चालावे, असली काही बाधा मला झाली होती अशातला भाग नव्हे. मी सहज माझ्या पत्नीला म्हटले, “ ह्या एडिंबरात हे थेरड्यांचं पेव कुठे फुटलं ? ”

आणि मागून आवाज आला — “ आपण मऱ्हाटी आहाट का ? ”

त्या प्रश्नाने माझ्या पोटात एकदम बर्फाची लादी बसली. मी मागे वळून पाहिले, एका पन्नाशी उलटलेल्या बाईने मागून प्रश्न केला होता. पुढल्याच स्टॉपला आम्ही व त्या बाई उतरलो.

" आपण महाराष्ट्रात होता वाटतं ? "

" अहो, पंधरा वर्सं मी वाईला होत्ये. " बाईचा ' ॲक्सेंट ' अस्सल सातारी होता. त्यांना आम्ही मराठी आहो हे माझ्या आचरटपणामुळे कळले होते. त्यांना माझा प्रश्न ऐकून ' गंमट ' वाटली होती. मराठी माणसे भेटल्यावर तिला अगदी माहेरची माणसे भेटल्याचा आनंद झाला होता. तिने लगेच आम्हां दोघांना दुसऱ्या दिवशी संध्याकाळी चहाचे निमंत्रण दिले.




" महाराष्ट्रात राहिलेल्या इतर मैत्रिणींनाही मी उद्या बोलविनार आहे—" असे म्हणून तिने आमचा निरोप घेतला. आमच्या ज्ञानदेवाची मराठी कुठे पोचली असेल ते सांगता येणार नाही, अशी खूणगाठ बांधून मराठी भाषा परदेशात सांकेतिक भाषा म्हणून वापरायची नाही, असे मी ठरविले.

दुसऱ्या दिवशी आम्हा मऱ्हाटी पाहुण्यांसाठी खास मिरच्यांची भजी होती आणि ब्रॉमले बाईंनी हिरव्या बांगड्या घातल्या होत्या. निरोप देताना माझ्या पत्नीच्या कानशिलावर एखाद्या खेड्यातल्या बाईप्रमाणे

आपली बोटे मोडीत त्या बाई म्हणाल्या, " बाऽऽय, ये ग पुण्हा ! "

ऐतिहासिक स्थळे पाहण्याचा आमचा कार्यक्रम दुपारी सुरू झाला. मला सहसा असल्या दत्तदिगंबर यात्रा छाप सहली रुचत नाहीत. त्या गाईडच्या मागून मेंढरा-सारखे धावायचे, त्याने मग माहिती द्यायची ती आपण ऐकायची आणि आपण पुन्हा त्या घोळक्यातून त्याच्यामागे चालायला लागायचे, हे प्रकरण काही जुळत नाही. असल्या 'पाहण्यातून' स्थळे पाहिल्याची नोंद होते, परंतु एखाद्या स्थळी रेंगाळता येत नाही ! सुरुवातीला मात्र असल्या यात्रेकरूंच्या मेळाव्यात जाण्याखेरीज गत्यंतर नसते. प्रचंड ऐतिहासिक वास्तू पाहताना आणि तिथल्या प्रसंगांच्या कथा ऐकताना शेवटी, 'कालाय तस्मै नम:' एवढेच म्हणून आपण बाहेर पडतो.



एडिंबराला होलीरुड हाऊस राजप्रासाद पाहताना आणि चौथा जेम्स, पाचवा जेम्स, मेरी स्टुअर्ट, क्रॉम्वेल ही नावे आणि त्यांच्या शौर्याच्या व क्रौर्याच्या कहाण्या ऐकताना 'जे दिसते ते अखेर जायाचे' ह्यासारख्या विचारांचीच गर्दी अस्वस्थ करते ! होलीरुड हाऊसच्या त्या राजवाड्यात मेरी स्टुअर्टचा एक आरसा पाहिला. स्कॉटलंडमध्ये आणलेला हा पहिला आरसा असे म्हणतात. त्या आरशाने मेरी पाहिली होती; आता तो आमची तोंडे पाहात होता. तेवढ्यात त्या आरशात पाहून आमच्या घोळक्यातल्या एका म्हातारीने आपल्या पिकल्या केसांची एक बट कपाळावर ओढून स्वत:ची शोभा वाढविली. एकदा दिल्लीत, जे तख्त फोडण्याची पेशव्यांची भीष्मप्रतिज्ञा होती आणि त्या प्रतिज्ञेपोटी ज्या

पानपतावर मराठी तरुणांची एक पिढी कापली गेली, त्याच्या समोरच्या खांबाला टेकून एक भिकारी विडी ओढताना मी पाहिला होता. ऐतिहासिक स्थळे पाहताना कधी कधी असले प्रसंगच मनात घर करून बसतात. सुदैवाने परदेशात हे पावित्र्यविडंबन मात्र नाही.

ह्या राजप्रासादातून आमची वरात लगेच सेंट जाइल्स कॅथीड्रलमध्ये आली आणि त्या भव्य वास्तूपुढे मी आपोआपच नतमस्तक झालो. ख्रिस्ती धर्मप्रचाराला ह्या असल्या भव्य वास्तूंनी फार मदत केली आहे. वास्तुशिल्पात मला गती कमी, परंतु भव्य वास्तू हे प्रचाराचे अत्यंत प्रभावी साधन आहे असे वाटते. मदुरेची प्रचंड गोपुरे घ्या अगर गोमटेश्वराचा तो महान पुतळा घ्या किंवा आधुनिक क्रेमलिन घ्या, — त्या विस्तारानेच आपण जिंकले जातो. माझा एक शिल्पशास्त्री मित्र म्हणतो की, " फूटपट्टीने जिंकणे हा प्रचारी वास्तूचा स्थायीभाव आहे ! "



परदेशातील वास्तव्यात मी खूप प्रार्थनामंदिरे पाहिली. भव्य प्रार्थना-मंदिरे, टुमदार प्रार्थनामंदिरे, कौटुंबिक चॅपेल्स — ख्रिस्ती माणसे ' उपासनेला दृढ चालवावे ' हा समर्थांचा मंत्र फारच कसोशीने आचरणात आणतात. सेंट जाइल्सच्या प्रार्थनामंदिरात सोबतचा यात्रिकांचा मेळावा अत्यंत भक्तिभावाने ठिकठिकाणी गुडघे वाकवीत होता. ख्रिस्ताच्या जीवनातील कथाभाग रंगीबेरंगी काचांवर कोरला होता. आमच्या सुदैवाने सूर्यनारायण प्रसन्न होता आणि ती चित्रे उजळून निघाली होती. सुदैवाने ख्रिस्तचरित्र, काही ठळक प्रसंग वजा केल्यास माझ्या फारसे स्मरणात नाही. काही वर्षांपूर्वी मद्रासमध्ये मी ख्रिस्ताचे संपूर्ण जीवन रंगभूमीवर पाहिले होते. ख्रिस्तजन्मापासून ते त्याच्या पुनरुत्थानापर्यंतचा कथाभाग

दाखवणारे ते नाटक अनेक दृष्टींनी ऊजब होते. विशेषतः अंतिम प्रीतिभोजनासारखे प्रसंग अजूनही माझ्या डोळ्यांपुढे उभे आहेत. ख्रिस्त-जीवन हा आजतागायत चित्रकारांचा आवडता विषय आहे. परदेशांतील चित्रकलाप्रदर्शन पाहताना तर असे वाटते की, ख्रिस्त जन्माला आला नसता तर निम्म्याहून अधिक चित्रकार उपाशी मेले असते. आपल्याकडे राम-कृष्णांनी चित्रकारांना खूप विषय पुरवले. राधा-कृष्णांची अजूनही आपल्या चित्रकारांनी पाठ सोडली नाही. अर्थात अत्याधुनिक गुळगुळीत कृष्ण नि थुलथुलीत राधा हा त्या पाठलागाचा भयाण विपर्यास आहे. परंतु रंगीत काचेवर आणि कॅनव्हासवर रंगलेले ख्रिस्तजीवन पाहणाऱ्याला मुग्ध करून टाकते! सेंट जाइल्सच्या चर्चमधून हिंडताना आमचा वाटाड्या कोणता राजा कुठे बसत असे आणि कोणत्या राणीचे कुठले आसन होते, त्याचे तपशीलवार वर्णन करून सांगत होता. त्या चर्चच्या आवाराबाहेर खून आणि मारामाऱ्यांचे व्यूह रचणारे हे राजे आणि ह्या राण्या काय भावनेने ह्या भव्य प्रार्थनामंदिरात येत असतील ते तो प्रभूच जाणे! ह्या चर्चच्या बाहेर एक चौकोनी फरशी आहे. तिच्यावर उभे राहून आपण थुंकलो की आपण मनात जी कामना बाळगू ती सफल होते अशी श्रद्धा आहे. आमच्या जथ्यातील बहुतेक सर्व मंडळी त्या फरशीवर उभी राहिली…शेवटी मीही उभा राहिलो. मनात कोणती कामना होती हे काही आता आठवत नाही. मात्र चर्चच्या आत असलेल्या ख्रिस्ती देवाला जे करता येत नाही ते त्या फरशीला जमते, हा विरोधाभास मजेदार वाटला. शेवटी ह्या जगातल्या जगात राहायचे असेल आणि आपल्या मनः-कामना सफल करायच्या असतील तर चर्चच्या चार भिंतींआड — मग त्या कितीही उंच असोत — सफळ होणे अशक्य आहे. स्वार्थी संकल्प हे तर इतरांना तुच्छ मानून, थुंकून, बेपर्वाईने सोडले पाहिजेत हेच खरे! परदेशांतील ही प्रार्थनामंदिरे आपल्या अंगावर येतात. त्यांचे अस्तित्व रंगभूमीच्या मागल्या पडद्याप्रमाणे मनोभूमीच्या मागे ठाण मांडून बसते —मग ते प्रार्थनामंदिर भव्य असो वा चिमुकले असो. चर्च ही संस्थाच मोठी संमोहन टाकणारी आहे, आणि ते चर्च जितके जुने तितके त्याचे

संमोहन अधिक. त्या पंधरा पंधरा मिनिटांनी खूप उंचीवरून वाजणाऱ्या नारोशंकरी घंटा, ते महाकाय ऑर्गनचे स्वर, तो गंभीर स्वरांतला प्रार्थना-घोष, भक्तांचा तो मेळावा, एका विशिष्ट उंचीवरची ती मेणबत्त्यांची आरास आणि त्या संथ प्रकाशात अधिकच करुण दिसणारी ती क्रूसावरची येशूची कारुण्यमयी मूर्ती ! आईबापांच्या हातावर बाप्तिस्मा घ्यायला लहानपणी ह्याच ठिकाणी यायचे, तारुण्यात एखाद्या कोमलांगीचा हात धरून इथेच विवाहबद्ध व्हायचे आणि शेवटी इष्टमित्रांचे हात लागून उचललेल्या शवपेटिकेतून ह्याच परिसरात मुक्तिदिनाची वाट पाहात शांतपणे पडून राह्यचे ! पहिली, मधली व शेवटची नोंद ह्याच चर्चच्या खात्यात करायची. निधर्मी राज्यांनीदेखील जन्म, विवाह आणि मृत्यू यांची नोंदणी एकाच खात्याच्या रजिस्ट्रारकडे सोपविली आहे. रुक्ष कायद्यालासुद्धा संस्कार टाकता येत नाहीत ते असे !

एडिंबराच्या त्या उत्सवात मी एक चित्रकलाप्रदर्शन पाहिले. जुन्या चित्रकारापासून ते आधुनिक पिकासोपर्यंतच्या चित्रकारांची चित्रे ह्या प्रदर्शनात टांगली होती. मला स्वत:ला रंगापेक्षा स्वराचा ओढा अधिक आहे; त्यामुळे चित्रकलाप्रदर्शनात हिंडताना मी अगदी गरीब गाय होऊन हिंडत असतो. मला चित्र ओळखता आले नाही तर मी अस्वस्थ होतो. परंतु चित्र ओळखता येणे ही चित्रकलेची कसोटी नव्हे. हे म्हणजे चिजेचे शब्द ओळखल्याशिवाय रागाची मजा येत नाही, म्हणण्यापैकी आहे. स्वरलयीचा साक्षात्कार जसा संगीताला, तसाच कदाचित रेषा आणि रंग यांचा चित्रकलेला असेल. मी फुलांसारखी फुले, मुलांसारखी मुले आणि बायकांसारख्या बायका दिसणारी चित्रे पाहत पाहत पिकासोपर्यंत येऊन थडकलो.

एका बाकावर समाधी लावून बसल्यासारखा एक गृहस्थ बसला होता. माझेही पाय थकले आणि पिकासोने आमच्या रसिकतेचा त्रिफळा उडवल्या-मुळे मी खट्टूही झालो होतो. त्या गृहस्थाशेजारी जाऊन बसलो आणि समोरच्या पिकासोच्या चित्राकडे पाहण्याऐवजी त्याच्या त्या ध्यानमग्न चेहऱ्याकडेच पाहू लागलो. तो गृहस्थ जणू त्या चित्रातली रेषा न् रेषा

डोळ्यांत साठवीत होता. मैफलीत माझेही प्राण कित्येकदा कानांत साठले आहेत. अनेक वर्षांपूर्वी ब्राह्मणसभेत रामभाऊ सवाई गंधर्वांनी गायिलेला ललत ह्या क्षणी माझ्या कानांत आहे. मात्र माझ्या संवेदनेला जरासादेखील धक्का न लावणाऱ्या त्या पिकासोच्या चित्राने त्या गृहस्थाची समाधी लागलेली पाहून मला त्याचा हेवा वाटला. मला त्या चित्राहून त्याची ती तन्मयता अधिक मोहक वाटली. काही वेळाने मी त्या माणसाकडे एकटक पाहत आहे हे त्याच्याही लक्षात आले असावे. एखादा आपल्याकडे टक लावून पाहू लागला की त्या व्यक्तीकडे नकळत आपली दृष्टी वळते. ज्या व्यक्तीवर आपली दृष्टी खिळते त्या व्यक्तीकडून निघालेले प्रकाशकिरण आपल्या डोळ्यांशी काही अदृश्य सांधा जोडतात की काय कोण जाणे. एखाद्या मैफलीत एखाद्या मोहक चेहऱ्यावर आपली नजर खिळते. तो चेहरा गाणे ऐकण्यात तन्मय झालेला असतो आणि मधूनच ती तन्मयता भंगली आणि तो चेहरा फिरला की नेमका आपल्या दिशेला फिरतो आणि आपण तितकेसे निर्ढावलेले नसलो तर ओशाळतो, असा एक अनुभव आहे. मी त्या गृहस्थाने माझ्याकडे पाहिल्यावर फारसा ओशाळलो नाही. फक्त हसण्याचा एक दुबळा प्रयत्न केला. तोही गृहस्थ हसला आणि मला धीर आला. तो एडिंबरचा रहिवासी होता. स्कॉटिश होता, त्यामुळे परिचयाच्या उपचाराशिवाय आमचे बोलणे झाले. मी त्याला विचारले, "पिकासोची चित्रकला तुम्हाला कळते का?"




"ते कसं सांगता येणार मला?"

"पण तुम्ही तर देहभानच विसरून ते चित्र पाहत होता."

" काही चित्रं असली जादू करतात. "

" आपण चित्रकार आहात का ? "

" छे ! मी माझ्या आयुष्यात कधी ब्रश हातात घेतला नाही. मी गेली तीस वर्षें नुसती चित्रं पाहत आलो आहे. "

" पण मला तर या चित्रातलं काही कळत नाही. "

" पिकासोला तरी कुठं कळलं आहे ? "

" त्याशिवाय का त्यानं हे चित्र काढलं ? "

" पण त्यानं हे चित्र कां काढलं ? "

" मला काय ठाऊक ! "

" पिकासोला तरी काय ठाऊक ! — आणि कुणाला काय ठाऊक ! त्यानं चित्रं काढायची आणि आपण पाहायची ! "

"—पण कळली नाहीत तरी ? "

" मग पाहू नये ! " मिस्किलपणे हसत तो म्हणाला. मीसुद्धा त्याच्या ह्या बोलण्याने नामोहरम झालो.

" पण मग शेकडो पौंड देऊन ही चित्रं लोक विकत कां घेतात ? ह्याच्या किमती ठरवायच्या कशा ? "

" ते काम चित्रकलेच्या दलालांचं आहे — तुमचं आमचं थोडंच आहे ! "

" खरं आहे. पण चांगलं चित्र आणि वाईट चित्र कळतं कसं ? "

" कुठलीही वाईट आणि चांगली गोष्ट अनुभवानं कळते. तुम्ही किती चित्रकलाप्रदर्शनं पाहिली आहेत ? "

" फार तर पाचसात पाहिली असतील ! " मी 'सत्य सदा बोलावे '-चा धर्म आचरला.

" तुम्हांला पिकासो कळला नाही याचं खरंच दुःख झालं का ? आर यू रिअली सॉरी ? "

ह्या प्रश्नाने मला बुचकळ्यात टाकले. मला पिकासो न कळल्याचे दुःख झाले होते की माझा अहंकार दुखावला गेला होता ?

" मला सांगता येत नाही."

" मी खरं सांगू का? दुःख झालं नसेल तर चिंता करू नका. अशीच प्रदर्शनं पाहत जा — पाचसात नव्हे. पाचसातशे. एखाद्या दिवशी तुम्हांला ते गवसेल ! "

त्यानंतरच्या मुक्कामात मी गावोगावची चित्रकलाप्रदर्शने पाहिली. एकट्याने पाहिली, तज्ज्ञांच्या संगतीत पाहिली. पण अजून मला जे गवसायचे ते गवसले नाही. शेवटी आयुष्य पुढे सरकताना काही दोर कापीत जावे लागते, आणि त्या दिशेची वाट आपल्याला बंद आहे हे ठरवावे लागते. हेच खरे ! मी चित्रकलेचा दोर कापला आहे !

एका लहानशा इन्-डोअर बॅडमिंटन कोर्टाएवढ्या जागेत एका बाजूला सुमारे आठ गुणिले आठ फुटांचे आणि दीडएक फूट उंचीचे एक लाकडी स्टेज केले होते. मागे एक काळा पडदा होता. आम्ही त्या हॉलमध्ये प्रवेश केला त्या वेळी तो हॉल गच्च भरला होता. एका कोपऱ्यात मी आणि माझ्या पत्नीने रिकाम्या असलेल्या खुर्च्या पटकावल्या. एडिंबराच्या उत्सवाच्या निमित्ताने ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीच्या विद्यार्थ्यांची एक नाटक-मंडळी आपले खेळ करण्यासाठी आली होती. मुख्य उत्सवात त्यांची नाटके नव्हती. जत्रेत तमाशा-कीर्तनांच्या जोडीला इतरही डोंबाऱ्यांचे आणि कोल्हाट्यांचे तळ पडतात, तसाच ह्यांचाही तळ होता. आदल्या दिवशीच्या वर्तमानपत्रांत ह्या तरुण मंडळींची खूप तारीफ आली होती. गावातली मुख्य नाटके आणि गाणी रात्री साडेनऊ-दहापर्यंत संपली की ह्यांचा लेट नाईट रिव्ह्यू सुरू व्हायचा. बरोबर दहा वाजता दिवे गेले आणि त्या एवढ्याशा रंगमंचावर त्या कॉलेज विद्यार्थी-विद्यार्थिनींनी आपला कार्यक्रम सुरू केला. त्यात गाणी होती, नाच होते, गमतीचे चुटके होते. त्या एवढ्याशा रंगमंचावर त्या मुलामुलींनी साऱ्या हॉलच्या नजरा आपल्याकडे खिळवून ठेवल्या होत्या. अत्यंत सुसूत्र कार्यक्रम. आठदहाजणांचीच टोळी होती. पण विलक्षण बहुरंगी. विशेषतः चंद्र-लोकावर इंग्रज, अमेरिकन, रशियन, चिनी आणि फ्रेंच वसाहतकारांची झालेली पहिली भेट मोठी मजेदार होती. अर्थात शेवटी सर्वांत शहाणा इंग्रज ठरला, हे सांगायला नकोच. परंतु सरकारी काम आणि मधुचंद्र एकदम साधायला आलेल्या इंग्रजाच्या बायकोला फ्रेंच माणसावर प्रेम करायला लावले होते, चिनी मनुष्य चंद्रलोकावरून चंद्रदर्शन घडत नसल्याने

हळहळत होता, अमेरिकन सर्वांचे फोटो काढण्यात गुंतला होता, रशियन या परिस्थितीत क्रेमलिनचे धोरण काय आहे याची संदेशवाहकावरून सारखी चौकशी करीत होता, आणि इंग्रजाने एका कोपऱ्यात आपला युनियन जॅक रोवून टाकला होता! होते साधे प्रहसनच, पण प्रकाशाच्या जादूने त्या लाकडी चबुतऱ्यावर चंद्रलोकाची किमया केली होती. या प्रहसनाचा हशा ओसरेपर्यंत रंगमंचावर एक टेबल मांडून न्याहारीची तयारी करण्यात आली. एक तरुण वेटरची वाट पाहत बसला. हळूहळू त्याने काट्याचमच्यांनी पुढल्या बशीवर ताल धरला आणि तो ताल वाढत वाढत अशा गमतीने पुढे गेला की, काही वेळाने त्या बशा, काटेचमचे आणि टेबल यांतून त्याने चक्क जाझ वाजवून दाखविला! रात्री साडेबारापर्यंत असे चुटके चालले होते.



रात्री थिएटराबाहेर पडलो. आणि दिसेल त्याला आमच्या घराकडे जाणारा रस्ता विचारायला सुरुवात केली. इतक्यात एक स्कॉटिश जोडपे आमच्यापुढे आले आणि म्हणाले, "चला, आम्ही आमच्या गाडीतून सोडतो तुम्हांला." त्यांच्या गाडीत आम्ही बसलो. त्यांना हिंदुस्थानविषयी काही आस्था असावी असा आमचा समज झाला, पण तशातला काही प्रकार नव्हता. आम्ही 'ऑक्सफर्ड लेट नाईट रिव्ह्यू' बद्दलच बोलत होतो. आमचे घर चारपाच मैलांच्या अंतरावर होते. तिथे पोचवून दोघांनीही मोठ्या प्रेमाने आमचा निरोप घेतला. मीदेखील त्यांचे मनापासून आभार मानले आणि विचारले, "आपण येथे जवळपास राहता वाटतं?" "फार लांब नाही, इथून बरोबर विरुद्ध दिशेला पंधराएक मैलांवर आमचं घर आहे!" मोटारच्या फर्ऽऽ अशा आवाजात त्या दोघांचे हसणे मिसळले. त्या अज्ञात उपकारकर्त्यांचे नावदेखील विचारण्याचे भान मला

राहिले नव्हते. केवळ शुद्ध निरपेक्ष असंबद्ध दया! त्यांच्या गावात आलेली दोन माणसे — आमची गैरसोय होऊ नये म्हणून त्यांनी एवढी वाट वाकडी केली. माझ्या डोळ्यांपुढे दिल्लीच्या मराठी साहित्यसंमेलनात भर पावसात संमेलनाचे अध्यक्ष लक्ष्मणशास्त्री जोशी आणि त्यांचे ऋषितुल्य गुरू नारायणशास्त्री मराठे यांच्या अंगावरून चिखल उडवीत गेलेल्या आधुनिक पालखीपदस्थांचे बेपर्वा चेहरे सरकून गेले! परदेशात ही आस्था मला सर्वत्र आढळली. इंग्रज इतका अबोल पण विचारलेल्या प्रश्नांचे 'मला ठाऊक नाही' हे उत्तरदेखील ओशाळ्या चेहऱ्याने देईल. फ्रेंच एवढा आत्मलक्षी, पण आमच्या खाणाखुणा समजावून घ्यायचा भर रस्त्यात सामुदायिक प्रयत्न चाले!

एडिंबरात, शेक्सपिअरच्या काळात ज्या पद्धतीने नाटक करीत त्या पद्धतीने केलेले शिलरच्या 'मेरी स्टुअर्ट'चे ओल्डविक कंपनीने सादर केलेले नाटक पाहण्याचा मला योग आला. एडिंबराच्या असेंब्ली हॉलचे नाट्यगृहात रूपांतर केले होते. मुळातल्या शिलरच्या जर्मन नाटकाचे स्टीफन स्पेंडरने अप्रतिम भाषांतर केले आहे, आणि प्रयोग पाहून तर मी थक्कच झालो. अभागी मेरी आणि कुरेबाज एलिझाबेथ यांचे संवाद श्वास रोखून ऐकले. होलीरुडच्या किल्ल्यात मी ह्याच मेरीचे महाल पाहून आलो होतो. खरा इतिहास काय आहे कोण जाणे! किंबहुना खरा इतिहास हा एक वदतोव्याघात आहे. विश्वविजयाचा संकल्प सोडून बसलेल्या अलेक्झांडरची



मनातल्या मनात कितीदा घाबरगुंडी उडाली याची नोंद कधी कुणी ठेवली असेल? तुकारामबुवांना देहूच्या हलवायाकडून पावशेर कंदी पेढे खायची वासना झाली नसेलच का? शिलरने मेरी रंगविली आहे ती आम्हाला वर्गात शिकवलेल्या मेरीसारखी अजिबात नव्हती. आम्ही इंग्रजांच्या आमदानीत इंग्रजी इतिहास शिकलो. तिथे एलिझाबेथ राणीने साऱ्या सद्गुणांची बिरुदावली अंगाखांद्यांवर वागवली होती. एलिझाबेथ आणि मेरी या दोघींनीही या नाटकात अभिनयाचा उच्चांक गाठला होता. त्यांच्या कमावलेल्या आवाजाने तो सारा असेंब्ली हॉल दणाणून जात होता. इंग्लिश रंगभूमीवर मी मायक्रोफोन पाहिला नाही. ह्या नटनटींचे आवाज एकजात गोळीबंद! जुन्या महाराष्ट्र मंडळीतल्या नटांच्या आवाजाची आठवण झाली. अभागी मेरीसाठी डोळ्यांत साठलेली टिपे पुशीत आम्ही दोघेही थिएटरबाहेर आलो आणि त्या टेकडीवरच्या थिएटरवरून खाली पसरलेले एडिंबरा शहर पाहताना पुन्हा एकदा स्वतःला हरवून बसलो.

एडिंबरा हे मोठे भाग्यवान शहर आहे. या शहराला सुंदर बंदर आहे. फॉर्थ ब्रिज नावाचा प्रचंड लांबीचा पूल आहे. भोवताली रम्य टेकड्या आहेत, बागा आहेत, पुतळे आहेत आणि आकाशाला खुणावणारी सुंदर प्रार्थनामंदिरे आहेत. आम्ही राहात होतो त्या विभागाला 'मॉर्निंग साईड' म्हणतात. या मॉर्निंग साईडचे चर्चदेखील सुरेख आहे. स्कॉटिश माणूस इंग्रजाहून अधिक धार्मिक आहे. 'बेल, बुक अँड कँडल' — घंटी, पोथी आणि वाती यावर त्याची श्रद्धा आहे. अजूनही शिक्षण चर्चच्याच हातात आहे. मी त्यांच्या या धार्मिकतेविषयी चर्चा करण्याचा प्रयत्न केला. परंतु हे लोक ख्रिस्त हा वादातीत विषय मानतात. ह्या धर्मभावनेने रक्ताच्या नद्या वाहविल्या तरीही त्यांच्या जीवनातून धार्मिक भावना जात नाहीत. आपण — विशेषतः हिंदू लोक त्या दृष्टीने फारच प्रगत आहोत. एका तोंडाने आपण 'एष धर्मः सनातनः' म्हणतो आणि दुसऱ्या तोंडाने चेष्टाही करतो. ख्रिस्ती लोकांची चेष्टाटवाळी पाद्र्यापर्यंत जाऊन थांबते! क्रूसावरची ती ख्रिस्तमूर्ती नुसत्या स्मरणाने त्यांच्या अंतःकरणात जोगिया

आळवू लागते — तिथे चेष्टामस्करीचे स्वर विसंवादी लागतात, बेसुरे लागतात, हे मात्र खरे! अर्थात् खिस्ताचा करुणामय धर्म प्रत्यक्षात मात्र पुराणातल्या वांग्यासारखाच आहे. आपल्या ब्राह्मण, ब्राह्मणेतर किंवा स्पृश्यास्पृश्य भांडणांसारखी तिथेही भांडणे — अक्षरशः जोडा-जोडी, खून, मारामाऱ्या ह्या वैशिष्ट्यांसह — आहेत. एडिंबरात मी 'बोनफायर' (इंग्रजी बॉन फायरचा आयरिश उच्चार!) नावाचे नाटक पाहिले. त्यात दोन धार्मिक तटांत 'होळी'वरून झालेले भांडण हाच विषय होता. आपल्या कोकणातल्या ब्राह्मणांच्या आणि गुरवांच्या भांडणा-सारखा थोडासा प्रकार; आणि त्या भांडणाचे पर्यवसान एका तरुण सुधारकाच्या खुनात दाखविले होते. नाटकाची भाषा आयरिश होती. त्यामुळे संवाद कळायला अवघड जात होते. रंगभूमीवर चारपाच फ्लॅटे अशी काही खुबीने मांडली होती की, एका आयरिश खेड्यातला तिट्ठा डोळ्यांपुढे एका क्षणात उभा राहिला. वातावरण खेड्यातले होते. खेड्या-तल्या कजाग म्हातारीचे काम करणाऱ्या बाईने अगदी सातारा-सांगली-कडल्या खेड्यातल्या 'सतभामाकाकी'चा आयरिश अवतार दाखवला. नाटक बेताबाताचेच होते; परंतु रंगसज्जा अतिशय चतुर होती. क्षणात दिवाणखाना उभा राही आणि लगेच एका टुमदार घरातली खोली मांडली जाई. रंगसज्जेचे हे चातुर्य मी पाहिलेल्या प्रत्येक नाटकात मला दिसले. अत्यंत टापटिपीची सजावट हे एकूणच मुळी ह्या पाश्चात्त्य लोकांचे वैशिष्ट्य आहे. चालण्याबोलण्यात टापटीप, दुकानाच्या मांडणीत टापटीप. रस्त्यात गुद्दागुद्दी झाली तरी बघ्यांची गर्दी व्यवस्थित रिंगण करून उभी राहते. खूप थंडीमुळे, मला वाटते, ह्या लोकांना चटचट हातपाय हालवणे आवश्यक होऊन बसते. त्यामुळे करू म्हटले तरी रेंगाळत कामे करता येत नसावी. रंगभूमीवरच्या दृश्यपरिवर्तनाला तर काही सेकंद लागतात. पूर्वी आपल्याकडेही 'ट्रिक सीन्स' असायचे, परंतु ह्या पाश्चात्त्य रंगभूमी-वर देखावे कमालीचे लवकर बदलतात. त्याचे एक कारण संपूर्ण सीन वरच्यावर उचलला जातो. स्टेजवरच्या खुर्च्या, टेबले एका शिस्तीने उचलली जातात. म्हणजे खुर्च्या कुणी उचलायच्या, टेबलांना कुणी हात

लावायचा हे आधी ठरलेले असते. त्यामुळे पडदा वर गेल्यावर हातभर जीभ काढून कपडेपटातला माणूस पळत विंगमध्ये जाण्याचे नाटकाबाहेरचे नाट्यप्रसंग इथे घडत नाहीत.

कधी कधी नुसत्या शिस्तीतूनदेखील सौंदर्य निर्माण होते. एडिंबराच्या किल्ल्याच्या पायथ्याशी असलेल्या विस्तीर्ण पटांगणात सातएक हजार माणसे संध्याकाळी सूर्यास्तानंतर दीड तास अनिमिष नेत्रांनी केवळ हे शिस्तीतले सौंदर्य पाहत होती. एडिंबराचा मिलिटरी टॅटू हा उत्सवातला फार महत्त्वाचा भाग! स्कॉटिश लोक, विशेषत: हायलंडर्स हे उत्तम लढवय्ये म्हणून साऱ्या जगात त्यांचा लौकिक आहे. अजूनदेखील सणासुदीला स्कॉटिश लोक हौसेने ' किल्ट ' चढवतात. तिथल्या शहाण्णवकुळीची निशाणे आणि बिरुदे अजूनही अंगाखांद्यांवर वागवली जातात. बॅगपाईप हे त्यांचे आवडते वाद्य. हायलंडर्सच्या खालोखाल बॅगपाईप वाजवण्यात गुरखा पलटणीचा नंबर लागतो. ऑस्ट्रेलियन्स, डच, फ्रेंच, मलायन्स, साऊथ आफ्रिकन्स, अमेरिकन्स, कॅनेडियन्स यांच्याबरोबर नेपाळच्या गुरखा पलटणीनेदेखील ह्या टॅटूत भाग घेतला होता.

ह्यात घोडदळ-पायदळांची गमतीची कवायत झाली, लुटुपुटूची लढाई झाली, वृंदवादन झाले. नौसैनिकांनी आपले खेळ दाखविले. ब्रिगेडियर मॅक्लीन हे ह्या टॅटूचे दिग्दर्शक वर्ष सहा महिने लाकडी सोजिरांच्या सोंगट्या घेऊन ह्या कार्यक्रमाची आखणी करीत होते. पार्श्वभूमीला परीकथेतल्या किल्ल्यासारखा एडिंबराचा किल्ला होता. क्षणार्धात ती संपूर्ण टेकडी उजळून निघत असे, तर लगेच पायथ्याचे पटांगण चकाकणाऱ्या गणवेषातल्या सोजिरांनी झगमगून उठत असे. मधूनच संघगीत सुरू होई आणि निवेदक सांगे — ' चला, या लढवय्यांबरोबर आपणही गाऊ ' — आणि मग त्या सात हजार प्रेक्षकांपैकी आमच्यासारखे ग्वाल्हेर-आग्रा घराण्याचे गायक सोडून सारा समुदाय मुक्तकंठाने गाऊ लागे. माझ्या शेजारची म्हातारी (आम्हांला बहुधा असलाच शेजार लाभला — ग्रहयोग, दुसरे काय!) आपल्या टिणटिणीत आवाजात गात असे. सात हजार लोकांच्या गळ्यांतून एका शिस्तीत निघणाऱ्या त्या सुरांनीच माझ्या

अंगावर काटा आला. आपल्याकडे सर्वांनी नुसते ‘ जनगणमन ’ एकसाथ म्हणावे म्हणून किती खटपटी झाल्या पण आमच्या ‘ जनगणमना ’चा कधी एक सूर लागेल देव जाणे ! एक पंजाब-सिंधात तर दुसरा उत्कल-वंगात पोचलेला. इथे प्रत्येक मात्रा मोजून घ्यावी. घड्याळाचा काटा कसा सरकत होता कळले नाही. एकाएकी ते पटांगण मोकळे झाले. मागल्या किल्ल्यावरचा प्रकाशझोत गेला. किल्ल्याच्या एका टेहळणीच्या बुरुजावर एका जागी एक प्रकाशशलाका गेली आणि तिथे खेळण्यातल्या सोजिराएवढा दिसणारा एक हायलंडर बॅगपाईपवर अंतःकरण हलवून टाकणारी सुरावट वाजवू लागला. स्कॉटलंडच्या मर्मबंधातली जणू काय ती ठेव तिथे साकार होऊन उभी होती. त्या दृश्याने ते सात हजारांचे प्रेक्षागार गदगदून उठले. तेवढ्यात लाऊडस्पीकरवर नृत्यसंगीत वाजू लागले आणि देहभान हरपून जी जोडीदारीण मिळेल तिला हाताशी धरून प्रेक्षक नाचत नाचत ती टेकडी उतरू लागले. मी आपला अंग चोरून रामरक्षा म्हणत तिथून निघालो. एका वळणावर एका तरण्याबांड हायलंडर सैनिकाची पत्नी आपल्या पतीचे चुंबन घेत होती आणि त्याची गुलाबी लोकरीच्या गुंड्यासारखी गबदुल छोकरी बापाकडे अभिमानाने पाहत होती. तिचे पपा त्या टॅटूत होते !

एडिंबराचा उत्सव आता रंगात आला होता. रस्त्यात देशोदेशींची प्रवासी मंडळी जथ्याजथ्याने हिंडताना आढळत होती. सकाळपासून आमचीही बरीच भ्रमंती होत होती. दुपारच्या जेवणाला हॉटेलाबाहेर अर्धा अर्धा तास बारी लावून उभे राहावे लागे. परदेशातल्या प्रवासातला हा प्रथम चरण असल्यामुळे केवळ ‘ जाणिजे यज्ञकर्म ’ म्हणून तो बेचव लंच आम्ही घशाखाली लोटीत होतो आणि पुन्हा भटकंतीला सुरुवात करीत होतो.

तेवढ्यात एकदा मला कळसूत्री बाहुल्यांच्या खेळाची जाहिरात आढळली. आम्ही चालून चालून खूप थकलो होतो. संध्याकाळी पुन्हा आंतरराष्ट्रीय बॅले पाहायला जायचेच होते. दोन तास खुर्चीवर स्वस्थ बसावे म्हणून त्या खेळाची तिकिटे मिळतात की काय ते पाहायला गेलो

आणि एका गृहस्थाने आम्हांला वर नेले. एका दिवाणखान्यात एक छोटेसे ' पपेट थिएटर ' मांडले होते. शंभरएक खुर्च्या होत्या. सर्व खुर्च्या रिकाम्याच होत्या. आम्हां दोघांना त्या गृहस्थाने आत नेऊन बसवले. मी तिकिटांचे पैसे देऊ लागल्यावर तो म्हणाला, " मीच रदरफोर्ड ! हा माझाच खेळ आहे. पैसे नंतर घेईन. "

खेळ तीन वाजता सुरू झाला त्या वेळी सभागृहात आम्ही दोघे आणि एक म्हातारी ( इथेदेखील ! ) आणि तिची चिमुकली नात एवढीच गर्दी होती. रदरफोर्ड अडीचच्या सुमाराला पडद्याआड गेला. तीन वाजता घंटी वाजली आणि मुख्य पडद्यापुढे येऊन प्रेक्षागारातल्या तीन प्रौढ आणि एक बाल मिळून साडेतीन प्रेक्षकांना त्याने अभिवादन केले. त्याच्या भाषणातला प्रत्येक शब्द अंत:करणात घर करून गेला. त्याची ती स्थूल आणि काहीशी भाबडी बावळट मूर्ती माझ्या अजून डोळ्यांपुढे आहे. " आपलं स्वागत असो. आपणाला आज या रिकाम्या दिवाणखान्यात बसून हा खेळ पाहायला चमत्कारिक वाटत असेल. पण कधी कधी हीदेखील गर्दी नसते. माझा हा खेळ पाहायला आज ही चिमुकली पाहुणी आली आहे — तिला मी जास्त वेळ तिष्ठत ठेवू इच्छीत नाही. माझा खेळ सुरू करतो. " रदरफोर्ड पुन्हा पडद्याआड गेला. तो दोऱ्यांनी चालणारी पपेट्स न वापरता ग्लोव्ह पपेट्स ( हातमोज्यांसारखी पंजांत बसणारी ) आणि रॉड पपेट्स ( छोट्या काठ्यांवर चालणारी ) घेऊन खेळ करीत होता. परीकथा झाल्या, विनोदी नाटके झाली, गमतीची गाणी झाली, पियानो वाजवून झाला आणि दीड तासानंतर खेळ संपला. त्या थंडीतदेखील घामाघूम झालेला रदरफोर्ड पडद्यामागून बाहेर आला. तेव्हा प्रेक्षागारात फक्त मी आणि माझी पत्नी होतो. ती चिमुकली पाहुणी आणि तिची ती आजी सुरुवातीच्या पाचदहा मिनिटांतच निघून गेली होती. रदरफोर्डने आमच्याकडे पाहिले. ही दृष्टी मला अनोळखी नव्हती. रिकाम्या नाट्यगृहापुढे नाटके करण्याचे मीदेखील ' सुख भोगले ' आहे. मी उठून त्याच्याजवळ गेलो. त्याचे अभिनंदन केले आणि त्याचा निरोप घेण्यापूर्वी त्याच्या तिकिटांचे पैसे द्यायला लागलो. त्याने पैसे घेतले नाहीतच.

" चला, अर्ध्या तासानंतर माझा दुसरा खेळ सुरू होईल. तोपर्यंत आपण कॉफी घेऊ."

आम्ही तिथल्या कँटीनमध्ये गेलो.

" एनी लक ? " तिथली वेट्रेस म्हणाली.

" हे दोवे ! " हे म्हणताना रदरफोर्ड असा काही गमतीने हसला की, त्यात त्याचे अभागी जीवन चटकन चमकून गेले. कॉफीच्या कपाबरोबर आमचे बोलणे सुरू झाले. ' कळसूत्री बाहुल्या ' हे त्याचे वेड होते; " माझी बोटं खाजायला लागतात. लहानपणापासून ह्या बाहुल्यांनी माझा छळ केला आहे." ह्या गृहस्थाने लग्न केले नाही, संसार केला नाही. एडिंबरा-तल्या सामान्य वस्तीत एक खोली घेऊन हा राहत होता. चोवीस तास कळसूत्री बाहुल्यांच्या नव्या खेळांची तो चिंता करीत होता. शेवटी राहवेना. मी त्याला त्याचा चरितार्थ चालतो कसा, हा कोकणी प्रश्न केलाच. ते भकास रिकामे थिएटर माझ्यासारख्या धंदेवाईक नाटकवाल्याला सतावत होते. " गेल्या दहा दिवसांत माझी दहा तिकिटंदेखील खपली नाहीत. मी ओळखलं आहे, इतर थिएटरांप्रमाणे लोक या थिएटराकडे येत नाहीत. पपेट थिएटरला लोकांच्या दाराशी जावं लागतं. मी लहान मुलांच्या शाळांतून खेळ करतो. तिथे तुम्ही पोरांची गंमत पाहिली पाहिजे. पडद्या-मागे त्यांचे हशे-टाळ्या ऐकू आल्या की माझी बोटं अशी नाचतात — काय सांगू — " रदरफोर्डचे बोलणे मोठे गमतीचे होते; पण त्या गमती-खाली तो आपल्या जीवनातले सगळे पराजय, निराशा दडपायचा प्रयत्न करीत होता. पाण्यात चेंडू दड-पायचा तो खेळ होता. पटकन तो चेंडू वर आल्याशिवाय राहत नाही.



" पण व्यवसाय म्हणून तुम्हांला ह्यात जर फायदा नाही तर तुम्ही हे कां चालू ठेवता ? "

" खरं सांगू ? कित्येक वेळा हा धंदा बंद करायचा विचार माझ्या मनात येतो. मी आठ आठ दिवस ही पपेट्स बंद करून स्वस्थ असतो. पण मला शाळेतली ती माझे खेळ पाहताना खदखदून हसलेली मुलं आठवतात आणि मग माझी पपेट्स पुन्हा ट्रंकेतून बाहेर येतात. ही पपेट्स आणि ती पोरं यांच्यामधली मी एक केवळ जिवंत साखळी आहे, एवढाच विचार माझ्या मनात राहतो आणि मग पुन्हा आपला मी शाळांच्या हेड-मास्तरांना भेटायला जातो. "

कॉफी झाली. रदरफोर्ड म्हणाला, " चला, रिकाम्या खुर्च्या माझी वाट पाहत असतील ! " आम्ही बाहेर आलो. पपेट थिएटरच्या दिवाण-खान्याबाहेर दुसरी एक म्हातारी दोन नातवंडांना घेऊन उभी होती. रदरफोर्डने डोळे मिचकावले. दुसऱ्या खेळाची गर्दी उभी होती. त्यांच्या-पुढे तो दुसरा शो देणार होता, तसेच अभिवादन करणार होता आणि निरनिराळे आवाज काढून तशीच बोटे नाचवून घामाघूम होणार होता !

संध्याकाळी बॅले पाहायला बसलो. डोक्यातून रदरफोर्ड जात नव्हता. आणि बॅलेतही दम नव्हता. थिएटर भरले होते, पण लोक जांभया हात-रुमालांखाली लपवीत होते. दुसऱ्या दिवशी वर्तमानपत्रवाल्यांनी बॅलेतल्या नर्तकांना बॅलेरिनापेक्षाही वर उचलून आपटलेले वाचले आणि वाईट बॅले म्हणजे काय ते आपल्यालाही कळते, या अभिमानाने मान उंचावून भटकायला सुरुवात केली.

एडिंबराहून निघाल्यानंतर पुढला मुक्काम खुद्द लंडन शहरातच दोनतीन महिने पडणार होता. त्यामुळे कॅंपेन गार्डन्समधल्या ज्युअरबाईच्या घरात आम्ही चक्क बिऱ्हाड थाटले. यापुढे माझा टेलिव्हिजनचा शिक्षणक्रम बी. बी. सी.च्या शाळेत सुरू होणार होता. आतापर्यंत टेलिव्हिजनवर मी पुष्कळ कार्यक्रम पाहिले होते. आता प्रत्यक्ष स्टुडिओत जाऊन कामाला सुरुवात होणार होती.

रेडिओचे हे धाकटे भावंड कानामागून येऊन भलतेच तिखट झाले आहे. रेडिओची रवानगी आता सैपाकघरात झाली आहे. आधीच इंग्रजाला घरकोंबडेपणा मानवतो. त्यात त्याच्या खुराड्यात आता ही नवी करमणूक आली. त्यामुळे तास न् तास हे कार्यक्रम पाहात बसणारी कुटुंबे निर्माण झाली. कुणी म्हणतात की ह्या यंत्राने सामाजिक जीवनावर आघात केला. कुणी म्हणतात, चित्रपटगृहे ओस पडली. कुणाचे मत, नाटकवाले मेले. मला मात्र तसे वाटत नाही. कारण, करमणुकीच्या सर्व कार्यक्रमांना तितकीच गर्दी असते.

आमची शाळा तुसॉदबाईच्या मेणाच्या प्रदर्शनापुढल्या गल्लीतच होती. बी. बी. सी.चे ' स्टाफ ट्रेनिंग स्कूल ' एका जुनाट तिमजली इमारतीत आहे. पहिल्या दिवशी इमारतीतले लिफ्ट पाहून मी थक्क झालो. शंभर वर्षांपूर्वी बसवलेले हे लिफ्ट लोखंडी दोरखंड ओढून वर न्यावे लागते. विसाव्या शतकात महाराणी विक्टूरियाच्या आमदानीतला हा जिने चढणारा पाळणा अजून वापरात ठेवण्याचा पुराणमताभिमान इंग्रजच बाळगू जाणे !

वर्गाचे स्वरूप अगदी एखाद्या शाळेतल्या वर्गाप्रमाणे होते. आमच्यापुढे

छोटी छोटी मेजे आणि पुढे मास्तरांचे टेबल, फळा, खडू, नकाशे अगदी यथासांग होते. टेबलावर छडी तेवढी नव्हती. आम्ही अठरावीस विद्यार्थी होतो. सकाळी साडेनऊ ते संध्याकाळी पाचपर्यंत शाळा चालत असे. त्यानंतर प्रत्यक्ष स्टुडिओतील शिक्षण. इथली शिस्त, नियमितपणा, टापटीप पाहून आपण गारठतो. टेलिव्हिजनच्या शास्त्रातले अनुभवी पंडित आम्हांला धडे देत — सक्तीने गिरवून घेत. सुमारे अडीच महिन्यांत हे सारे शिक्षण इतके पद्धतशीर देण्यात आले की, आमच्यापैकी प्रत्येकजण ज्या वेळी आपापले प्रॉडक्शन करण्यासाठी तयार झाला, त्या वेळी बी. बी. सी. च्या टेलिव्हिजनमधला खिळा न् खिळा आमच्या परिचयाचा झाला होता. प्रत्येक शिक्षक शंकासमाधान करायला तत्पर असे. अवघड प्रश्नांची उत्तरे देण्यापूर्वी शिक्षक मुदत मागून घेत आणि स्वत: पुस्तके चाळून त्यांतले उतारे नोंदवून घेऊन उत्तरे देत.



सर्वज्ञतेचा आव कुणी आणला नाही. बी. बी. सी.चा व्याप प्रचंड आहे. त्यातून टेलिव्हिजन हे तर जगड्व्याळ काम. हजारो माणसे इथे घड्याळाच्या काट्याप्रमाणे राबत असतात. पण ह्या सर्वांत मला जर खरोखर कुणाचे कौतुक वाटले असेल तर सेक्रेटरी म्हणून काम करणाऱ्या पोरींचे! ह्या चलाख पोरी टणाटण उड्या मारीत हसऱ्या चेहऱ्याने कामाचे भारे उचलीत असतात.

प्रत्येक प्रोड्यूसरला सेक्रेटरी असते. ह्या इतक्या तरबेज असतात की, कधी कधी प्रोड्यूसरच्या गैरहजेरीत प्रॉडक्शनचेदेखील काम त्या करू शकतात. बी. बी. सी.च काय, परंतु पाश्चात्त्य देशांतल्या साऱ्या मोठमोठ्या कंपन्यांच्या ह्या सेक्रेटरी म्हणून राबणाऱ्या पोरी जणू रक्तवाहिन्या आहेत! पहिल्याच दिवशी मला काही महत्त्वाची पत्रे टाईप करून घ्यायची होती. मी घरून पत्रे लिहून नेली आणि सकाळी टाइप करायला दिली.

पंधरा मिनिटांत सहीला पत्रे आली. माझा विश्वास बसेना. आमच्याकडे सामान्यत: दोनतीन दिवसांनी टंकलेखकाला दहा वेळा ढोसल्यानंतर पत्र टाईपरायटरवर चढायचे! दुसऱ्या एका गोष्टीने मला असाच धक्का दिला. परदेशांतल्या हपिसांतून चपराशी कधीच आढळले नाहीत. कागदांची हालचाल दर अर्ध्या तासाने मेसेंजर सर्व्हिस-मार्फत होते व बाकीची कामे साहेब स्वत: उठून करतात. टेबलावरचा ग्लास उचलून पाणी भरायला चपराशाला बोलावण्याची चैन परदेशांत नाही. एवढेच काय, पण मोठ्यांतल्या मोठ्या साहेबाला-देखील चहा प्यायची हुक्की आली तर स्वत: उठून सार्वजनिक उपाहारगृहात जावे लागते. चहाचा ट्रे घेऊन सरकारी कचेऱ्यांतून हिंडणारे 'बैरे' इंग्लंडमध्ये मला कधीच आढळले नाहीत. साहेबांची घरची कामे करणे हा आपल्याकडल्या चपराशांचा मुख्य व्यवसाय. त्यातून वेळ उरलाच तर फायली हलायच्या.



सकाळी सव्वाअकराला कॉफीची सुटी व्हायची. सव्वाअकरा वाजता उभे इंग्लंड कॉफी पिते. एक वाजता जेवते. चार वाजता चहा पिते. रात्री साताला पुन्हा जेवते आणि नऊ ते अकरा स्वत:ची करमणूक करून घेते. अकरा वाजता चिडीचूप करून झोपी जाते.

सारे जीवन आगगाडीच्या वेळापत्रकासारखे! बहुतेक हॉटेलेदेखील

ठराविक वेळी उघडझाप करतात. भलत्या वेळी चहा प्यायचे म्हटले तर चहा मिळायचा नाही. दुपारी तीन वाजता भुकेने कळवळून हॉटेलच्या दाराशी कुणी पडला तरी दार उघडायचे नाही. मोठा अजब लोकांचा देश! अवेळी खाणाऱ्यांनी सहा सहा पेनी यंत्राच्या फटीत कोंबत चॉकलेटे खावीत — कागदी पेल्यांतून कॉफी प्यावी. वर्गात व्याख्यानाच्या रंगात आलेला वक्ता-देखील सव्वाअकरा वाजले की विषय दहा सेकंदांत गुंडाळून कॉफीला पळायचा! बी. बी. सी. सारख्या संस्थांचे यश नियमितपणात आहे. दोन वाजता नाटकाची तालीम सुरू म्हणजे सुरू. अडचण आलीच तर टेलिफोन-वरून नटाचा किंवा नटीचा निरोप यायचा! वर्गात यायला एका मिनिटाने उशीर करणारा विद्यार्थी (वय वर्षे सामान्यत: चाळीसच्या आसपास) चौथी-पाचवीतल्या पोरासारखा अपराधी चेहरा करून माफी मागत वर्गात शिरायचा! मी तर एखाद्याची साताची अपॉइंटमेंट असली तर साडेसहापासून त्याच्या दारापुढल्या फुटपाथवर शतपावली करीत हिंडत असे. नियमितपणा मुख्यत: दुसऱ्या माणसाच्या वेळेला किंमत देण्यातून येतो. पाश्चात्त्य देशांत मनुष्य-बळ कमी. युद्धाने प्रचंड नरबळी घेतले. त्यामुळे माणसाला विलक्षण भाव आला आहे. यंत्राचा उपयोग अत्यंत अपरिहार्य आहे. बोलण्यात नेहमी हॉर्स पॉवरसारखा 'मॅन अवर्स' हा शब्दप्रयोग येतो. टेलिव्हिजनच्या कोणत्याही एका कार्यक्रमाला किती मॅन अवर्स लागतात ह्याची गणिते असतात, आणि त्यावर खर्च मोजला जातो.

टेलिव्हिजनच्या शाळेतले माझे दिवस अत्यंत आनंदात गेले. बरोबरीचे विद्यार्थी बी. बी. सी. रेडिओत पंधरा पंधरा, वीस वीस वर्षे काम केलेले होते. प्रत्येकाने युद्धकाळात गणवेष चढवून रणांगणावर कामगिरी बजावली होती. त्यातले दोघेतिघे हिंदुस्थानातही आले होते. या युद्धाने त्यांना खूप गोष्टी शिकवल्या. अर्थात वर्गात शाळेतल्या विद्यार्थ्यांप्रमाणे मास्तरांची चित्रे काढणे, एकमेकांना हळूच चिठ्ठ्या लिहून वात्रटपणा करणे हे देखील चालायचे. ह्या शिक्षकांतदेखील एका गोष्टीची मला मोठी मौज वाटली. प्रत्येक विषयाला एक एक तज्ज्ञ असे. मी एकूण पन्नाससाठ व्याख्याने ऐकली असतील. प्रत्येकाला इतकी चांगली विनोदबुद्धी कशी काय मिळाली

याचे मला कौतुक वाटे ! टेलिव्हिजनमधला अत्यंत तांत्रिक विषयदेखील गमतीदार चुटके सांगत सांगत चालायचा. इंग्रज विनोदाला घाबरत नाही. विद्वानातल्या विद्वान माणसालादेखील आपण हशा पिकवला तर आपल्या



विद्वत्तेच्या पगडीच्या झिरमिळ्या निसटून खाली पडतील, अशी भीती वाटत नाही. बी. बी. सी.-तले मोठ्यातले मोठे अधिकारी आम्हांला शिकवायला येऊन गेले. डोळे मिचकावून एखादी गोष्ट सांगताना आपल्या तोलामोलाला धक्का बसेल हे भय त्यांना नाही. त्याउलट देशी साहेबांचे काडे-चिराइती चेहरे जिज्ञासूंनी आठवावे ! अनेक अभिवादने, हस्तांदोलने — गुड मॉर्निंग, गुड इव्हिनिंग, थँक यू, बेग युवर पार्डन, असल्या शब्दप्रयोगांनी यांत्रिक जीवनाच्या खडखडीतपणालादेखील स्निग्धता येते. वरिष्ठांतल्या वरिष्ठाला कनिष्ठांतल्या कनिष्ठाने अभिवादन केले तरी त्याचा स्वीकार आणि परतफेड तितक्याच उत्साहाने होते. आमच्याकडे एकजण मुजरा करतो आणि दुसरा त्या दिशेला ढुंकून न पाहता जातो. जसजसा माणूस हुद्द्याने मोठा होत जातो तसतशी ही पाहून न पाहण्याची कला तो शिकत जातो, हा एतद्देशीय अनुभव आहे ! तिथे आमचा लिफ्टमनदेखील तो दोरखंड ओढता ओढता शीळ घालून गाणे म्हणायचा ! तिसऱ्याचौथ्या दिवसापासून त्याने मला 'पी. एल.' म्हणायला सुरुवात केली. आम्ही आमच्या लिफ्टवाल्याला इथे ताबडतोब समज देऊ !

मला वाटते, लोकशाहीदेखील रक्तात मुरावी लागते. त्याला काही पिढ्या जाव्या लागतात की काय कोण जाणे ! एकमेकांना मानाने वागवणे हेच कुठल्याही संस्कृतीचे बीज आहे. कोणत्याही इंग्लिश दुकानात गेले

किंवा कचेरीत गेले की, एक अगत्य दिसे. हे मनापासून असे की नसे, हे सांगणे अवघड आहे. परंतु आपले स्वागत हसून झाले की आनंद होई. मात्र इंग्लंडमधील भारतीयांनी आपला बाणा सोडला नाही. त्यांच्या-पुढे आदर्श आहे तो हिंदुस्थानात साहेब होता त्या वेळचा! ती लाचारी आणि मुजोरी अशी काही मिसळून आली आहे की, पाहणाऱ्याने पाहत राहावे. हिंदी बांधवांनी चालवलेल्या सरकारी आणि खाजगी संस्थांत तुम्ही शिरलात की आपण ' ब्याद ' आहोत असे पाहणाऱ्याला वाटते आहे, हे लगेच ध्यानात यावे. आम्ही फुकटच्या हस्तिदंतीला महाग आहो. त्यामुळे हिंदी कचेऱ्यांतून जाणे नको वाटे. ऐशी टक्के चेहऱ्यांवर एक तुसडी छटा! ह्याचा नमुना परदेशी न जाता इथेही आढळतो म्हणा! सदैव तोंडापुढे माणूसघाणेपणाची ढाल धरून वागणारा हा हिंदी बांधव असा का वागतो, हेच मला कळत नसे. मला माझ्या मुक्कामात अनेक तरुण विद्यार्थी भेटले. ते तर हिंदी हपिसरांच्या वागण्याने रडकुंडीला आले होते. बहुतेकांच्या बोलण्यात आपल्या परराष्ट्रीय खात्यापेक्षा अन्यदेशीयांच्या तसल्या खात्याविषयी स्तुती असे. कुठेही अगत्य नाही, आपुलकी नाही, दुसऱ्यांच्या भावनांबद्दल आदर नाही, गैरसोयीची जाण नाही, वेळेवर हातात स्कॉलरशिप नाही. त्यामुळे बावरून गेलेले असले हे विद्यार्थी पाहून मला वाईट वाटे! परदेशात अशा वेळी माणसाने जगावे कसे? पण पिवळ्या कागदाला भावनेचे वावडे आहे. मृत्यूचा दाखला आणि नोकरीतील बढती त्या कागदावर एकाच भकासपणाने लिहिलेली असते.

डोळ्यांपुढे कुठलीही योजना नसताना नोकरी करून शिकायच्या उद्देशाने आलेले काही हिंदी तरुण नुसतीच नोकरी करून जेमतेम चरितार्थ चालवताना आढळले. तिथल्या मद्यालयात पेलेबश्या विसळून शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना अभ्यासाला खरोखरीच वेळ मिळत नाही. वाईट मात्र एवढेच वाटते की, ही मुले कमालीची निराश, भकास होऊन दोरी तुटलेल्या पतंगाप्रमाणे जगत असतात. त्यांना भारतीय समाजाकडून आसरा मिळत नाही आणि इंग्रजी समाजात जायला त्यांना आधार नसतो. मग जोडीच्या पेले विसळणाऱ्या पोरींशी मैत्री करून त्या तसल्या जीवनात काही रंग

निर्माण करण्याचा त्यांचा प्रयत्न चालतो. त्याबरोबरच काही गुणी तरुण धडपडत असतात, एक वेळचे जेवून विद्यार्जन करीत असतात आणि भारतातल्या श्रीमंत व्यापाऱ्यांच्या उनाड पोरांना मिळणाऱ्या सवलती पाहून ते कायमचे इंग्लंडमध्येच राहण्याचे बेत आखीत असतात.

इंग्लंडमध्ये शनिवार आणि रविवार हे दोन सुट्टीचे दिवस. शनिवारी कचेऱ्या बंद असतात. परंतु दुकाने उघडी असल्यामुळे हा दिवस बहुधा बाजाराचा असतो. दुकाने तुडुंब भरलेली असतात. तिथे शॉपिंग हा एक अतिशय आनंदाचा भाग आहे. आपल्याकडे बाजारहाट म्हणजे जीव गुदमरायची पाळी! त्यातल्या त्यात पुणेरी दुकानदारांचे प्रेम खूप लाभल्यामुळे दुकानदारीणबाईंनी अभिवादन वगैरे केले की लाजल्यासारखे व्हायचे. वस्तूंच्या किमती व्यवस्थित मांडलेल्या. झिगझिग नाही. घासाघीस नाही. प्रदर्शन पाहिल्यासारखे दुकान पाहावे, वस्तू उचलाव्या, दाम मोजावा आणि बाहेर यावे!

"चांगला खवा आहे का हो?" हा प्रश्न नाही आणि "इथे व्हाईट खवा विकायचा धंदा काढला नाही" हे तोंडापुढला 'सकाळ' बाजूला करीत उर्मट उत्तर नाही. मराठी मनाला त्यामुळे इंग्रज दुकानदाराच्या अगत्याने बरेच संकोचल्यासारखे होते. क्वचित एखादा दुकानदार तुळशीबागेची याद दिलवून देतो. पण हा अपवाद. दुकानात मुख्य गर्दी बायकांची! विकणाऱ्या आणि विकत घेणाऱ्या. सेल्फ्रिजिस किंवा हाउन्सडिचसारखी प्रचंड दुकाने म्हणजे संस्थाने आहेत. फॉइल्ससारखा बुक डेपो पाहिला की थक्क व्हायला होते. लंडनमधल्या अशाच एका प्रचंड दुकानात मागाल ती वस्तू मिळवून देण्याची हमी आहे. कुणी तरी तिथे 'व्हिनॉसरस'ची ऑर्डर देऊन गेला आणि त्याला ह्या दुकानातून वर्षअखेर जिवंत 'व्हिनो' मिळाला देखील. ह्याच दुकानात भारतीय स्वातंत्र्याची ऑर्डर प्लेस केली असती तर तेसुद्धा त्यांनी दिले असते. ही सहा मजली दुकाने, त्यांतल्या शेकडो विक्रेत्या पोरी, उघड्यावर मांडलेल्या वस्तू आणि

अनेक परदेशी गिऱ्हाइके — ह्या गडबडीत चोरी होत नाही याचे मला आश्चर्य वाटे! परंतु ह्या दुकानदारांचे गुप्त पोलिस दुकानांतून हिंडत असतात. हा खुलासा ऐकला आणि काळजी मिटली. बाकी मला इंग्रज दुकानदारांची काळजी करण्याचे कारण नाही. परंतु दोन आण्यांचे तेल आणि दीड आण्याची मीठमिरची ह्यातले आम्ही,— सुरुवातीला उगीचच दुसऱ्याबद्दल काळजी वाटे हे खरे!

लंडन शहरात बिऱ्हाड थाटल्यामुळे पिशवी घेऊन बाजार करणे प्राक्तनी आले. हिंदुस्थानात हा योग चतुराईने टाळत आलो होतो. परंतु तिथे मात्र बाजाराचा दिवस आला की उत्साह वाटे. आमच्या घराजवळच ' जॉन बार्न्स 'चे मोठे दुकान होते. इंग्लंडमध्ये सर्वत्र वुलवर्थसारखी आबालवृद्ध स्त्रीपुरुषांच्या गरजेच्या वस्तू पुरविणारी मोठमोठी दुकाने आहेत. लायन्सची हॉटेले आहेत. कुठलेही इंग्लिश गाव चर्च, पोस्ट, वुलवर्थ, लायन्स आणि विटनेज एलची जाहिरात यांशिवाय जगूच शकत नाही. ही विटनेज एलची जाहिरात तर अगदी डोंगरे बालामृताप्रमाणे सर्वव्यापी आहे.

टेलिव्हिजनच्या शाळेतून सवड मिळाली की लंडन पाहण्याचा कार्यक्रम चालायचा. आता दिवस लहान होत चालले होते. हेमंत सुरू झाला होता. दुकानातून विंटर फॅशन्सच्या जाहिराती लागल्या होत्या आणि झाडांनी ' ऑटम फॅशन्स ' सुरू केल्या होत्या. आमच्या घरापासून रीजेंट्स पार्क फार दूर नव्हते. लंडनमध्ये आलो तेव्हा ते पार्क रंगीबेरंगी फुलांनी नटले होते. आता हिरवळीचा हिरवेपणा सोडला तर बाकी सर्वत्र पानांवर तांबूस सोनेरी मुलामा येऊ लागला होता. आणखी काही दिवसांनी पतझड सुरू होणार होती.

थंडी पडायला सुरुवात झाली वगैरे भाषा तिथे संभवत नाही. थंडी ही नेहमीचीच. फक्त पारा कमीजास्त. पण थंडीचा पारा चढायला लागला होता. एके दिवशी सकाळी लंडनच्या चेलसी विभागातले कार्लाइलचे घर पाहायला जायचे ठरविले. ' चैनी रो ' नावाच्या, पुण्यातल्या मुंजाबाच्या बोळासारख्या एका बोळात हे घर आहे. फुटपाथच्या दोन्ही बाजूंना

लोखंडी कठडे असलेल्या त्या बोळात नंबर शोधीत शोधीत चोवीस नंबरापुढे आल्यावर दारावरचा ' नॉकर ' वाजवला आणि एका म्हातारीने दार उघडून आम्ही विचारण्यापूर्वीच ' या, हेच कार्लाइलचे घर ' असे म्हणून हसत आमचे स्वागत केले. हे घर आता इंग्लंडच्या पुराणवस्तु-विभागाच्या मालकीचे आहे. अठराशे एक्यांयशीच्या फेब्रुवारी महिन्यात कार्लाइल वारला आणि अठराशे पंचाणव साली कार्लाइल स्मारक समितीने हे घर विकत घेतले. तेव्हापासून तिथली प्रत्येक वस्तू जशीच्या तशी जपून ठेवली आहे. हे जसेच्या तसे जपून ठेवणे हा पाश्चात्त्यांचा विलक्षण छंद आहे. ऐतिहासिक दृष्टीने कार्लाइल कालपरवाचा, परंतु बाराव्या-तेराव्या शतकांतल्या राजाराण्यांच्या आणि महापुरुषांच्या वापरातल्या वस्तूदेखील प्रदर्शनातून आढळतात. कार्लाइलचे घर दाखवताना ती म्हातारी जणू काय आणखी पाचदहा मिनिटे आम्ही थांबलो तर कार्लाइल तेवढ्यात येईल, अशा रीतीने बोलत होती. ती गेली तीस वर्षे तिथे राहते. त्यापूर्वी तेहतीस वर्षे तिची सासू हे घर सांभाळीत होती. कार्लाइलला कुठल्याही सच्च्या इंग्रजाप्रमाणे बागेचा षोक होता. परसदारी त्याचा तो चिमुकला बगीचा — कार्लाइलच्या शब्दांत सांगायचे म्हणजे ती गार्डन, ' सो कॉल्ड इन द लँग्वेज ऑफ फ्लॅटरी —. ' पण त्या तथाकथित बगीच्यात तो खुरपे चालवीत असे, फुलझाडे लावीत असे आणि उन्हाळ्याच्या दिवसांत वाचन करीत असे. रात्री झोपण्यापूर्वीचा पाइपचा शेवटला दम घेत असे. मृत्यूपूर्वी काही वर्षे त्याने एका ठिकाणी लिहिले आहे —

" त्या बागेत मी असाच रात्रीचा हुक्का ओढीत, आकाशातली अगणित नक्षत्रं पाहत बसलो असताना माझं मन विलक्षण अशा भावनेनं भरून आलं. कदाचित देवाच्या विस्तीर्ण रंगमंदिरातली ही दौलत आज जी मी ' याचि देही याचि डोळा ' पाहतो आहे ती न जाणो अखेरची पाहत असेन ! ही कवाडं एके दिवशी बंद होतील आणि हे काहीच मी पाहू शकणार नाही. या साऱ्या लीलेतलं मला जे काही कळलं तेदेखील किती थोडं ! उरला तो सारा प्रयत्न आणि जिज्ञासा ! हे दिव्य सुख

कायमचं हिरावलं जाणार, हा विचार मनाला व्याकूळ करतो. पण लगेच दुसरा विचार उफाळून येतो की, ज्या जगदीश्वरानं मला सात्त्विकतेचा साक्षात्कार घडवला, असंख्य वेळा माझं मस्तक आदरानं नमवलं, ज्यानं माझ्या पोटी जिव्हाळा उत्पन्न केला, त्यानं अल्पजीवी मानवाला हेही म्हणावं—'अरे, सत्प्रवृत्तीच्या मार्गावर एवढी वाटचाल केलीस— चल, आणखी पुढं जायची परवानगी देतो. धीर धर— निराश होऊ नकोस !' "

कार्लाइलच्या अभ्यासिकेत बसून एका काचेखाली ठेवलेल्या त्याच्या पुस्तकातले हे उघडे पान वाचताना परसातल्या चेरी वृक्षाखाली बसलेला वृद्ध कार्लाइल त्या पुस्तकाच्या पानातून दिसायला लागला. थोर पुरुषांच्या वास्तव्याने वास्तूदेखील भारल्यासारख्या होतात. कलकत्याला दक्षिणेश्वरी रामकृष्णांच्या खोलीत गेलो असताना मी असाच भारावून गेलो होतो. गंगेच्या काठची विवेकानंदांची खोली पाहताना अंत:करण भरून आले होते. दूरदेशीच्या कार्लाइलनेदेखील डोळ्यांत आसवे आणली. मी काहीसा थकून त्याच्या दिवाणखान्यातल्या एका जुनाट खुर्चीवर बसलो आणि कार्लाइलचे घर दाखवणारी वृद्ध मिसेस स्ट्रॉंग म्हणाली, "रॉबर्ट ब्राउनिंग इथे आला की त्याच खुर्चीवर बसत असे !" मी चटकन उठून उभा राहिलो. कोपऱ्यातला छोटा पियानो शॉपेंच्या करांगुलीने पुनीत झाला होता. दारावरच्या पडद्यावरला कशिदा लावण्यमयी जेन कार्लाइलच्या हातांनी केलेला होता. परसदारीच्या वालनट वृक्षावरची जवळ जवळ सहा पेनी किमतीची वालनट्स आपल्या ओंजळीत घेऊन 'आमच्या बागेतली वालनट्स' म्हणून ती अभिमानाने पुढ्न आली होती. कार्लाइलच्या घराने मनावर विलक्षण परिणाम केला. वास्तविक कार्लाइलचे 'सार्टर रिझार्ट्स' हे एकमेव पुस्तक मी वाचले आहे. पण तिथल्या प्रत्येक वस्तूचा इतिहास ऐकताना आम्ही गुंगून गेलो. दिवाणखान्यात एक सोफा होता. हा सोफा विकत घेतला तेव्हा जेन कार्लाइलने आनंदाने उचंबळून येऊन आपल्या नवऱ्याला पत्रात लिहिले होते, "आय केम, सॉ अँड बॉट ए सोफा— तू हा सोफा पाहिलास, की लगेच म्हणशील की, ही निवड करताना तुझा विचार माझ्या

मनात होता. कारण तो खूप मोठा आहे आणि खूप साधा आहे. " कार्लाइल खूप मोठा होता आणि साधा होता. जेनचे जीवन संपूर्ण कार्लाइलमय होते. कार्लाइलची ही जोडीदारीण आपल्या फैटणीतून घरी येता येता एकाएकी वारली. त्यानंतरची पंधरा वर्षे कार्लाइलने त्या घरात कशी काढली असतील, याची कल्पनाच करवत नाही. मरताना कार्लाइल शहायशी वर्षांचा होता. सत्तरऐंशी वर्षांपूर्वी ते घर रिकामे पडले. पण आजदेखील ते पाहताना त्यातल्या वस्तुवस्तूवर ह्या इंग्रजी साहित्यातल्या श्रेष्ठ लेखकाची आणि त्याच्या अत्यंत प्रेमळ पत्नीची छाया पडलेली दिसते!

कार्लाइलच्या घराप्रमाणेच डिकन्स, कीट्स, जॉन्सन यांची घरे पाहिली. डॉ. जॉन्सनच्या घराने फार निराशा केली, पण अंत:करणात घर केले ते मात्र कार्लाइलच्या घराने! परगावी किंवा परप्रांती गेले की, हा पाहण्याचा कार्यक्रम कित्येकदा आपण कर्तव्य म्हणून उरकतो. लंडनला येऊन ब्रिटिश म्यूझियम पाहिला नाही असे कोणी निंदू नये ह्या एकाच उद्देशाने मी म्यूझियम पाहायला गेलो. पण खऱ्या अर्थाने ब्रिटिश म्यूझियम पाहायला एक संपूर्ण आयुष्य पुरायचे नाही. मी फक्त अर्धा दिवस कळ सोसली. इजिप्त विभागात जाऊन सापडलो आणि 'ममी' आणि अत्यंत अनाकलनीय अशा इतर काही वस्तू पाहून हे काम आपले नव्हे म्हणून निघालो आणि तडक लंडनचे 'झू' गाठले.



आम्ही प्राणिसंग्रहालयात जाऊन पोचलो. ती वेळ सर्व प्राण्यांच्या भोजनाची होती. इंग्रजांनी संग्रहालयातल्या प्राण्यांना देखील जेवताना ब्रिटिश शिष्टाचार शिकवले आहेत की काय, ते पाहण्याची उत्सुकता होतीच — मागल्या दोन पायांवर नॅपकिन ठेवून सिंहमहाराज टोमॅटो सूप भुरकीत आहेत, गजराज सोंडेने क्रीम क्रॅकर मोडताहेत, वाघ उकडलेले

अंडे सुरीने कापताहेत, कोल्हा आपले एग अँड बेकन खाऊन उंटाच्या पावावर डोळा ठेवून आहे, लांडगा कॉफीची वाट पाहतो आहे, अस्वल चिरूट ओढीत ' लंडन टाइम्स ' उघडून बसला आहे, ( ' लंडन टाइम्स ' हादेखील सच्च्या इंग्रजाच्या आहाराचाच भाग आहे.) आणि अस्वलीणकाकू पर्समधून छोटा आरसा आणि लिपस्टिक बाहेर काढताहेत. पण प्राणिसृष्टी इंग्रजी शिष्टाचारांच्या तडाख्यातून सुटलेली दिसली. काटेचमचे न वापरता आपल्या नखाग्रांनी मांसखंड भेदण्याचे काम चालू होते. गजांपलीकडे कुठल्याही राणीच्या बागेत साजेशी मुलामाणसांची गर्दी उभी होती. परंतु उदरभरणात गढून गेलेल्या पशूंच्या चेहऱ्यांवर एक तन्मयता दिसत होती. भोवतालच्या जगाची तिथे जाणीव नव्हती. काही पावले टाकून पुढे गेल्यावर एक मोठे उपाहारगृह होते. तिथे मनुष्यप्राण्यांचादेखील हाच कार्यक्रम चालला होता. एखादे भक्कम सँडविच अगर अमेरिकन हॉट डॉग ( खाण्याच्या पदार्थाला ' गरम कुत्ता ' यासारखे घाणेरडे नाव नसेल.) तोंडात कोंबत बसलेला हा द्विपाद आणि पिंजऱ्यापलीकडले ते चतुष्पाद ह्यांच्या चेहऱ्यांवर खाताना विलक्षण साम्य दिसत होते. मला तर वाघाच्या चेहऱ्यावर एक सूक्ष्म हास्याची छटादेखील उमटलेली दिसली. त्याला बोलता आले तर एखादा लचका गिळल्यानंतर तो एकदम " वाह, लाजवाब है ! " असा उद्गार काढीलसे वाटले. वाघ हा जर कधी बोलला तर उर्दूच बोलेल, असे मला उगीचच वाटते.

माझ्या पाहण्यात गरुड हा पक्षी कधी आला नव्हता, तो मी ह्या प्राणिसंग्रहालयात पाहिला. भारतातून नेलेले कितीतरी प्राणी ह्या संग्रहालयात आहेत. बंगाली वाघ, सिंह आणि सर्वांत लोकप्रिय म्हणजे हत्ती. लहान मुलांचे अत्यंत आवडते प्राणी म्हणजे हत्ती आणि टेडी बेअर ! पिवळ्या तोंडाचा आणि नाका-डोळ्यांभोवती काळ्या रंगाची वर्तुळे रेखलेला ' पांडा ' काही दिवसांच्या मुक्कामासाठी लंडनला आला होता. एका गोल रिकाम्या हौदात त्याला ठेवला होता आणि हा खट्याळ प्राणी अशा काही गमती करीत होता की, पोरांच्या हसून हसून मुरकुंड्या वळत होत्या. एखाद्या तयार विदूषकासारख्या त्याच्या लीला चालल्या होत्या. हत्तीचे मात्र ह्या इंग्रज मुलांमुलींनी

हाल चालवले होते. ठिकठिकाणी 'प्राण्यांना खायला देऊ नका, त्यांच्या तब्रियती बिघडतील,' अशा पाट्या लावूनदेखील ही मुले हत्तीला मटण, हॅम, एग, सँडविचेस खायला देत होती. बिचारा शाकाहारी हत्ती सोंड मुठीत घेऊन हे सारे सहन करीत होता. मला हत्तीची दया आली आणि या भारतीय प्राण्याविषयी आजूबाजूच्या मंडळींना चार शब्द ऐकवायचा प्रयत्नही मी केला. त्याचा काहीही परिणाम झाला नाही. मुले सँडविचेस देत होती आणि हत्ती खात होता. आपल्याकडे फार तर माकडांना शेंगदाणे टाकतात. इथल्या माकडांनाही 'पी-नट्स' मिळत असतातच. इंग्रजी माकडे मला जरा गंभीर वाटली. कदाचित समोरची माणसे वागतात तसे आपण वागायचे, ह्या वानरधर्माला अनुसरून ती वागत असावी.

ह्या लंडनच्या झूमध्ये जवळजवळ पुरा एक दिवस आम्ही भटकलो. बाकी हे पिंजऱ्यातले प्राणी येणाऱ्याजाणाऱ्याकडे मोठे सराइताच्या डोळ्यांनी पाहतात. विशेषतः, एका पिंजऱ्यातल्या शहामृगाने माझ्याकडे हा एवढा डोळा करून पाहिलेले मी जन्मात विसरणार नाही. त्या गोऱ्या लोकांच्या समुदायात हा काळा पाहुणा कोण बुवा, असा त्या डोळ्यांतला भाव मला स्पष्ट दिसत होता. उलट हत्ती, भारतीय गाय वगैरे प्राणी ओळख दाखवीत होते. बाकी भारतीय गायीची शोभा इंग्रजी गायीला नाही.



इंग्रजी गाय म्हणजे दूध देणारे यंत्र वाटते. आपली गोमाता कशी शालीन, सोज्वळ दिसते. मी आपला त्या गायीकडेच पाहत राहिलो. का कोण जाणे, पण त्या विसंवादी वातावरणात आमची देशी गाय उभी राहिलेली पाहून गोरेगावकरांच्या चाळीतून दोन देवळांतल्या कीर्तनाला

निघालेल्या जानकीकाकू पोर्तुगीज चर्चमध्ये घुसाव्यात तसे वाटले! संस्कार ही काय जबर गोष्ट आहे! एरवी मी हिंदुस्थानातल्या गायीकडे



कधी ढुंकूनदेखील पाहत नाही. पण लंडनमधल्या त्या प्राणिसंग्रहालयातली ती गाय मला भलती करुण वाटली — बंदिस्त देवकीसारखी!

परदेशी गायींप्रमाणेच परदेशी नद्यांनादेखील आपल्या नद्यांचे सौभाग्यलेणे चढलेले नाही. 'ब्ल्यू डॅन्यूब'च्या भोवती असलेली इष्काची अस्मानी ओढणी सोडली तर इतर नद्यांभोवती अशी वलये एकूण कमीच! इंग्रजी गायी आडदांड आणि नद्या मात्र गोगलगाईसारख्या सरपटणाऱ्या. खुद्द लंडनमधील टेम्सदेखील फारशी सुंदर नाही. एक तर ह्या तमसेच्या पाण्यात आजूबाजूच्या कारखान्यांतले आणि सतत जाणाऱ्या जहाजांचे तेल तरंगत असते. दुतर्फा गुदामे, उंच याऱ्या, धुराडी यांचीच शोभा! रात्रीच्या वेळी झगमगणारी रोषणाई काही जादू करीत असेल तेवढीच. एरवी नदीकाठ म्हणतात तसला काही राहिलेला नाही. एके काळी असावा. लंडनचा टॉवर ह्या तमसाकाठीच आहे! तिथे जाऊन एकदा कोहिनूर हिरा पाहून आल्याखेरीज इंग्लंडच्या यात्रेचे पुरे पुण्य पदरी पडले नसते.

ह्या टॉवरच्या आतल्या भागात तर इंग्रजांच्या पुराणमताभिमानाची पुरी साक्ष पटते. अगदी आठव्या हेन्रीच्या अमदानीतले पोषाख चढवून इथे योमन व इतर गार्ड उभे असतात. शस्त्रागार आणि जवाहिरखाना ही इथली प्रमुख

आकर्षणे! दारातच तो सुप्रसिद्ध गार्ड उभा असतो! त्याच्या डोक्यावरची ती पिसांची उंच टोपी आणि एखाद्या पुतळ्यासारखी निश्चल उभे राहण्याची त्याची योगसाधना अचाट आहे. प्रवासी लोक त्याच्यापुढे उभे राहून काय वाटेल ते बोलतात, त्याची थट्टा करण्याचा प्रयत्न करतात, परंतु हा जिवंत पुतळा डोळ्याची पापणीदेखील हालवत नाही. एखाद्या अखंड जिवंत माणसाला असा वजनदार पोषाख घालून पुतळ्यासारखे का म्हणून उभे राहायला लावायचे, ते मला अजूनही कळले नाही. बरे, मुका नसून न बोलणारा माणूस ह्याचे इंग्रजाला कौतुक वाटायचे कारण नाही. कारण त्या अलौकिक बेटावर जेवणाखेरीज अन्य वेळी तोंड न उघडणारे महाभाग पुष्कळ आहेत. खाजगी काय, सार्वजनिक काय, कोणत्याही ठिकाणी इंग्रज मुक्याचे व्रत आचरताना दिसतो. इंग्रज बोलतो फक्त 'पब'मध्ये. टॉवर ऑफ लंडनमध्ये फिरताना बरोबरचा मार्गदर्शक आमच्या शाळेत शिकलेल्या इतिहासाची उजळणी करीत होता. टयूडर, स्टुअर्ट आणि हॅनोव्हर घराण्यांचा व माझा संबंध फार वर्षांनी पुन्हा जुळून येत होता. सहावा, सातवा व आठवा हेन्री, ॲन बुलिन, मेरी क्वीन ऑफ स्कॉट्स, थॉमस वुल्झे, पहिला जेम्स वगैरे मंडळींचे पुनश्च नामस्मरण झाले आणि काही लक्षात ठेवले पाहिजेच असे नाही, या सुखद विचाराने मनाला गारवा आला. निश्चिंत मनाने मी त्यांच्या तलवारी, चिलखते, कुणाची मुंडकी ज्या लाकडी ठोकळ्यावर उडवली ते ठोकळे, फरशा वगैरे पाहत होतो.



इतक्यात एक गार्ड आमच्याजवळ आला. आम्ही भारतातून आलो आहोत, एवढेच नव्हे तर आम्ही मुंबईचे आहोत, हेदेखील त्याने ओळखले. माझ्या पत्नीकडे पाहत " मुंबईच्या बायका मी लगेच ओळखतो " असे तो अभिमानाने म्हणाला. त्याच्या आयुष्याची तीस वर्षे कुलाब्याला गेली होती. त्याने मुंबईची मोठ्या आस्थेने चौकशी केली आणि " रेक्लमेशनचे काम पुरे झाले काय ? " असा प्रश्न विचारला. त्याने मुंबई सोडली तेव्हा समुद्र मागे हटवण्याची योजना आखण्यात आली होती. त्याच्याकडे पाहून हा इसम ऐंशीच्या घरात आला आहे, यावर माझा विश्वासच बसेना. ह्या पाश्चात्त्य लोकांचे वय कळणे जवळ जवळ अशक्य ! गप्पागोष्टीतल्या उल्लेखांवरून वयाचा अंदाज करावा ! चौदा सालच्या महायुद्धात······अशी प्रस्तावना झाली की त्यावरून गणित मांडावे.

टॉवर ऑफ लंडनमधल्या त्या रक्षकाला हिंदुस्थानविषयी विलक्षण जिव्हाळा होता. ' सध्या आमचे कसे चालले आहे ? ' याची त्याने अत्यंत आस्थेनें चौकशी केली. त्याच्या नऊच्या नऊ मुलांचा जन्म हिंदुस्थानात झाला होता. असल्या मंडळींना पुन्हा एकदा हिंदुस्थानात फिरवून आणावे, असे मला मनापासून वाटले. त्याला ताज्या बोंबलाची आठवण येत होती. त्याच्या डोळ्यांपुढली मुंबई, झुकझुक गाडी विरार ते कुलाबा जात होती त्या वेळची होती. राजकीय पुढाऱ्यांत ' तिलक ' हे नाव त्याला आठवत होते. त्याचा निरोप घेताना त्याला आम्ही ' नमस्ते ' केला आणि त्यानेही हात जोडून ' सलाम साहब ' म्हणण्याचा प्रयत्न करून आपले निळे निळे दोन डोळे मिचकावले ! सगळेच इंग्रज म्हातारे झाले की त्यांचे डोळे निळे निळे होत जातात की काय कुणास ठाऊक !



त्या म्हाताऱ्याचा निरोप घेऊन किल्ल्याच्या तटाच्या दिशेने निघालो आणि नदीच्या काठावर जाणारी एक चोरवाट दिसली. अर्थात ही चोरवाट आता 'पब्लिक' झाल्यामुळे तितकीशी चोरवाट राहिली नाही. पण तमसेचे जरा अधिक जवळून दर्शन घ्यावे म्हणून त्या वाटेने बाहेर पडलो — तो लंडनचा तो प्रसिद्ध पूल दुभंगून हवेत जाताना दिसला. हा पूल म्हणजे स्थापत्यविशारदांनी साधलेले एक नवलच आहे. पुलाखालून मोठमोठ्या बोटी जात असतात. पण काही बोटी इतक्या उंच असतात की त्यांना वाट करून द्यावी लागते, आणि मग हा पूल ब्रिजेच्या साहाय्याने दुभंगला जातो. दोन्ही हात वर करून तो बोटींना वाट करून देतो आणि पुन्हा सांधला जातो. पुन्हा वाहनांचा अनिरुद्ध प्रवाह खालच्या टेम्सच्या प्रवाहासारखा सुरू होतो.

टॉवर ऑफ लंडनमधले सर्वांत मोठे आकर्षण म्हणजे कोहिनूर हिरा! त्या जवाहिरखान्यात इतके हिरे आणि रत्नजडित अलंकार आहेत की, कोहिनूर त्यांत श्रेष्ठ का हे फक्त तज्ज्ञालाच कळावे. मला तर बहुतेक हिरे कोहिनूर वाटले. इंग्लिश राजाराणींचे मुकुटही तेथेच ठेवले आहेत. राजदंड आणि इतर राजचिन्हे आहेत. एका अर्थी कोसळत्या साम्राज्याबरोबर ह्या चिन्हांचाही दरारा कोसळला. पण इंग्रजाला राजाराणींच्या दराऱ्यापेक्षा त्यांचे प्रेम अधिक आहे. त्यांच्या राजकीय जीवनापेक्षा त्यांच्या भावजीवनात ह्या सिंहासनांना मोलाचे स्थान आहे. ब्रिटिश बादशाही ही नावापुरतीच आहे हे खरे. पण त्या नाममाहात्म्याला फार मोल आहे. त्यांना आपल्याला राजा किंवा राणी असणे आवडते. तो कोहिनूर हिरा पाहताना मात्र हा वास्तविक आमच्या मालकीचा आहे, हा विचार मनाला चाटून गेला आणि तिथल्या इतर लोकांपुढे मी तो उगीचच बोलूनही दाखविला. माझे बोलणे ऐकण्याच्या मन:स्थितीत कुणीही नव्हते ही गोष्ट निराळी! मला मात्र खरे बोलून राष्ट्रीय भावनेला जागल्याचे समाधान मिळाले. सत्याग्रहाच्या दिवसांत रस्त्यात लाठीमार सुरू झाला की घरात पळत येऊन दरवाजे बंद करून न्हाणीघरात जोरात एकदा ' हिंदमाता की जय ' म्हणून ओरडून राष्ट्रकार्य केल्याचे समाधान साधण्यापैकीच

तो प्रकार होता. कोहिनूर हिरा ही गोष्ट अलौकिक हे खरेच. पण पुष्कळदा वाटते, ह्या हिऱ्याखाली 'कोहिनूर' लेबल नसते तर तो तितका अलौकिक वाटला असता का? एक तर हिऱ्याबिऱ्यात मला काही म्हटल्या काही कळत नाही. फार वर्षांपूर्वी एका संस्थानिकाचा जवाहिरखाना पाहत असताना त्यातल्या एका हिऱ्याच्या हाराची किंमत दहा लाख रुपये, असे तिथल्या अधिकाऱ्याने सांगितले. मी नकळत "का पण?" असा प्रश्न केलेला मला स्मरतो! हिरा ह्या वस्तूसंबंधीच्या तीन गोष्टींबद्दल मला कुतूहल आहे. एक म्हणजे तो गिळला की माणूस मरतो. दुसरी म्हणजे ढेकणांच्या संगे तो भंगतो, आणि तिसरी म्हणजे त्याचे वजन रतींवर होते. ह्यापलीकडे मला हिरा या विषयात रतीभरही गती नाही. व्हावी अशी इच्छाही नाही. तात्पर्य, कुठल्याही गावी गेल्या-नंतर हे जे काही प्रेक्षणीय स्थळे पाहणे प्रकरण असते, त्याच्याशी माझे गोत्र जमत नाही. बरेचसे पाहणे उगीचच 'पाहिले नाही' म्हणायला नको, ह्या भीतीपोटीच होते की काय कोण जाणे.

मला पाहायला आवडतात माणसे! सकाळी उठून पर्वतीला फिरायला जाणारी माणसे — विशेषत: पेन्शनर मंडळी, त्यांच्यामागून जावे. रोज सकाळी न कंटाळता उठणारी, न कंटाळता स्वत:ला लोकरीत गुंडाळून घेणारी आणि न कंटाळता आपली बिट्याहून अष्ट्याला बदली झाली, तेव्हा काय गंमत झाली ते सांगणारी! ह्या म्हाताऱ्या माणसांसारखीच प्राथमिक शाळेतली पोरे शाळा सुटल्यावर गटागटांनी जातात तेव्हा त्यांच्याहीमागून त्यांच्या नकळत जाण्यात विलक्षण आनंद असतो! ज्याला विशेष काही बोलायचे असते तो मुलगा त्या गटाच्या पुढे येऊन रस्त्यात उलटा उलटा जात असतो. दहा मिनिटे त्यांच्यामागून चालावे; विषयाचा पत्ता लागत नाही, पण सगळी तोंडे हलत असतात. त्यातून मग त्या गटाच्या चार पावले मागे राहून चालणाऱ्या चिमण्या सखूबाई-साळूबाईंचे काही विशेष हितगूज चालू असते. चालताचालता थांबून उगीचच एकमेकींच्या कानांत काही तरी गुप्त गोष्टी सांगितल्या जातात. 'अगदी कंठाशप्पत' म्हणून गळ्याला चिमटा काढला जातो — आणि पुन्हा वाटचाल सुरू होते! अशाच

प्रेक्षणीय माणसांच्या यादीतली माझी आवडती माणसे म्हणजे रस्त्यावर खडी किंवा डांबर पसरून, तांबड्या फडक्याचा बावटा रोवून जवळच्या एखाद्या झाडाखाली तंबाखू चोळीत बसणारे मजूर ! ह्यांचेही विषय अफाट असतात. सारांश काय, माणसाने माणूस पाहावा ! तरुण पाहावा, म्हातारा पाहावा, सुरूप पाहावा, कुरूप पाहावा. पुष्कळदा वाटते की, जीवनाविषयीचे चिंतन माणसांच्या गर्दीत होते तसे एकान्तात होत नाही.

परदेशाच्या प्रवासात मला सगळ्यांत अधिक ओढ होती ती तिकडची माणसे पाहण्याची, त्यांच्याशी बोलायची. पण हे कलम म्हणावे तसे जमले नाही. ‘ भावबंधना ’तल्या धुंडिराजाच्या भाषेत सांगायचे म्हणजे ‘ जो तो आपला ह्यात ! ’ बरे, जी ओळखपाळख झाली ती सुंदर शिष्टाचारांचा मेकप करूनच बोलायची. तुम्ही किती चांगले, आम्ही किती चांगले, यापुढे भाषणाचे तट्टू पुढे सरकायचेच नाही ! मात्र तुमच्या साहाय्याला, मदतीला अगदी नेहमी तयार. आम्ही पार्लमेंट पाहायला गेलो तर आमच्या डाव्या बाजूला एक मजूरपक्षाचा सभासद आणि उजव्या बाजूला एक हुजूर पक्षाची ‘ डेम ’ होती. अत्यंत प्रेमाने त्यांनी आम्हांला पार्लमेंट दाखविले. ह्या पार्लमेंटात आम्ही चर्चिलदेखील पाहिला. म्हातारा चार इतर सभासदांसारखा आला आणि गेला ! केवळ अफाट शब्दसंपत्तीच्या भांडवलावर, पराभवाच्या दरीपर्यंत पोचलेल्या इंग्रज राष्ट्राला मागे खेचून धरण्याचे सामर्थ्य असलेला हा महापुरुष, वार्धक्यामुळे थरथरत त्या सभागृहात आला, तासभर चर्चा ऐकत बसला आणि एकदाही तोंड न उघडता परत गेला. ते दृश्य मला उगीचच करुण वाटले. साऱ्या पार्लमेंटात त्या दिवशी प्रेक्षणीय स्थळ ते होते. प्रेक्षकांच्या गॅलरीत त्या दिवशी आमच्यासारखे खूप परदेशी पाहुणे होते. प्रत्येकाचे डोळे चर्चिलकडे लागले होते. पार्लमेंट पाहण्याचे सार्थक तिथे झाले होते. माझ्यासारख्यापुरते ते पार्लमेंट चर्चिलमुळे सजीव झाले होते. चर्चिलसाहेब बोलले असते तर अधिक सजीव झाले असते.

स्थळांच्या बाबतीतला माझा हा अनुभव विचित्र आहे. मागे एकदा मांडूगडावर गेलो होतो. आपल्या देशातल्या रम्य स्थळांपैकी हे स्थळ. पण

बाजबहाद्दर रूपमतीच्या कथेची प्राणप्रतिष्ठा त्या स्थळी नसती, तर ते केवळ प्रेक्षणीय स्थळ झाले असते. त्या ठिकाणी जाऊन आपण कल्पनेने बाजबहाद्दराशी बोलू शकलो किंवा रूपमतीचे संगीत ऐकू शकलो, तरच ते पाहणे पूर्ण होते. असा माणसाचा जिव्हाळा गुंतलेला असावा लागतो. ह्याच गडावर भेटलेले शर्माजी माझ्या डोळ्यांसमोर अजून उभे आहेत. अशा मधुर वाणीने बोलणारा माणूस क्वचित भेटतो. शर्माजींनी बोलण्यातून उभा केलेला मांडूगड तर प्रत्यक्षाहून अधिक सुंदर वाटत होता. कार्लाइलच्या घरात भेटलेली म्हातारी आणि मांडूला भेटलेले हे म्हातारबुवा मी विसरू शकत नाही. मात्र परदेशात माझी ही माणसांची भूक म्हणावी तशी भागली नाही. बर्मिंगहॅमला मला एक लँडलेडी भेटली. खूप बोलकी आणि रंगून बोलणारी. त्या रात्री मात्र गप्पांचा अड्डा रंगला होता. अगदी आपल्या घरी असल्यासारखे वाटले. ती म्हातारी, एक इंग्लंडात राहिलेला स्पॅनिश गृहस्थ, एक औषधांच्या कंपनीत काम करणारी बाई, मी आणि त्या लँडलेडीची मुलगी! रात्री दोन वाजेपर्यंत आम्ही अनेक विषय संपवले. शेवटी संगीतावर चर्चा सुरू झाली. लँडलेडीची मुलगी 'रॉक अँड रोल'ची तरफदारी करीत होती. तिला मी शाळकरी पोरगी समजून शिष्टासारखे 'तू मोठी झालीस म्हणजे मी काय म्हणतो ते कळेल!' असे सांगितले.

दुसऱ्या दिवशी सकाळी आमची लँडलेडी माझ्या टेबलावर ब्रेकफास्ट ठेवता ठेवता म्हणाली,

"माझी मुलगी तुझ्यावर रागावली आहे."

"कां?"

"तू तिला शाळकरी पोरगी समजलास म्हणून! तिचं वय काय आहे असं वाटतं तुला?"

"असेल पंधरा सोळा!"

"हळू बोल! तिचा गेल्याच महिन्यात अठ्ठाविसावा वाढदिवस झाला!" माझ्या गळ्यात बेकन अडकले.

"अठ्ठावीस?" मी पाणी पीत पीत विचारले.

"हो. ती करतेय तितका मूर्खपणा पुष्कळ आहे. ती लहान दिसते हे खरं – पण ती इतकी लहान दिसते, याची तिला खात्री पटली तर आणखीनच चेकाळेल. तिच्या बरोबरीच्या पोरींची केव्हाच लग्नं होऊन त्यांना मुलंदेखील झाली..."

एवढ्याशा दिसणाऱ्या मुलीने नोकरीच्या निमित्ताने अर्धा युरोप पालथा घातला होता. तिला फ्रेंच, जर्मन वगैरे भाषा येत होत्या आणि नोकरी सोडून ती सहा महिने इटालियन शिकण्यासाठी घरी परत आली होती. आईला तिच्या लग्नाची काळजी होती. मला पाहायची होती ती असली माणसे! इथे 'स्थळे' हा शब्द मी कटाक्षाने टाळला आहे, हे सुज्ञ वाचकांच्या ध्यानात यावे!

नदीचा भंगला काठ करुण खरा! त्या कारुण्यात सौंदर्य असते हेही खरे. पण त्या नदीतून जर एखादा नावाडी होडी वल्हवीत पैलतीराहून ऐलतीरी येत नसला तर काही तरी अपुरे अपुरे वाटते. माणसाइतके खरोखरच पाहण्यासारखे फार थोडे आहे! काय तऱ्हेतऱ्हेचे वागणे — तऱ्हेतऱ्हेचे बोलणे! आणि या साऱ्या विविधतेच्या आत दडलेली एखादी ओळखीची अंतरीची खूण! जी ह्या विविधतेलादेखील सांधून जाते. देशी काय, विलायती काय— चिमण्या एकाच स्वरात चिवचिवायच्या! बाकी लंडनमध्ये कावळा अगदी आपल्या कावळ्यासारखा ओरडताना ऐकून उगीचच हसू आले. इंग्लिश कावळ्याने 'काव काव' म्हणण्याऐवजी 'क्रो क्रो' म्हणावे अशी माझी अपेक्षा होती. पण इंग्लिश आई



पोरीच्या लग्नाची काळजी करताना पाहिली तेव्हा अंतर मिटले. ओठांवर आडवी लिपस्टिक लावली काय किंवा कपाळी कुंकवाची आडवी चिरी लावली काय, 'पोरगी वाढली' ह्या चिंतेने व्याकूळ झाली नाही तर ती आई कसली? मला असल्या आया, सुपात मीठ अधिक पडले की कावणारे बाप, 'कार्ट्यांनो, जरा गप्प बसा' म्हणून ओरडणारा मास्तर, 'सगळा साला वशिल्याचा कारभार!' म्हणून कुरकुरणारे कारकून, वगैरे माणसांच्या इंग्रजी बांधणीच्या आवृत्त्या पाहायच्या होत्या. तो योग फार कमी आला याची मला हुरहूर वाटते. रसेल नावाच्या बी. बी. सी.–मधल्या नाट्यविभागातल्या एका निर्मात्याकडे जेवायला गेलो होतो. तेव्हा पूर्वीच्या मेड सर्व्हंट्स गेल्या म्हणून हळहळणारी त्याची बायको भेटली आणि समाधान झाले. तिचे म्हणणे, नवरा कचेरीत गेला आणि मुलगी शाळेत गेली की घर गप्प होते. पूर्वी घरची कामे करणारी 'जेनी' असे. आपल्याखेरीज दुसरे कोणी तरी जिवंत माणूस घरात आहे, ही जाणीव सुखद असे. आता काय कपडे धुण्याच्या यंत्राशी बोलू? मग सोबतीला रेडिओ आला. पण तो आपल्याला कुठे बोलू देतो? तरीही तो दिवसभर चालू ठेवावा लागतो. नाहीतर घर खायला उठते.

इंग्रजी घरातली किंवा रस्त्यातली ही शांतता खरोखरच भयाण वाटते. एक तर रस्त्यात, थंडीमुळे की काय कोण जाणे, कोणी तोंड उघडीत नाही. किलबर्नच्या बाजारात एकदा भाजीवाल्यांची 'कोबी फुलवर भेंडी घ्या – सस्ती लावलीऽऽऽ!' छाप आरोळी ऐकून खरोखरच समाधान वाटले. एरवी भाजीवाल्यांच्या दुकानातदेखील काचेच्या कपाटात किमतीची लेबले लावून गुपचूप पडलेल्या भाज्या पाहिल्या की ह्यांचे कसे होणार, ही चिंता वाटायची. 'जाडा मीऽऽऽठ', 'कांदी बटाटीऽऽय', 'लायची कलिह्योऽऽऽ' वगैरे आरोळ्या एकदम बंद! मोटारींचे हॉर्न नाहीत, ब्यांड बडवीत जाणाऱ्या सिनेमाच्या जाहिराती नाहीत. रात्री दुरून येणारे भजनाचे स्वर नाहीत – सारे कसे शांत शांत!

लहानपणी शाळेत एकदा दिपोटींनी प्रश्न विचारला होता, 'शहाजहानाच्या कारकीर्दीत एवढ्या सुधारणा कशा झाल्या?' आमच्या वर्गातल्या

गोविंदाने उत्तर दिले होते, '...कारण शहाजहानच्या कारकीर्दीत भयंकर शांतता माजली होती.' विलायतेत अशी भयंकर शांतता माजलेली असते. ह्याला अपवाद म्हणजे 'पब्स'! 'पब्स'ना दारूचा गुत्ता म्हणणे हा पब्सचा अपमान आहे. इथे इंग्रज नुसता दारू प्यायला येत नाही, बडबडायला येतो. बाकी इंग्रज आणि फ्रेंच माणसांत हा मोठा फरक. एरवीचा अबोल इंग्रज, साधी बियर घेतली की त्याला कंठ फुटतो आणि फ्रेंच माणूस मद्यखान्यात गेला की आधी शराब न्याहाळत तास न् तास समाधी लावून बसतो. पण दारूच्या धुंदीतदेखील इंग्रजाला घड्याळाचे विस्मरण नाही. रात्री अकरा वाजता पब बंद होतो. पावणेअकराला घंटा



वाजते आणि 'साकी'ची 'चला, शेवटली पंधरा मिनिटं उरली' ही साद ऐकू येते. काऊंटरकडे गर्दी उसळते. 'पीना पिलाना' शेवटली उसळी घेते. एखादा वेल्श मंडळींचा गट गाणे सुरू करतो.

हे वेल्श लोक एकजात आवाजदार! चौघे जमले की लगेच 'क्वार्टेट' बनते. एकदा रात्री एका नाटकाहून येताना ट्यूबच्या फलाटावर दहाबारा वेल्श मंडळींचे टोळके आले. रात्री अकराचा सुमार होता. नाटकसिनेमांचे शौकीन थिएटरातून स्टेशनात आले होते. पिकॅडली स्टेशनाचे फलाट बरेच गजबजले होते. ह्या टोळक्याने समूहगान सुरू केले आणि समोरासमोरचे भरलेले फलाट गाऊ लागले. ह्या लोकांना इतकी गाणी पाठ कशी येतात कोण जाणे! आमच्यासारखे काही मोरू सोडून फलाटावरचे यच्चयावत साहेब आणि मडमा गाऊ लागल्या. अशा वेळी ह्या इंग्रजांचे मोठे कौतुक वाटते. चांगले गंभीर दिसणारे साहेबदेखील ओठांचे चंबू

करून गायला लागतात. ह्या भयंकर इंग्रजी शांततेचा क्वचित् कधी भंग झालाच तर अशा उत्स्फूर्त संघगानाने होतो. आमची अंधेरी-पार्ल्याची मंडळी लोकलगाडी वाटेत अडकली की कधी कधी ' ग्यानबा तुकाराम ' सुरू करतात ! पण मुंबईच्या कॉस्मॉपॉलिटन वातावरणात सगळ्यांना मुक्त-कंठाने ओरडता येण्यासारखे एकच गाणे – ' रघुपति राघव राजाराम ! '

पंढरीची यात्रा मंगळवेढ्याला गेल्याशिवाय पुरी होत नाही. मंगेशीला जाणाऱ्याला म्हाडदोळच्या शांतादुर्गेचे दर्शन न घेऊन चालत नाही. गयेला गेले की प्रयाग आलेच. लंडनच्या यात्रेकरूलादेखील ऑक्सफर्ड आणि केंब्रिज केल्याशिवाय गती नाही. ऑक्सफर्ड आणि केंब्रिज हे इंग्रजांचे दोन ज्ञानचक्षू! ह्या दोन डोळ्यांनी इंग्रज जगाकडे पाहतो. असंख्य इंग्रज शास्त्रज्ञ, तत्त्वज्ञ, राजकारणी, समाजसुधारक ह्या दोन विद्यापीठांतून तयार झाले. शतकानुशतकांची ही परंपरा आहे आणि ती टिकविण्याची कमाल पराकाष्ठा आहे. एवढ्याशा ह्या बेटावर इतर पुष्कळ विद्यापीठे आहेत. प्रत्येक पीठाचे महान आचार्य आणि शिष्य आपापल्या 'थोरल्या आईची' कूस धन्य करून गेले. पण ऑक्सफर्ड आणि केंब्रिज यांची शान निराळीच आहे. इथे परंपरेची जोपासना भलत्या कटाक्षाने होते. काळा झगा न घालता हिंडणाऱ्या विद्यार्थ्याला शासन होते. इथल्या दगडादगडाला इतिहास आहे. मेकॉले कुठल्या हिरवळीवरून चालला आणि बेकन कुठल्या थाळीत जेवला, याची नोंद आहे. आधुनिकांतील आधुनिक विद्या जुन्यांतली जुनी पगडी घालून शिकविण्याचा विरोधाभास आहे. पण ह्या वातावरणात शिरले की वयाचा हिशेब विसरायला होते. चारी बाजूला मुक्त यौवन फुलले आहे, आणि जाणते वार्धक्य शांतपणे आपल्या ज्ञानाच्या आणि अनुभवाच्या आसनावर अधिष्ठित होऊन त्याला आकार देण्याचा प्रयत्न करते आहे. असले वातावरण पाहिले की डोळ्यांचे पारणे फिटते.

मी ऑक्सफर्ड स्टेशनवर उतरलो. त्या वेळी संध्याकाळ झाली होती. रविवारची संध्याकाळ. मी बर्मिंगहॅमचा मुक्काम आटोपून ऑक्सफर्डला

आलो. पहिल्या प्रथम प्लॅटफॉर्म माणसांनी फुललेला पाहिला. शेकडो तरुण आणि तरुणी फलाटावर जमली होती. मी उतरून गाडीकडे पाहिले. क्षणार्धात स्टेशनातल्या तरुणी गाडीत चढल्या होत्या; आणि शेकडो आलिंगने, हस्तांदोलने झाली. आपल्याकडे अलिबाग रेवदंड्याकडे शनिवारी मुंबईहून ' हजबंड स्टीमर ' जात असे ! युद्धातल्या पळापळीच्या काळात मुंबईतल्या अनेकांनी आपली कुटुंबे कोकणात ठेवली होती. शनिवारी दुपारची बोट गाठून अलिबाग, रेवस, धरमतर वगैरे जवळच्या गावी नवरे लोक जायचे. शनिवार रात्र आणि रविवार आपल्या कुटुंबात काढून सोमवारी पहाटेच्या बोटीने मुंबईला परतायचे. तशातला हा प्रकार होता. लंडनला राहणाऱ्या प्रेमिका ऑक्सफर्डला राहणाऱ्या प्रियकरांना भेटायला आठवड्याच्या अखेरीला आल्या होत्या; आणि हे विरही यक्ष आगगाडीच्या एंजिनाच्या साथीत शेवटचे सुस्कारे सोडीत होते. गाडी हालली, शेकडो हातरुमाल हालले, चुंबनांची फेकाफेक झाली; आणि ' हाय मोहब्बत !



हाय जवानी ! ' म्हणत शेकडो प्रियकर आणि प्रेयसी पांगल्या !! पुढल्या शनिवारपर्यंतची ताटातूट. ऑक्सफर्डमधले हे माझे स्वागत मला फार आवडले. आपल्याकडे एखादा कुणी प्रेमात पडल्याची कुणकूण ऐकली की, सारे गाव कुजबुजू लागते. इथे सारे ऑक्सफर्डच प्रेमात पडलेले. तिथे कुणी काय कुजबुजावे ? प्रेमाचे हे इतके धाऊक दर्शन यापूर्वी मला

कधीही झाले नव्हते. बाकी पाश्चात्त्य देशांतले हे ' अहो येता जाता, उठत बसता कार्य करता ' दिसणारे व ' समस्तांची लज्जा त्यजुनि ' चालणारे प्रेमाराधन पाहून सुरुवातीला डोके गरगरायला लागते हे खरे ! युद्धापूर्वी ' असे हे नव्हते ' असे सांगणारे इंग्रजी अण्णासाहेब मला भेटले होते. पण युद्धानंतर मात्र ह्या पाश्चात्त्य तरुणीला तरुण दिसला की ' मला मदन भासे ' आणि तरुणाला तरुणी दिसली की ' चंद्रिका ही जणू '. नुसत्या तरुणांचे किंवा नुसत्या तरुणींचे टोळके भेटायचेच नाही. सदैव संमिश्र घोळका. नाही म्हणायला ' टेडी बॉइज ' मात्र अगदी पुरुष पुरुष हिंडतात आणि ' टेडी गर्ल्स ' बायका बायका ! दुसऱ्या महायुद्धाने पाश्चात्त्य जगाला बहाल केलेली ही अभागी देणगी ! युद्धात जन्माला आलेली ही बेवारशी पोरे टोळक्याटोळक्याने हिंडतात आणि सदैव मारामाऱ्यांत गुंतलेली असतात. मात्र ह्या मारामाऱ्या बहुधा त्यांच्यात्यांच्यात चाललेल्या असतात. कोणताही आगापीछा नसलेली ही तरुण मुले कुठे राहतात आणि कशी जगतात, ह्याचे मला नेहमी कोडे पडे ! साऱ्या शिष्ट समाजाच्या बंधनाला झुगारून, — नव्हे, त्याच्या अस्तित्वाची अजिबात दखल न घेता सुंदर बागांतून निवडुंगांची बेटे माजावी तशी घोळक्याघोळक्यांनी माजलेली ही तरुण टोळकी पाहिली की साऱ्या विद्यापीठांच्या शहाणपणाने टेकलेले हात मला दिसत.

खुद्द ऑक्सफर्डमध्ये मी टेडी बॉइज पाहिलेले मला आठवते. युद्धकाळातल्या पापांची ही जिवंत भुतावळ अधूनमधून पाश्चात्त्य समाजाच्या मानगुटीवर बसते. ह्या युद्धाच्या बॉंबहल्ल्यातून ही विद्यापीठे मात्र बचावली. इंग्लंडमध्ये बॉंबगोळ्यांचा वर्षाव होत असताना इथल्या ज्ञानसाधनेला खंड पडला नव्हता. मधून मधून धारातीर्थावर देह ठेवलेल्या ऑक्सफर्ड-केंब्रिजच्या विद्यार्थ्यांच्या याद्या वाचल्या जात. क्षणभर स्तब्धता होई. डोळ्यांतली आसवे डोळ्यांबाहेर न येऊ देण्याचे कसोशीने प्रयत्न होत आणि रणचंडीच्या क्षणैक स्मरणातून लक्ष काढून ते पुन्हा सरस्वतीच्या उपासनेशी गुंतवण्यात येत असे ! सभोवताली युद्धाची खाई पेटली होती. खायला अन्न नव्हते. आठवड्याला एखादे अंडे मिळे. साखर

चिमटीच्या हिशेबात मिळे. पण इथल्या तपश्चर्येत खंड पडला नव्हता. विद्वान प्राध्यापक तसेच झगे घालून, व्याख्यानांची बिनचूक तयारी करून वर्गात आले. विद्यार्थी त्याच तन्मयतेने शिकले. मिसरूड फुटले की गणवेश चढवावा लागे. ह्या युद्धाने जणू पाच हंगामांत उगवलेले तारुण्य कापून काढले. पण ऑक्सफर्ड-केंब्रिजच्या साधनेत त्या ऋषितुल्य प्राध्यापकांनी व्यत्यय येऊ दिला नाही. कॉलेजाकॉलेजांतून दिसणाऱ्या ह्या तरुण हुतात्म्यांची नावे वाचताना अंतःकरण भरून येते. किती तरुण जिवांची त्या काळात ताटातूट झाली असेल, ते ती कालमहेश्वराच्या सेवेला मस्तकमाला गुंफणारी रणदेवताच जाणे! ऑक्सफर्डच्या रेल्वे प्लॅटफॉर्मवर फुललेले ते



यौवन पाहताना वाटले, या देशाने अपार यातना भोगल्या; ह्यांना या मुक्त आनंदाचा अधिकार आहे. ह्यांच्या आधीची पिढी तळहातावर शिर घेऊन लढली. ह्या तरुणांपैकी बहुतेकांचे बाप–भाऊ–काका–मामा ऑक्सफर्डच्या कॉलेजातल्या वर्गांतून शिकता शिकता उठून रणांगणावर गेले ते परत आलेच नाहीत. कुठल्याही इंग्रजाच्या घरी गेले की मँटलपीसवर लष्करी वेषातल्या दिवंगत तरुणाचा फोटो आढळल्याशिवाय राहत नाही.

युद्ध संपले. रोडावलेले ऑक्सफर्ड आणि केंब्रिज पुन्हा गजबजले. गणवेश टाकून कित्येकांनी पुन्हा काळे झगे चढवले आणि बंदुकीतला डोळा काढून पुस्तकात नाही तर मायक्रोस्कोपमध्ये घातला. त्यांच्या वृद्ध

प्राध्यापकांनी त्यांचे दोन्ही हातांनी स्वागत केले.

ऑक्सफर्ड आणि केंब्रिज यांची चुरस ही मात्र नौकास्पर्धांपुरतीच मर्यादित नाही. दोन्ही युनिव्हर्सिट्या एकमेकींना अनेक अर्थांनी पाण्यात पाहतात. एकीला टेम्सचा अभिमान तर दुसरीला चिमुकल्या कॅम नदीचा. ऑक्सफर्डची टेम्स आणि लंडनची टेम्स यांत जमीनअस्मानाचा फरक आहे. पण वार्षिक नौकास्पर्धेत ऑक्सफर्ड जिंको नाही तर केंब्रिज जिंको, कॅम नदीचे लावण्य अवर्णनीय आहे. आहे एवढीशी, पण अती गोड! दोन्ही काठांना झाडे लवलेली आणि काठ ओढ्याच्या काठांइतके दूर. पण साऱ्या केंब्रिजभोवती मोठी लाजत मुरकत जाते. मी ' वीपिंग विलोज ' प्रथम केंब्रिजला पाहिल्या. लांब लोंबत्या फांद्यांची ही झाडे खरोखरच शोकमग्न वाटतात. केंब्रिजला आपल्या गणिताच्या अध्यापनाइतकाच हिरवळींचा तोरा आहे. ठिकठिकाणी हे हिरवे हिरवे गार गालिचे पसरले आहेत. ' किंग्ज बँक ' वगैरे लॉन्सवरून चालायचा अधिकार फक्त फेलोजना आहे; आणि म्हणूनच इथला विद्यार्थी ' फेलो ' झाल्याबरोबर आधी ते लॉन तुडवून येतो म्हणतात.

ऑक्सफर्डला माझे मित्र डॉ. बारलिंगे होते. त्यांनी ख्यातनाम ब्रिटिश तत्त्वज्ञ प्रो. राईल यांच्या घरी आम्हांला नेले! माझा वास्तविक तत्त्वज्ञानाशी अजिबात संबंध नाही. इंटरनंतर आमचा आणि लॉजिकचा काडीमोड झालेला. सुसंगतापेक्षा मला सुसंगतीचा लोभ अधिक. त्यामुळे त्या दार्शनिकाचे दर्शन हाच एक हेतू होता. विद्याभ्यासजड विद्वानांचा भारतात बराच परिचय झाला होता. त्याची ही इंग्रजी आवृत्ती पाहावी, एवढाच माफक हेतू मनाशी ठेवून राईल गुरुजींच्या मठीत प्रवेश केला. चारी भिंती पुस्तकांनी भरलेल्या — नजर टाकावी तिथे ग्रंथ — अशा वातावरणात राईलचे प्रथम दर्शन झाले आणि पाचच मिनिटांत ह्या माणसाने अगदी मोहून टाकले. पहिल्याच भेटीत त्यांनी आम्हाला चाळीसपन्नास वर्षांपूर्वी केंब्रिजचा पाडाव करून जिंकलेले आपले वल्हे दाखवले. ह्या इंग्रज पंडितांना त्यांच्या देवाने विनोदबुद्धी द्यावी आणि आमच्या पंडितांच्या पदरी ब्रह्मदेवाने कोयनेल आणि बराचसा ब्रह्मघोटाळा का टाकावा — मला

कळत नाही. तासाभरात या म्हाताऱ्याने आम्हांला तऱ्हेतऱ्हेच्या गोष्टी सांगून गप्पा रंगवल्या; आणि जाता जाता तो म्हणाला, "ऑक्सफर्डचा प्राध्यापक शिकवतो म्हणजे काय करतो ठाऊक आहे का? आपल्या पाईपचा धूर पोरांच्या अंगावर सोडतो. ह्यापलीकडे बाहेरच्या जगात नेण्यासारखे तो त्यांना काही देत नाही."

राईल गुरुजींच्या घरी जाताना एखाद्या आश्रमात गेल्यासारखे वाटत होते. निसर्गाने हेमंतशोभा धारण केली होती. सोनेरी पानांनी लदलेल्या वृक्षांतून चिमुकले लाकडी पूल ओलांडीत मॉड्लिन बॉक्समधून त्यांच्या घराची वाट काटीपर्यंत आम्ही मुग्ध झालो होतो. त्या आश्रमाभोवती आश्रमहरिणीदेखील होत्या आणि टुमदार बंगलीत राईलसाहेब पाईपची धुनी पेटवून ग्रंथांच्या ढिगाऱ्याआड एका विद्यार्थ्याला तत्त्वज्ञानाचे गुह्यतम शास्त्र शिकवत बसले होते. अजून वृद्ध राईलची ती प्रसन्न मूर्ती डोळ्यां-पुढे उभी आहे. अशाच एका वृद्ध प्राध्यापकांचा युद्धकाळात निरोप घ्यायला रणांगणावर जायला सिद्ध झालेले त्यांचे विद्यार्थी गेले होते. त्यातल्या एका विद्यार्थ्याने थट्टेने म्हटले, "सर, तुम्ही नाही का युद्धावर जाणार?" वृद्ध प्राध्यापक म्हणाले, "कशासाठी युद्धावर निघाला आहात तुम्ही?" विद्यार्थी म्हणाले, "मानवी संस्कृतीच्या संरक्षणासाठी." प्राध्यापकांनी त्यांच्या पाठीवरून आशीर्वादाचा हात फिरवीत सांगितले, "बाळांनो, ती मानवी संस्कृती तुमच्यापुढे उभी आहे. आय ॲम दि सिव्हिलिजेशन." अनेक वर्षांपूर्वी ऐकलेली ही गोष्ट मला राईलना पाहताना आठवली.

ऑक्सफर्ड दिसायला सुंदर नाही. इमारतींनी शतके गाठली आहेत. बाहेरून नव्हे, आतूनदेखील तितक्याच जुनाट. ते सातव्या आणि आठव्या हेन्रीच्या काळातले फर्निचर — नव्हे, सैपाकाची भांडीदेखील थॉमस वूल्झेच्या काळातली, आजही त्यातच सैपाक व्हायचा. इथली कॉलेजे म्हणजे जुनी चर्चेस! मला चर्चमधल्या ऑर्गनचे विलक्षण आकर्षण! स्वरांची गहिराई अथांग! खर्ज आला की पाताळातून आल्या-सारखा यायचा. आम्ही गेलो त्या वेळी एका चर्चमधला ऑर्गन वाजत होता. माझी बोटे खाजायला लागली. मनाचा धडा करून मी आमच्या-

बरोबर ब्रिटिश कौन्सिलने दिलेल्या स्मिथसाहेबांना मनातली इच्छा सांगितली. स्मिथ म्हणाले, "ते पाहा डॉ. वाटसन येताहेत. ते इथल्या संगीत विभागाचे प्रमुख आहेत. त्यांना विचारा. पण गृहस्थ खाष्ट आहे — जरा बेतानं." मी आठवतील त्या चारपाच देवतांचे स्मरण करून वॉटसन-बुवांना पकडले आणि मला थोडा वेळ तो ऑर्गन वाजवू द्याल का म्हणून विचारले आणि प्रभुकृपा जाहली — "जरूर! तू काय संगीतज्ञ वगैरे आहेस का?"

"छे छे, मला उगीच थोडंसं भारतीय संगीत येतं……" म्हणत मी पहिल्या मजल्यावर, शनवारवाड्यातल्या अर्ध्याखणी नगारखान्याएवढ्या त्या खोलीत ठेवलेल्या ऑर्गनपर्यंत पोचलो. सुरुवातीला डॉ. वॉटसनने ऑर्गन वाजवला; आणि मला खुर्ची मोकळी करून दिली. त्यानंतरच्या पंधरा मिनिटांत खाली देवाच्या दर्शनाला आलेल्या भक्तांचे लक्ष खिस्तावरून उडाले. हे काय प्रलयसंगीत सुरू झाले त्यांना कळले नसावे. पण चारचार सप्तकांचे पाच निरनिराळे एकावर एक मजले असलेल्या त्या ऑर्गनच्या स्वरांनी मला वेड लागायची पाळी आली. पायांखाली डझनभर पेडल्स होती आणि स्वरांच्या इतक्या विविध जाती निर्माण होऊ शकत होत्या, की मला अलिबाबाच्या गुहेत शिरल्यासारखे वाटले. मी त्या संध्याकाळी पंधराएक मिनिटे पूरिया-धनाश्री वाजवला. मला त्या चारी स्तरांवरच्या पट्ट्यांचा उपयोग जमत नव्हता. पण असा सुंदर 'टच' असलेला ऑर्गन मी यापूर्वी कधीही पाहिला नव्हता. खर्जाचे स्वर तर ते उभे चर्च आतून पाण्याने तुडुंब भरावे तसे भरून काढीत होते. आपल्याकडे जशी सनई ऐकायची म्हणजे देवळापुढल्या नगारखान्यात, त्याप्रमाणे ऑर्गन ऐकावा तर चर्चमध्ये. विशेषत: चर्चचा कॉयर गाऊ लागला आणि ऑर्गन त्यांची साथ करू लागला की, नास्तिकाचेदेखील डोळे आणि हृदय भरून यावे! आपल्या नाट्यसंगीतातदेखील ऑर्गनने आणि सारंगीने केवढा रंग आणला होता! विशेषत: ज्यांनी केशवराव कांबळ्यांसारखा ऑर्गनवाला आणि कादरबक्षासारखा सारंगिया ऐकला आहे त्यांना आठवेल की, नारायणराव बालगंधर्वांचे स्वरच काय पण त्यांची

व्यंजनेदेखील ह्या दोन वाद्यांच्या संगतीतून ऐकू यायची ! मी ऑक्सफर्ड-मधल्या मुक्कामात त्या ऑर्गनचे स्वर डोक्यात घेऊनच वावरलो !



मला ह्या इंग्रजांच्या स्वभावाचा काही पत्ताच लागत नाही. अत्याधुनिकांतला अत्याधुनिक आणि जुन्यांतला जुना असा हा चमत्कारिक सांधा आहे. चर्च, पब, पब्लिक स्कूल, थिएटर आणि क्रिकेटचे मैदान अशा परस्परांपासून भिन्न आधारांवर हा समाज उभा आहे. उत्तम व्यापारी म्हणून ह्याची जगभर ख्याती, पण पाच वाजता त्याला दुकान बंद करण्याची कोण घाई ! हजार पौंडांचा माल खरेदी करायला गेलात, तरी पाच वाजले रे वाजले की, 'उद्या याल का ?' असा लाडिक प्रश्न करून दुकानातल्या त्या पोरी गिऱ्हाइकाला वाटेला लावणार. म्हणजे 'गिऱ्हाइकाचा संतोष हेच आमचे ध्येय' वगैरे प्रकरण नाही.

पार्टीच्या वेळी पुरुषांनी टाय न लावता गळे उघडे टाकले की अशिष्ट आणि मडमा मात्र शक्य तितक्या उघड्या पडलेल्या ! एरवी आरोग्यशास्त्राचे सगळे नियम कोळून प्यालेला इंग्रज उठल्याबरोबर चूळदेखील न भरता चहा पितो. हा त्याच्या आचारविचारांतला विरोध किती तरी ठिकाणी आढळतो. श्रीमंतांच्या शाळांना 'पब्लिक स्कूल' म्हणतात. आपले 'पब्लिक' म्हणजे सगळ्या गण्यागंप्यांचे मिळून बनलेले असते !

पार्लमेंटातला स्पीकर महिनो न् महिनं गप्प ! फार कशाला, इंग्रजांच्या आवडत्या क्रिकेटमध्ये ज्याला विकेटकीपर म्हणतात त्या यष्टिरक्षकाचे मुख्य काम त्या त्रिफळ्याचे रक्षण करण्याऐवजी खेळाडूला गाफील क्षणी पकडून त्या तिन्ही दांड्या उद्ध्वस्त करण्याचे असते ! ही काय इंग्रजांची विनोदबुद्धी म्हणावी की काय कळत नाही ! घुम्या म्हणावे तर कॉकटेल पार्ट्यांच्या वेळी दोन तास उभ्या उभ्या मनसोक्त गप्पा मारणार — बसला की गप्प ! इंग्रजाला बोलके करायचे असले तर त्याला आधी उभा करावा लागतो. त्याला बसून बोलता येत नसावे. ह्या पार्ट्यांच्या वेळी तर आपली पंचाईत होते. दोन दोन, तीन तीन तास माणसे आपली



उभी ! चांगले कोच असतात, खुर्च्या असतात, पण कुणीही बसत नाही. मला ह्या जेवणाच्या पद्धतीतले हे उभ्या उभ्या जेवण अजूनही जमत नाही. बूफे ह्या नावाखाली हा जो अन्नब्रह्माचा अनादर चालतो तो असह्य आहे. एका हातात डिश धरायची आणि हिंडत हिंडत जेवायचे हे प्रकरण अवघड आहे. विशेषतः भारतीय पद्धतीच्या जेवणाला तर ते अगदीच चुकीचे आहे. उभ्या उभ्या फार तर पापड खाता येईल. पण एका हातात डिश धरून वरणभात कालवायचा कसा ? आणि ज्या जेवणात भुरका नाही ते काय जेवण आहे ? जेवणावर आडवा हात मारायचा असतो, उभा नव्हे. पण जागेच्या टंचाईमुळे आपल्याकडेही आता ही उभी पंगत आली. पूर्वी दिवाणखान्याचे किंवा माजघराचे क्षेत्रफळ तिथे किती पाने बसतील यावर मोजत. ‘ शंभर पान जेवून उठेल ’ ही भाषा होती. दुसऱ्या महायुद्धाने माणसाला जेवून उठण्याऐवजी उठून जेवायला लावले. ‘ हर हर महादेव ’ ह्या भोजनप्रसंगीच्या घोषणेतला बैठा महादेवच गेला आणि नुसतेच हर हर म्हणायची पाळी आली.

पण अशी अनेक युद्धे-महायुद्धे आली गेली, तरी ऑक्सफर्ड आणि केंब्रिज मात्र महापुरातल्या लव्हाळ्यांसारखी टिकली आहेत. अजून प्रार्थना-मंदिरात शेकडो तरुणतरुणी खिस्तचरणी लीन होतात आणि पाद्रीबाबाचे प्रवचन ऐकतात. आम्हीदेखील केंब्रिजमधील एका चर्चमधल्या सर्व्हिसला गेलो होतो. बाकी हा 'सर्व्हिस' शब्द मजेदार वाटला. देवाच्या दारी सर्व्हिसला जायची कल्पना आपल्याकडे आहे. नरसोबाच्या वाडीला दत्ताच्या देवळात पूजेला नाही जात, सेवेला जातात. केंब्रिजमधल्या चर्च-मध्ये इतरांप्रमाणे आमच्याही हातांत बायबल्स आणि भजनाची पुस्तके दिली गेली. हजार, दीड हजार विद्यार्थी-विद्यार्थिनींनी भरलेले ते चर्च अत्यंत सुरेल आवाजात खिस्ताला आळवीत होते. आपल्याकडे प्रार्थना-समाजात अशी प्रार्थना होत असे. पण हे शिस्तबद्ध भजनाचे रोप आपल्या देशात वाढीला लागले नाही. आमचे भजन म्हणजे आकाश भेदून देवाच्या कानी पोचते. 'ब्रह्मानंदी लागली टाळी तेथे कोण देहाते सांभाळी ?' हा आमच्या भजनाचा थाट ! साहेब काळ्या कोटाची इस्त्री बिघडू न देता प्रार्थना करतो ! शेकडो मेणबत्त्यांनी सजवलेल्या त्या प्रार्थनामंदिरातले गांभीर्य परिणामकारक तर खरेच, पण आमच्या 'टाळी वाजवावी, गुढी उभारावी, वाट हे चालावी पंढरीची'— मधल्या मुक्त 'इलविठलवी'ची गंमत काही निराळी ! माझे हिंदू मन आपले ग्यानबा-तुकारामाच्या घोषाने गहिवरते ! चर्चमधल्या त्या गंभीर भजनाने आपण चकित होतो. ती शिस्तबद्ध आळवणी डोक्याला पटते, पण अंतःकरणात घुमत नाही. हा केवळ संस्कारांचा भाग आहे. मला कौतुक वाटले ते त्या प्रार्थनेत रमणाऱ्या इंग्रज तरुणतरुणींचे ! हे एरवी उच्छृंखल वाटणारे यौवन कसे धरण बांधलेल्या धबधब्यासारखे गंभीर, अथांग रूप धारण करून उभे राहिले होते. बुद्धीच्या कक्षेपलीकडल्या असंख्य चमत्कारांपुढे नमले होते. नाझरथच्या खेड्यातल्या एका सुताराचे ते अवतारी पोर — त्याच्या डोळ्यांमधली असीम करुणा आणि त्याचे बलिदान विश्वविद्यालयातल्या त्या ज्ञानमार्गी तरुणांना भक्तिमार्गाच्या वाटेकडे अदृश्य आणि अनाकलनीय दोराने खेचून आणीत होते. दोन दोन हजार वर्षे अनेक आघात-उत्पातां-

तर ह्या श्रद्धा कशा टिकतात कोण जाणे! भीतीपोटी देव म्हणावा तर आजच्या इंग्रज तरुणाला कसली भीती आहे? एका मर्यादित अर्थाने हा समाज निर्भय आहे. भीषण दारिद्र्याचे भय नाही. करकचून आवळणाऱ्या दुष्ट सामाजिक रूढी नाहीत. रोग, दैन्य यांना थारा नाही. तरीही ह्या समाजाला कुठे तरी मस्तक नमवायला स्थान हवे असे वाटत असते आणि काही अपवाद वजा केले तर आजही ख्रिस्ताच्या चरणी तो लीन होतो.

एरवी बुद्धिनिष्ठ असलेल्या इंग्रजाने राजा आणि ख्रिस्त या दोन्ही संस्था केवढ्या उत्साहाने टिकवल्या आहेत! हल्लीच्या राणीवर तर त्याचे विलक्षण प्रेम आहे. पार्लमेंटच्या उद्‌घाटनाचा प्रसंग टेलिव्हिजनवर पाहताना इंग्रजी प्रेक्षकांच्या डोळ्यांत जे कौतुक, आदर, प्रेम यांचे हृदयंगम मिश्रण मला दिसले ते मी कधीही विसरणार नाही. ती त्यांना गोड वाटते, हुषार वाटते. बोहल्यावरच्या नववधूकडे ज्या प्रेमपूर्ण कौतुकाने लेकुरवाळ्या बायका पाहतात, अगदी तसे हे इंग्रज स्त्रीपुरुष आपल्या राणीकडे पाहतात. इंग्लंडची राजाराणी फक्त नावापुरती आहे हे म्हणणे अगदी चूक आहे. एक पैशाचे कुंकू असेल, पण ते ‘ कुंकू ’ असते — त्याच-प्रमाणे इंग्रजांची राजाराणी ही त्या समाजाची सौभाग्यचिन्हे आहेत! सौभाग्याची किंमत पैशात आणि अधिकारात थोडीच करता येणार!

इंग्रजांचे अनेक गुण मला आवडले. त्याचा नियमितपणा, सामाजिक जीवनात दिला बोल खरा करायची त्याची कसोशी, त्याची टापटीप ह्या सगळ्या वाखाणण्याजोग्या गोष्टी आहेत. पण त्याची राजाराणीवरची श्रद्धा पाहून मी थक्क झालो. राणी म्हटले की तो वेडा होतो. त्याचा तर्क, त्याची बुद्धी, त्याची चिकित्सा — सगळे काही तो हरवून बसतो. अशी हरवून बसण्याची एक जागा त्याने जाणूनबुजून आजच्या जगात शिल्लक ठेवली आहे. जगन्नाथाची रथयात्रा पाहणारे वेडे आणि देखणे श्वेताश्व जोडलेला राणीचा रथ पाहण्यासाठी सारे कामधाम सोडून जाणारा इंग्रज हे दोघे सारखेच! एरवीचा यांत्रिक इंग्रज इथे ‘ माणूस ’ म्हणून आवडायला लागतो. राणीने पार्लमेंटच्या अधिवेशनाचे उद्‌घाटन केले त्या वेळी वृद्ध अमात्य, न्यायाधीश आणि सामंत आपले वय, ज्ञान, सगळे विसरून

तिच्यापुढे नतमस्तक होताना पाहून मन भरून आले. असे वेड व्हायच्या काही जागा हव्या हे खरे ! नव्या जगात आणि विशेषत: नव्या साहित्यात ह्या वेडाला स्थान नाही. गुलाबाच्या फुलांनी सजलेल्या फुलदाण्यांच्या जागी आता 'कॅक्टस' आले ! येवोत बिचारे. पण साऱ्या बागा नुसत्या कॅक्टसने न भरोत. कुठे तरी चार गुलाब फुललेले असू देत ! पाहणाऱ्याने त्या गुलाबांखालचे काटेच पाहायचे ठरवले तर नाइलाज आहे !

अत्याधुनिक ज्ञानोपासनेचे मार्ग सुलभ करून देताना ऑक्सफर्डने आणि केंब्रिजने जोपासलेले हे परंपरेचे गुलाब पाहून झालेला आनंद मनात साठवूनच आम्ही केंब्रिजचा निरोप घेतला. तिथल्या लायब्ररीतली कपाटे म्हणे एकाला एक लावली तर अठ्ठावीस मैलांची लांबी भरून निघेल. पण ह्या पुस्तकांचे अध्ययन करणाऱ्यांच्या अंत:करणात कुठे तरी नतमस्तक होण्याची शिकवण नसली तर ही अठ्ठावीस मैलांची वाट वाळवंटातून गेल्यासारखी होईल. केंब्रिजने शतकानुशतके आपल्या हिरवळी टिकविण्याची, चर्चमधल्या घंटा वाजत ठेवण्याची आणि 'गॉड, सेव्ह द किंग'ची पराकाष्ठा चालवली आहे ती उगीच नाही.

ऑक्सफर्डची वादविवादसभा फार प्रसिद्ध आहे. इंग्लंडचे 'पार्लमेंटेरिअन्स' तयार करण्याची ती पाठशाळा आहे. अनेक विषयांवर तिथे वादविवाद होतात. आंतरराष्ट्रीय राजकारणापासून किंवा गहन तत्त्वज्ञानापासून ते 'तरुणींचे सौंदर्य त्यांच्या डोळ्यांत आहे की डोक्यांत ?' इथपर्यंत सर्व विषयांवर हिरिरीने वाग्युद्धे लढली जातात. हॉलच्या बाहेर एक फलक आहे, त्यावर सभासदांनी विषय सुचवायचा असतो. विद्यार्थ्यांनी गमतीगमतीचे विषय सुचविले होते. दुर्दैवाने मला वादविवाद ऐकायला मिळाला नाही. रिकामा हॉल पाहून व मेकॉलेची आवडती खुर्ची पाहून मी समाधान मानून घेतले. मात्र हे वादविवाद तत्त्वबोधासाठी नसतात; हे केवळ शब्दांचे शरसंग्राम असतात. त्या जखमा त्या हॉलमधून बाहेर पडण्यापूर्वीच बऱ्या झालेल्या असतात. लोकशाहीचे बाळकडू इथे पाजले जाते. मला माझ्या विद्यार्थिदशेत चालविलेल्या एका वादविवादसभेची आठवण झाली. मुंबईला आम्ही पंधरावीस मित्रांनी मिळून एक डिबेटिंग सोसायटी

चालविली होती. दर रविवारी प्रार्थनासमाजिष्टांच्या निष्ठेने आम्ही तिथे जमून इंग्रजीत वादविवाद करीत असू. कधी कधी अध्यक्ष आणि पूर्वपक्ष आणि उत्तरपक्ष मांडणारे दोघे, ह्या तिघांनी आपापल्या जागा घेतल्या की समोर फक्त रिकामी बाके असत. तरी कार्यक्रमात खंड पडत नसे. कधी कधी चांगली अकराबारा लोकांची गर्दी असे. दुसऱ्या महायुद्धाने आमची ही डिबेटिंग सोसायटी मोडली आणि भारत काही महान वक्त्यांना मुकला !

सैन्ये पोटावर चालतात, असे नेपोलियन म्हणाला होता. लोकशाही हे तोंडांच्या वाफेवर चालणारे राज्ययंत्र आहे. ब्रिटिश लोकशाही तर इंग्लंडातच काय पण जगभर तोंडपाटिल्कीवर चालली. ह्या टीचभर बेटातल्या लोकांनी जगावर राज्य चालवले. मुख्य भांडवल शब्दांचे ! प्रथम त्यांनी जगभर आपल्या भाषेचे चलन सुरू केले. ह्या वादविवाद-सभांतून चालते ती मुख्यतः भाषेची उपासना ! एरवी विषयांना खास महत्त्व नाही. आपल्या देशात पूर्वीच्या काळी वादविवाद चालायचे ते तत्त्वशोधनासाठी. इथे नुसते वायफळाचे मळे फुलवायचे.

ऑक्सफर्ड आणि केंब्रिज युनिव्हर्सिटींची शान लंडन युनिव्हर्सिटीला नाही. लंडनच्या प्रचंड गर्दीत निराळे उठून दिसावे असे तिला व्यक्तिमत्त्व नाही. लंडनचे 'स्कूल ऑफ ओरिएंटल अँड आफ्रिकन स्टडीज' मात्र पाहण्यासारखे आहे. पुण्याचे व्यंकटेशशास्त्री जोशी तिथे संस्कृत शिकविण्यासाठी होते. त्यांचा आणि माझा परिचय झाला होता. तिथल्या मराठी विभागाच्या प्रमुख मिस् लँबर्ट ह्या पंधरावीस वर्षे पुण्यात राहिलेल्या आहेत. ह्या संस्थेत त्यांनी मला चहाला बोलावले : "उद्या दुपारी चार वाजणियाच्या शुमाराला आपल्या पट्नींना घेऊन आवश्य या हं !"

आम्ही पट्नींना घेऊन चार वाजणियाच्या शुमाराला त्या संस्थेत गेलो. शास्त्रीबुवांनी आम्हाला संस्था दाखविली. तिथल्या लायब्ररीत माझी पुस्तके पाहून डोळ्यांत आसवे दाटायच्या घाईला आली. संध्याकाळी 'स्पिनॅच आणि स्टेक' खाऊन ढेकर देत कुठला तरी डिंबलबीसाहेब भोजनोत्तर माझे पुस्तक वाचीत बसला आहे, हे चित्र डोळ्यांपुढे

आणायचा खूप प्रयत्न केला. लँबर्टबाई आवर्जून मराठी बोलतात. तेवढ्यातल्या तेवढ्यात त्यांनी माझे एकदोन इंग्रजी उच्चारही दुरुस्त केले व माझ्या पत्नीला "तुम्ही पुणेरी पद्धतीचे (ह्या पद्धत शब्दावर बाई दोनतीनदा कोलमडल्या.) 'लुगाडं' का नेहसत नाही?" असे विचारले. लगेच आमच्या 'हि'ने नवऱ्याचे इंग्रजी दुरुस्त केल्याच्या रागात लुगाड्याचा उच्चार 'लुगडं' आहे असे सांगून लहानसा सूड काढून घेतला.

बाकी दुसऱ्यांच्या भाषेचे योग्य उच्चारण हा एक कठीण मामला आहे. ह्यात कुणीही कुणाच्याही तोंडाला लागू नये हे बरे! आपले काही काही उच्चार साहेबाला अजिबात निराळे ऐकू येतात. माझ्या नावातील 'पी' हा परदेशांत सर्वत्र 'बी' असा ऐकू येई. कुठेही नाव लिहून घेण्याचा प्रसंग आला आणि नाव सांगितले की 'बी. एल.' अशी आद्याक्षरे लिहिली जात. पुढले 'देशपांडे' तर सुटे सोडवूनच सांगावे लागत. मग 'डी फॉर डेन्मार्क, ई फॉर इंग्लंड' असे शिशुगीत म्हटल्यासारखे म्हणत म्हणत नाव सांगावे लागे. बाकी आपणही साहेबाच्या भाषेचे काय कमी हाल केले आहेत? इंग्रजी गद्याचे अनेक अवतार आहेत. स्टँडर्ड व्हॅक्यूमचा बोर्ड एका ठिकाणी 'सटैंडरड वेकुअम ओयल कं. नउयोरक' असा लिहिलेला होता. पाटण्याला एका ठिकाणी 'एवसजमीसन रोड' होता. हे कोडे त्याच्याखालची 'एग्झिबिशन रोड' ही इंग्रजी अक्षरे वाचल्यावर उलगडले. पुण्यात बँकेची 'ब्यांक' करायचे काही कारण होते का? दिल्लीत स्पिरिट 'सप्रिट' तरी होऊन येते नाही तर 'इस्पिरिट'! दाक्षिणात्य उच्चारणपद्धतीत बाथ रूमची 'भात रूम' होते, तर वंगभूमीत कुण्या इंग्रजाने वंगबंधूला 'हॅपी न्यू इयर' म्हटल्यावर त्याने लगेच 'शेम टु यू' म्हणून त्याला



बुचकळ्यात टाकल्याची एक 'कोथा' आहे. घरातल्या घरात पाहायचे तर 'तो काय बाबा, आफ्टर ऑल ही इज म्हणजे एक रीच म्यान' ही इंग्रजी-मऱ्हाटीची लगट उभय पक्षी फारशी सुसह्य नसावी.

पण इंग्रजी ही मोठी सहनशील भाषा खरी. तिने अगदी आंतरराष्ट्रीय आघात पचवले. इंग्रजाने इंग्रजी समजावून घेण्याचा प्रयत्न केला असेल तितका स्वतःची भाषा अन्य मुखांतून समजावून घेण्याचा इतर कुणीही केला नसेल. अव्वल इंग्रजीच्या काळात साहेबाकडे 'टु-मॉरो बींइंग माय मंडे, आय शाल गो अर्ली फ्राम द हाफीस' म्हणून श्रावणी सोमवारची सुट्टी मागणारा कारकून, किंवा वडलांच्या श्राद्धाच्या दिवशी 'ॲज माय डेड फादर इज गोइंग टु कम टु डिनर टु-मॉरो इन द शेप ऑफ ए ब्रॅह्मिन' म्हणून साहेबाला घेरी आणणारी इंग्रजी विनंती,—–ह्या साऱ्या गोष्टी साहेबाने निमूटपणे पचवल्या. उद्याच्या हिंदी राष्ट्रभाषेने हे सगळे सहन करायची तयारी ठेवली पाहिजे; तरच ती ह्या अफाट राष्ट्राची राष्ट्रभाषा होईल. लंडनच्या इन्स्टिटयूटमध्ये पुण्याला राहिलेले आणखीही एकदोन इंग्रज भेटले. ते केवळ मराठी शिकायला राहिले होते आणि बोलता आले नाही तरी त्यांना मराठी समजत मात्र चांगले असे! इथल्या लायब्ररीत जयदेवाच्या 'गीतगोविंदा'चे इंग्रजी भाषांतर चाळता चाळता 'नच सुंदरि करु कोपा' ह्या सुप्रसिद्ध गाण्याचा मूळचा संस्कृत आधार अचानक हाती आला. एका तासाच्या वास्तव्यात त्या संस्थेत आमच्या हातून घडलेले हे मौलिक (?) संशोधन!

मराठे व इंग्रज यांच्यात एक विलक्षण समान असे वेड आहे. ते म्हणजे नाटकाचे. इंग्लंडमधल्या माझ्या मुक्कामात तर मी वेड्यासारखी नाटके पाहिली. शहरांत पाहिली — खेड्यांत पाहिली — कॉलेजविद्यार्थ्यांची पाहिली — लहान मुलांची पाहिली — संगीतिका पाहिल्या — टेलिव्हिजनवर नाटके पाहिली आणि रेडिओवर ऐकलीदेखील! मोकळी संध्याकाळ पाहायची, खिसा चाचपून पाहायचा आणि नाटकाची तिकिटे काढायची, हा सपाटा लावला होता.

पाश्चात्त्य रंगभूमी यांत्रिक साधनांनी सुसज्ज आहे, असे म्हणून थांबणे म्हणजे तिथल्या नटनटींचा अपमान करण्यासारखे आहे. मी पाहिलेल्या कुठल्याही नाटकात मायक्रोफोन नव्हता. रंगमंदिरे ध्वनिसंवाहनाच्या दृष्टीने निर्दोष असत आणि तयार आवाजांच्या फेकीची करामत करण्यात नटच नव्हे तर नटीही धन्यता मानीत. या बायांचे आवाज भलतेच भक्कम आणि लवचीक!

ह्या रंगभूमीवर मी चार्ल्स लॉटनचे ' पार्टी ' नावाचे नाटक पाहिले. लॉटनने त्यात एका दारुड्या बापाची भूमिका केली होती. त्याने एंट्रीलाच टाळी घेतली. इंग्रजांचाच काय, पण साऱ्या जगातल्या नाट्यरसिकांचा हा मोठा लाडका नट! चित्रपटातले त्याचे यश त्याच्या फार प्राचीन ' म्यूटिनी ऑन द बाउंटी '–पासून ते परवापरवाच्या ' विटनेस फॉर द प्रॉसिक्यूशन '-मधल्या वकिलाच्या भूमिकेपर्यंत मध्यान्हीच्या सूर्यासारखे तळपते आहे. काहीसा बसकट घोगरा आवाज आणि कॅलिडिओस्कोपसारखा क्षणार्धात भावनांच्या छटांच्या विविधाकृती दाखवणारा त्याचा गुबगुबीत चेहरा आज कित्येक वर्षे मी रजतपटावर पाहत आलो आहे.

लॉटनचे काम एकदा पाहिले की ते विसरलेच जात नाही. काही वर्षांपूर्वी ओ. हेन्रीच्या गोष्टीचा एक चित्रपट आला होता. त्यातल्या 'उपरतीच्या क्षणातल्या' बेगुन्हा तुरुंगात जाणाऱ्या ट्रॅपच्या भूमिकेत शेवटी त्याला उपरती होते तेव्हा तो दिव्यत्वाच्या साक्षात्काराने रडला आहे, असा क्लोजअप लाखात एक पाहायला मिळतो. आठव्या हेन्रीची त्याची ती वखवख, हंचबॅकचे कारुण्य, ला मिझराब्लमधला तो घुम्या लॉटन ह्या इतिहासाच्या पार्श्वभूमीवर जिवंत लॉटन जेव्हा रंगभूमीवर आला तेव्हा मी हरखलो. ह्या नाटकात लॉटन हा दारुड्यांना सुधारण्याच्या असायलम-मधून पळून येतो. त्याच्या एकुलत्या एक मुलीची त्या दिवशी आपल्या शाळेतल्या मित्रमैत्रिणींना पार्टी असते. त्या वेळी त्या नालायक बापाचे अस्तित्व तिला नको असते—येथपासून ते आपल्या असहाय बापाच्या गळ्यात मिठी मारून ओक्साबोक्शी रडण्यापर्यंतची नाटकाची वाटचाल अशा उत्कटतेने झाली होती की, आपल्या मराठी प्रेक्षकांप्रमाणे प्रेक्षकांतला साहेबदेखील मडमेसह मुसमुसू रडतो, हे मला त्या दिवशी कळले. एका दहाबारा वर्षांच्या पोरीने लॉटनच्या मुलीचे काम केले होते आणि अशा तयारीने केले होते की, लॉटनबरोबर ती चिमुरडी जणू काय जुगलबंदी करीत होती.

सर राल्फ रिचर्डसन हेही इंग्रजी रंगभूमीवरील आणि बोलपटातील फार मोठे नाव! 'फ्लॉवरिंग चेरी' हे नाटक पाहताना मला त्याच्या कामात आपल्या केशवराव दात्यांचा पुष्कळ भास झाला. 'आंधळ्यांच्या शाळे'तले दात्यांचे मनोहराचे काम आठवले. ही भूमिकाही तशाच प्रकारची होती. लॉटनची रंगभूमीवरची हालचाल पाहताना गणपतराव बोडस दिसू लागले. दोघेही तसेच बाळसेदार नट, आणि विनोद आणि कारुण्य यांच्या सीमारेषेवर नाचणारे दोघांचेही बोलके डोळे! मला ही नाटके पाहताना आपल्या नटांची फार आठवण येई. 'ओल्डविक' कंपनीचे 'ज्यूलियस सीझर' पाहायला गेलो होतो त्या वेळी ब्रूटसचे काम करणाऱ्या नटाकडे पाहताना वाटे, आमचे नानासाहेब फाटक याच्यापेक्षा एका तसूने कमी नाहीत. 'ओ हा हा' नावाचा फार्स पाहताना आमच्या

शंकर घाणेकरांची सारखी आठवण येई. आमच्या मराठी रंगभूमीवर असे अनेक गुणी कलावंत झाले आणि आहेतही! इंग्रजाने परंपरा टिकवली. आमची अनेक कारणांनी मोडली. चतुर योजकांचा अभाव म्हणावे की काळाला नमस्कार करून मोकळे व्हावे कळत नाही. चिंतामणराव कोल्हटकरांनी प्रख्यात इंग्रज नट सर हेन्री लँग ह्याच्याविषयी लिहिताना म्हटले आहे की, त्याच्या अभिनयगुणांनी आपण दिपलो नाही. इंग्लिश नाटके पाहताना मी देखील पुरुष नटांच्या अभिनयगुणांनी दिपलो नाही. मात्र रंगभूमीवरच्या नटींच्या आवाजाने थक्क झालो. सणसणीत गोळीबंद आवाज ही मात्र आधुनिक नटनटींची शास्त्रशुद्ध कमाई आहे. नाट्य-शिक्षणाच्या शाळांतून आवाज घटवला जातो. आपल्याकडे पार्श्वनाथ आळतेकरांनी ह्या दृष्टीने प्रयत्न केले; परंतु अद्यापि ह्या गोष्टीकडे जावे तितके लक्ष गेले नाही. याचे मुख्य कारण नाटके पोटतिडकीने होत नाहीत. वेस्ट एंडसारख्या सुसज्ज रंगभूमीची तर गोष्टच सोडा, परंतु मी खेड्यापाड्यांतून फिरणाऱ्या नाटक कंपन्यांची नाटके पाहिली, तिथेदेखील असेच कमावलेले आवाज. बोलताना पिटातल्या प्रेक्षकांपर्यंत सहज रीतीने आवाज पोचवून पुन्हा सहजतेचा भास कायम ठेवणे — आरडाओरड्याची अजिबात जाणीव होऊ न देणे ही एक तारेवरची कसरत आहे. मी 'एंटरटेनर' सारखे अत्याधुनिक नाटक पाहिले त्यातदेखील अशीच आवाजदारी होती. त्याविषयी मी ब्रिस्टलमधल्या ओल्डविक नाट्यशिक्षण संस्थेतल्या एका शिक्षकाशी बोलत होतो. हा गृहस्थ गेली तीसचाळीस वर्षे त्या व्यवसायात आहे. त्याने एक गमतीचे सूत्र सांगितले. तो म्हणाला, "पुढल्या रांगांना आवाजाचा त्रास होता कामा नये, मधल्या रांगांना ते बोलणे नैसर्गिक वाटले पाहिजे आणि पिटातल्या प्रेक्षकाला त्यातले अक्षर न् अक्षर कळले पाहिजे, अशा बेताने आवाज लावता आल्याशिवाय ग्रीज पेंट गालावर चढवू नये." भलताच अवघड दंडक! सध्याच्या दिवसांत हा कायदा आला तर आपली जवळ जवळ सगळी नाटके बंद करावी लागतील. अर्थात जोपर्यंत आवाज पोचण्याच्या दृष्टीने बांधलेली नाट्य-गृहेच आमच्याकडे नाहीत, तोपर्यंत विरोधाचा सगळाच आवाज बंद

करायला हवा.

परदेशात प्रत्येक गोष्ट तज्ज्ञावर सोपवण्याची आता सगळ्यांना सवयच लागली आहे. दिग्दर्शक हा साऱ्या शक्ती एकत्र करणारा प्राणी! प्रकाश-योजना, रंगसज्जा, वेषभूषा ह्यांसारख्या प्रत्येक विभागाचे तज्ज्ञ आहेत. ते स्वतंत्रपणे आपली तयारी करतात. तालमी अत्यंत सुसूत्र! नटांची युनियन्स आहेत आणि वेळेवर तालमींना हजर न राहणाऱ्या नटाला तोंडाला कायमचे काळे फासून नष्ट होण्याची भीती आहे. आठवड्याला आठ पौंड हा नटनटींना मिळणारा किमान तनखा. त्यापुढे प्रत्येकाच्या नावलौकिकाप्रमाणे प्रत्येकाशी स्वतंत्रपणे करारमदार होतात. हे बहुधा त्या नटनटींच्या एजंटांमार्फत होतात. प्रत्येक नटाने आपला एजंट नेमलेला असतो. तो कामे मिळवून देतो. साधारणतः आपल्या एक्स्ट्रॉ सप्लायर-सारखी ही पद्धत आहे — मात्र बरीच प्रामाणिक. 'एक्विटी' ही नटांची युनियन आणि 'एम. यू.' ही गाणाऱ्या-वाजवणाऱ्यांची युनियन अत्यंत प्रभावी आहे. कंत्राटदाराने पैसे बुडवणे वगैरे प्रकार नाही. त्याचप्रमाणे "कंपनी नवीनच आहे, जरा नाईट कमी करा" वगैरे भाषा नाही. साहेब नाटकधंद्याला धंदा म्हणतो; सांस्कृतिक चळवळ वगैरे ढोंग नाही. आपल्याकडे ह्या कल्चरने फारच धुमाकूळ घातला आहे. तिथे नाटकाला नाटक म्हणतात, गाण्याला गाणे आणि नाचाला नाच म्हणतात. सांस्कृतिक सप्ताहांची साडेसाती अजिबात नाही. नाटकांना संस्कृतीत कोंबून नाटककारापासून पडदेवाल्यापर्यंत सर्वांचे परिश्रम फुकटात पाडून घेण्याचा खटाटोप तिथे अजिबात नाही.

इंग्लंडमध्ये हौशी रंगभूमी आहे, चांगली जोरात आहे. 'ब्रिटिश ड्रामा लीग'सारख्या मध्यवर्ती संस्थेच्या पंखाखाली जवळ जवळ आठशे हौशी संस्था आहेत. तिथे नवीन प्रयोग होतात. नाट्यशिक्षणशिबिरे होतात. लीगची लायब्ररी उत्कृष्ट आहे. मिस् विल्यम्ससारखी त्याची निष्ठावंत कार्य-कर्ती आहे. आपले श्री. अलकाझी तिथलेच विद्यार्थी. त्यांच्याबद्दल बाई अत्यंत अभिमानाने बोलत होत्या. असा विद्यार्थी हजारांत एखादा येतो, असे श्री. अलकाझी यांच्याबद्दलचे उद्गार ऐकून मला खरोखरच धन्यता वाटली.

परंतु ह्या सर्व संस्थांतून व्यावसायिक रंगभूमीवर जाण्याची नटनटींना महत्त्वाकांक्षा असते. 'प्रोफेशनल' हे तिथे भूषण आहे —— दूषण नव्हे! मी ब्रिस्टलमध्ये तिथल्या युनिव्हर्सिटीच्या नाट्यविभागाने केलेले नाटक पाहिले. ख्रिस्तजन्मापूर्वीचा कथाभाग होता आणि नाटक ख्रिस्तजन्मावर संपत होते. एका जुन्या स्क्वॅश खेळण्याच्या इन्-डोअर बॅडमिंटन कोर्टपेक्षा लहानशा जागेचे लंडनमधील प्रसिद्ध नाट्यगृहशिल्पी रिचर्ड सदर्न यांनी हे प्रायोगिक थिएटर बनविले आहे. त्यात सुमारे शंभर माणसे बसतात. विद्यार्थ्यांना रंगभूमीवर काम करण्याचे, नाटक बसवण्याचे व लिहिण्याचे शिक्षण मिळतेच, परंतु सभागृहात आलेल्या पाहुण्यांना व्यवस्थित आसनाधिष्ठित करण्याचेही शिक्षण तिथे मिळते. लुटुपुटूचे हे थिएटर जणू नाट्यविषयक 'लॅबोरेटरी' आहे. विद्यार्थ्यांच्या त्या नाटकाचादेखील दर्जा खूपच वरचा होता. मी त्यांतल्या काही विद्यार्थ्यांना भेटलो. भावी आयुष्यातल्या स्वप्नात ते लंडनच्या वेस्ट एंडमधील थिएटरातले आपले प्रयोग पाहात होते.

टेलिव्हिजनने खेड्यापाड्यात हिंडणाऱ्या नाटक मंडळ्यांना मात्र बराच धक्का दिला आहे. एक तर इंग्लिश हवा दुष्ट! त्यातून दिवसभर शेतात राबणारी मंडळी संध्याकाळी पबमध्ये जातात. सणासुदीला नाटके पाहायची. पण टेलिव्हिजनचे थिएटर आता दिवाणखान्यात आले. त्यामुळे फायर प्लेसची ऊब घेत नाटके पाहायची सोय झाली. नटनटींना टेलिव्हिजनवर द्रव्यलाभ खूप होतो. 'टेल ऑफ टू सिटीज'ची टेलिव्हिजनवर संगीतिका झाली होती. नव्वद मिनिटांच्या ह्या कार्यक्रमात गायक-वादक व नटनटी यांचा मुशाहिरा म्हणून लाख, सव्वा लाख रुपये द्यावे लागले होते! मात्र टेलिव्हिजन असो, वा रेडिओ असो, जातिवंत नटांचा जीव फूटलाइट्सच्या आसपासच रेंगाळत असतो. मोठमोठे नट चित्रपटांतून किंवा टी. व्ही. वर कामे करूनदेखील दर वर्षी नव्याजुन्या नाटकात रंगत असतातच.

लहान मुलांची रंगभूमीदेखील व्यावसायिक स्वरूपाची आहे. मुलांसाठी नाटके लहान मुलांकरवी करायची, हा विचार काहीसा चुकीचा आहे. प्रेक्षकांत मुले असतात, रंगमंचावर असलीच पाहिजेत असे नाही. मुलांना अद्भुताची आवड मोठी. ह्या नाटकांत यंत्रसामग्रीच्या आधाराने

केलेले चमत्कार पाहून डोळे दिपतात. मी 'सिंडरेला' पाहायला गेलो होतो. थिएटर मुलांनी खच्चून भरले होते. आईबाप आले होते. रंगभूमीवर त्या प्रचंड भोपळ्यातून बारा पांढऱ्या शुभ्र जिवंत घोड्यांचा नक्षत्रांच्या टिकल्यांनी झगमगणारा रथ निघाल्यावर त्या पोरांच्याहून पोर होऊन मीदेखील केव्हा टाळ्या पिटू लागलो हे मला कळले नाही. टॉमी स्टीलसारख्या लोकप्रिय गायकाने ह्यात एका नोकराची भूमिका अप्रतिम केली होती. आणि हँडलबार थाटाच्या मिशांचा विनोदी नट जिमी एडवर्ड्स आपल्या गमतींनी आबालवृद्धांना हसवून बेजार करीत होता. ह्या लहान मुलांच्या नाटकात तर नाटक पाहण्याइतकाच ते चिमुकले प्रेक्षक पाहण्यात आनंद वाटे. रंगभूमीवर त्यांच्या लाडक्या पात्रांचा दुष्ट लोकांकडून छळ झाला की रडवेले होणारे ते प्रेक्षकगृह, अद्भुतांनी डोळ्यांची भोकरे करून पाहणारी ती गुबगुबीत बच्च्यांची गर्दी — आनंदाने आपल्या चिमुकल्या हातांनी टाळ्या पिटणारा, विदूषकाच्या विनंतीबरहुकूम एका सुरात गाणारा, नाचणारा, कोड्यांची उत्तरे सांगणारा तो बाळगोपाळांचा मेळावा पाहताना मन उचंबळून येई. 'मुले ही राष्ट्राची संपत्ती आहे'



ही घोषणा फक्त आम्हांला देता येते. पाश्चात्त्य देशांत ही संपत्ती हिऱ्यांमोत्यांसारखी जपण्यात येते. ती अशी एकत्र आढळली की जवाहिरखाना खोलल्यासारखी दिसते.

आज आपली किर्लोस्कर कंपनी जिवंत असती तर 'गिल्बर्ट अँड सुलीवन' कंपनीइतकी जुनी झाली असती. त्यांचा 'मिकॅडो' हा आपल्या 'सौभद्रा'इतकाच जुना आणि 'सौभद्रा'सारखाच संगीत

नाट्यावतार. 'अथवा शंकाच कशाला', 'फार काय सांगू मित्रा' म्हणत गाण्यांना सुरुवात व्हायची. एवढेच नव्हे तर, वन्स मोअरदेखील मिळायचे. 'मिकॅडो'तल्या एका विनोदी नटाला तर एका गाण्याला दहा वन्स मोअर मिळाले. दिनकर कामण्णांच्या जातीचा हा नट दर वेळी गाणे संपवून विंगेत तऱ्हेतऱ्हेने पावले टाकीत जायचा आणि लोक त्याला टाळ्यांच्या गजरात पुन्हा ओढून आणायचे! गेली ऐंशी वर्षे चाललेल्या ह्या नाटकाला मी गेलो त्या दिवशीदेखील हाऊस फुल्ल गर्दी होती. इंग्रज-अमेरिकनांच्या अनेक पिढ्या आपल्या 'लग्नाला जातो मी' किंवा 'वद जाउ कुणाला शरण' यांसारखी या ऑपेरातील गाणी गुणगुणत आल्या आहेत. माझ्या शेजारचा एक इंग्रज म्हातारा स्टेजवर गाणे सुरू झाले की हळूच गुणगुणे. मी अनेकदा त्याच्याकडे पाहिले. इंटरव्हलमध्ये माझे त्याच्याशी बोलणे झाले. त्याने हे नाटक असंख्य वेळा पाहिले होते. आणि मग पडदा वर जाईपर्यंत त्यातल्या भूमिका कोणी कोणी कशा केल्या, ते तो सांगत होता. शेवटी मला त्याच्या एका वाक्याचे कौतुक वाटले—"हे लोकदेखील प्रयोग बरा करतात. पण तुम्ही ते जुने नट पाहायला हवे होते. माय गॉड! त्यांची ताकदच निराळी होती."

मी विचार करीत परतलो. जुन्यानव्यांचा संघर्ष येथेही आहे. त्या म्हाताऱ्याचे बोलणे ऐकताना —'अण्णाला पाहिला नसेल तुम्ही — जबर पुण्याईचा माणूस — आणि हा एकेक दंड—' म्हणणारा धुंडीराज दिसू लागला. तो जुना प्रेक्षक त्या नटाकडे अशा भाबड्या डोळ्यांनी पाहायचा. आपल्या मराठी रंगभूमीच्या दरबारी अण्णा, भावड्या, दत्तू हल्याळकर, भागवत, गणपतराव जोशी, केशवराव भोसले ही मंडळी प्रेक्षकांच्या जिव्हाळ्याच्या पायघड्यांवरून चालत आली; आपली पदचिन्हे ठेवून गेली. त्यांच्या आठवणींनी आजदेखील वृद्धांचे डोळे चमकून उठतात. मला वाटते, हे मनुष्यस्वभावाचे एक वैशिष्ट्य आहे. जुन्यात आपण रंगतो, स्मृतीची पाने उलटायला बोटांना डोळ्यातले पाणी लागते — मग त्या स्मृती सुखाच्या असोत वा दु:खाच्या! 'मिकॅडो'तल्या त्या गाण्यांना वन्स मोअर पडत असताना मला बालगंधर्व, मास्तर कृष्णराव, दीनानाथराव यांच्या गाण्याचे

वन्स मोअर आठवले. त्यांची ती हमखास टाळ्यांची गाणी, तिरखवांसाहेबांचा धातिंधाडा सुरू झाल्यावर उसळणारे प्रेक्षागार…छे, गाण्यानाटकाचे वेड असलेल्या माणसाचा बोलता बोलता केव्हा धुंडिराज होईल हे सांगता येत नाही..

मात्र माझ्या दृष्टीने जुन्यांतल्या जुन्या आणि नव्यांतल्या नव्या प्रेक्षकाला स्थळकाळाचा विसर पडायला लावणारा एकमेव महान नाटककार म्हणजे शेक्सपिअर ! आजदेखील देशोदेशींच्या रंगभूमीवर हा पठ्ठा शड्डू ठोकून उभा आहे.

ऑक्सफर्डहून एका रम्य संध्याकाळी आम्ही 'स्ट्रॅटफर्ड ऑन एव्हन' ह्या शेक्सपिअरच्या गावाला जायला बसमधून निघालो. त्या वेळी आळंदीला जायला निघालेल्या भाविक वारकऱ्यांसारखी माझ्या मनाची स्थिती होती. शेक्सपिअर ह्या नावाची जादू अचाट आहे. शाळाकॉलेजांत परीक्षेला लावलेल्या पुस्तकांत याची आपली पहिली ओळख होते. आणि ही स्वारी आपल्या मानगुटीला बसते, ती आयुष्यभर आपला पिच्छा सोडत नाही. माझ्या पिढीतल्या, नाटकाची आवड असलेल्या विद्यार्थ्यांनी शालेय जीवनात कधी ना कधी तरी शायलॉक, मार्क अँटनीचे भाषण वगैरे प्रवेश केलेले असतातच. एखादे जोशी मास्तर किंवा कुलकर्णी मास्तर आपल्या अस्खलित इंग्रजीत हे प्रवेश बसवून घेत असतात; आणि आपणही अत्यंत उत्साहाने शुद्ध इंग्रजीत…'फ्रेंड्स, रोमन्स अँड कंट्रिमेन …आय हॅव कम टु बेरी सीझर…' वगैरे म्हणून शाळेच्या गॅदरिंगातील शेक्सपिअरच्या आत्म्याला यातना दिलेल्या असतात. ऑक्सफर्डहून स्ट्रॅटफर्ड फारसे दूर नाही. बसने तीनचार तासांचा प्रवास आहे. शेक्सपिअरच्या गावी जाऊन त्याच्या समाधीला प्रणाम करण्याची माझी फार जुनी महत्त्वाकांक्षा होती. मी त्या गावाला पोचण्यापूर्वीच गदगदलो होतो.

हा प्रवासदेखील मोठा आनंददायक झाला. दुतर्फा हिरवळ, त्यातून डोकावणारी इंग्लिश खेडी आणि रस्त्याच्या दोन्ही बाजूंना सलामीला उभे असलेले उंच वृक्ष — आता त्यांच्यावर हेमंताची सुवर्णशोभा थाटली होती. क्षणोक्षणी डोळ्यांचे पारणे फिटत होते. त्या दुमजली बसच्या वरच्या

मजल्यावर बसून ते दृश्य डोळ्यांत साठवीत जाताना एका नदीच्या पुलाजवळ आमची बस वळली. एव्हन नदी ! कामशेत स्टेशननजीक वाहणारी महाराष्ट्राची भक्तिगंगा इंद्रायणीदेखील ह्या नदीपुढे गर्वाने तट्ट फुगेल एवढी चिमुकली ही नदी. हिच्या काठी हा विल्यम शेक्सपिअर लहानाचा मोठा झाला. आम्ही पोचलो त्या वेळी दिवेलागणी झाली होती. स्ट्रॅटफर्डला आम्ही तीनचार दिवस राहणार होतो. शेक्सपिअरच्या त्या गावाचे डोळे भरून दर्शन घेणार होतो. नाट्यप्रेमी लोकांची ही मक्का, रोम, काशी— काय जे म्हणाल ते ! उन्हाळ्याची सुट्टी संपून गेली तरी आमच्यासारखे देशोदेशींच्या लोकांचे थवे स्ट्रॅटफर्ड पाहायला दाटी करीत होते. शेक्सपिअर मेमोरिअल थिएटरात अजून नाट्योत्सव चालू होता. इंग्रजांचा आवडता नट मायकेल रेडग्रेव्ह हा यंदाच्या मानाचा मानकरी होता. दर वर्षी हा उत्सव उन्हाळ्यात सुरू होतो. मार्च ते नोव्हेंबर चालतो. शेक्सपिअरच्या अफाट नाट्यसंपदेतून चारपाच नाटके निवडली जातात आणि आलटूनपालटून त्यांचे प्रयोग होतात. सर राल्फ रिचर्डसन, सर लॉरेन्स ऑलिव्हिअर, सर जॉन गिलगुड, सर अलेक गिनेस, पॉल रोबसन, डेम सिबिल थॉर्नडाइक यांच्यासारख्या हयात आणि अनेक श्रेष्ठ दिवंगत नटनटींनी इथे आपली सेवा सादर केली आहे. डायरेक्टर जॉर्ज बी. शॉ यांच्या नेतृत्वाखाली ही नाटके इथे होत आली आहेत. ह्या उत्सवाची परंपरा जुनी आहे. परंतु सध्याचे भव्य नाट्यगृह युद्धकाळात बांधले. एव्हनच्या संथ जलाशयात आपले प्रतिबिंब उमटवीत ते उभे राहिले आहे.

ह्या गावाला खरोखरीच एखाद्या क्षेत्राचे स्वरूप आहे. इथल्या दुकानदारांमागे, भोजनालयांमागे, लँडलेडीजच्यामागे शेक्सपिअरची पुण्याई गेली काही शतके उभी आहे. ती पुण्याई त्यांना धन देते. मात्र आपल्या क्षेत्रांतील अंदाधुंदी इथे नाही. आटोकाट प्रयत्नांनी हे गाव एखाद्या फुलासारखे ताजे टवटवीत ठेवलेले आहे.

आमच्या लँडलेडीने हसतमुखाने आमचे स्वागत केले. आमच्याबरोबर आमचे स्नेही डॉ. बारलिंगे होते. त्यांचा आमच्याबरोबर येण्याचा बेत अचानक ठरला होता. त्यामुळे त्यांची राहण्याची सोय होईल की नाही,

अशी शंका होती. पण आम्ही गेलो त्या वेळी ‘ सीझन ’चा भर ओसरला होता, त्यामुळे आम्ही उतरलो त्याच घरात त्यांचीही सोय झाली. आम्ही ह्या छोट्याशा मुक्कामात ‘ हॅम्लेट ’, ‘ रोमिओ अँड ज्यूलिएट ’ आणि ‘ ट्वेल्फ्थ नाईट ’ ही तीन नाटके पाहणार होतो. आम्ही तिथे पोचण्या-पूर्वीच ब्रिटिश कौन्सिलने आमची तिकिटे पोचवली होती.

दुसऱ्या दिवशी सकाळी आम्ही प्रदक्षिणेला निघालो. पहिले दर्शन घ्यायचे ते शेक्सपिअरच्या समाधीचे ! छोटासा हा गाव, त्यामुळे वाहन शोधणे वगैरेची दगदग नव्हती. हातात नकाशे होते, रस्त्यात कोपऱ्या-कोपऱ्याला पाट्या होत्या. त्यामुळे कुणालाही न विचारता आम्ही आमची वाट काढीत निघालो. आमच्या लँडलेडीने साऱ्या प्रेक्षणीय स्थळांबद्दल आम्हांला नीट समजावून सांगितले होते. ही वेल्श बाई तीस वर्षांपूर्वी लग्न होऊन ह्या गावी नांदायला आली. तीस वर्षांपूर्वी तिचे लग्न झाले, हे ऐकून मी जरासा चकित झालो. टिकाऊपणा हा एव्हन नदीच्या पाण्याचा गुणच आहे की काय कळेना. बाई चक्क तिशीतली दिसत होती आणि तीस वर्षांपूर्वी लग्न झाले म्हणून आपल्या तोंडाने सांगत होती. म्हणजे इंग्लंडात कधी काळी आपल्या इकडल्यासारखी पाळण्याबिळण्यात लग्ने व्हायची की काय ? गेली तीस वर्षे स्ट्रॅटफर्डच्या रंगभूमीवर अनेक नटांनी केलेला शेक्सपिअर ती बाई पाहत आली होती. त्यांबद्दल बोलत होती. विशेष म्हणजे त्या बोलण्यात नम्रता होती. आम्ही आपले तिच्याशी बोलताना सकाळच्या नाश्त्यातच तिला “…मी नाटककार आहे… अंमलदार…तुझे आहे तुजपाशी…” वगैरे गोष्टी फेकून दिल्या होत्या. त्यामुळे माझ्याशी बोलताना ती सारखी “ आपल्यासारख्या नाटककाराला, नटाला…” असे पालुपद जोडून नम्रतेने बोलायची. पुढे पुढे मला ते शब्द मार्क अँटनीच्या ‘ बट ब्रूटस इज अॅन ऑनरेबल मॅन ’सारखे डसा-यला लागले. तिच्या सूक्ष्म अवलोकनशक्तीने मी थक्क झालो. ऑलिव्हिअरचा हॅम्लेट, गिलगुडचा हॅम्लेट, मायकेल रेडग्रेव्हचा हॅम्लेट आणि अनेक थोर नटांचा हॅम्लेट पाहून बाई एका अप्रसिद्ध तरुण नटाने केलेल्या हॅम्लेटची तारीफ करीत होती. त्या नटाचे नाव मी विसरलो. तिच्या मते बापाचा

खून आणि आईचा पुनर्विवाह यांमुळे व्याकूळ झालेला, सुडासंतापाच्या भरातदेखील त्या व्याकुळतेचा विसर स्वतःला नि प्रेक्षकांना पडायला न



लावलेला हॅम्लेट या महाभागांपैकी एकालाही दाखवता आला नाही. सारे हॅम्लेट शेक्सपिअरचे आव्हान स्वीकारून आल्यासारखे येतात. हा हॅम्लेट पितृनिधनाचा शोक चेहऱ्या-वर घेऊन आला. "तो कृष्णमेघ त्याच्या चेहऱ्यामागून कधीही हलला नाही." त्या नटाने खरोखरीच असे काही रंगभूमीवर दाखविले की हिच्याच मनाचा तो नाटक पाहताना चाललेला खेळ होता देव जाणे! परंतु हॅम्लेटच्या बाबतीत हे ह्या खाणावळ चालवून जगणाऱ्या बाईला सुचते तिथे शेक्सपिअर कुठे कुठे आणि किती खोल रुजला आहे, याची कल्पना येऊन आपण थिजून जातो. मी तिला मायकेल रेडग्रेव्हबद्दल विचारले. तिचे उत्तर फार सूचक होते. ती म्हणाली, "तुम्ही आता प्रत्यक्ष पाहणार आहा. तुमच्या डोळ्यांनी पाहा ... मग आपण बोलू."

उंच घनदाट वृक्षांच्या राईत स्ट्रॅटफर्डचे चर्च उभे आहे. शेक्सपि-अरच्या जन्माची नोंद इथे झाली. बेलिफाचे काम करणाऱ्या आपल्या बापाचे बोट धरून तो प्रार्थनेला आला असेल, ॲना हॅथवेच्या चेहऱ्याकडे चोरून पाहात त्याने इथेच 'नातिचरामि'ची शपथ घेतली असेल. आज तिथेच तो चिरनिद्रा घेत पडला आहे. एका बेलिफापोटी जन्माला आलेला स्ट्रॅटफर्डचा हा विल्यम साऱ्या जगात आपल्या गावाचा, कुळाचा आणि भाषेचा उद्धार करून गेला. त्या वाङ्मयप्रभूच्या समाधीपाशी आपण उभे राहिलो की अवाक होतो. वास्तविक चारचौघांच्या थडग्यासारखे हे थडगे

आहे. त्याचे खरे स्मारक एव्हन नदीच्या काठी उभे आहे. तिथे शेक्स-पिअरचे शब्द वर्षातून आठ महिने देशोदेशींच्या प्रेक्षकांच्या अंत:करणात लक्ष निनाद उमटवीत असतात. हजारो लाखो डोळे तिथे पाणावतात, हास्याची उधळण होते. पण त्या चर्चच्या गंभीर वातावरणातले ते त्या चिरनिद्रित महाकवीचे थडगे पाहिले की वाटते, हा माणूस ह्या एवढ्याशा बेटाला अपरंपार संपत्ती देऊन गेला! आज तीनचार शतके त्या शब्दसोनियाच्या खाणीतून धन लुटले जात आहे. पण त्या बावन-कशी सोन्यातला तसूभर कस कमी होत नाही. शब्दांची अमृतपुष्पे व्हावीत तर ही अशी. एरवी मर्ढेकरांच्या भाषेत सांगायचे म्हणजे हे ' पांढऱ्यावर काळे ' करीत बसायचे.



जन्माला यावे आणि शेक्सपिअरच्या नाटकात काम करावे, ही देशो-देशींच्या नटांची नि नटींची महत्त्वाकांक्षा! आकाशाचा अर्थ मलाच कळला म्हणणाऱ्या नव्या जोमाच्या कवीप्रमाणे शेक्सपिअर मला कळला म्हणणारे नट, तत्त्वज्ञ, विद्वान, प्राध्यापक···त्याच्या शब्दाशब्दाचा वेध घेणारे महान कलावंत, त्याच्या प्रसंगाप्रसंगाला संगीताची पार्श्वभूमी निर्माण करणारे संगीतज्ञ, त्याच्या नाटकाला छायाप्रकाशांच्या जादूने नट-वणारे प्रकाशयोजक, दिग्दर्शक, निर्माते···नाटकानाटकांतून, भूमिके-भूमिकेतून, — नव्हे, स्वल्पविराम-अर्धविरामांतून नटांना आव्हान फेकीत जाणारा हा महान नाटककार···अशा माणसाच्या समाधीशी उभे राहिले की नकळत आपले कर जुळतात! ज्ञानेश्वरांच्या समाधीपाशी पोचेपर्यंत मराठी मनाच्या अहंकाराचे वस्त्र गळून पडलेले असते. शेक्सपिअरच्या समाधीने, नाट्याचा हा पंचमवेद पढू इच्छिणाऱ्या माझ्यासारख्या नगण्य माणसाची काय अवस्था केली, हे शब्दांनी कसे सांगू? शेक्सपिअरच्या समाधीला मनोमन प्रणाम करून तिथून निघालो. चर्चच्या मागल्या

बाजूने एव्हन नदी मंथपणाने वाहत होती. तिच्या किनाऱ्यावर काही वेळ जाऊन स्वस्थ बसलो.

थिएटरला जोडूनच एक प्रदर्शन आहे. त्यात शेक्सपिअरच्या नाटकांतून कामे केलेल्या महान नटांचे व नटींचे त्या त्या वेषांतले पोर्ट्रेट्स आहेत. त्यांनी वापरलेला पोषाख, निरनिराळ्या हॅम्लेट्सनी वापरलेल्या कवट्या, तलवारी, खंजीर वगैरे वस्तू जतन करून ठेवल्या आहेत. आपल्याकडल्या थोर नटांच्या पोषाखाचे तर राहोच, काही जणांच्या बाबतीत तो नट 'होता कसा आननी' हेदेखील दिसण्याची कुठे व्यवस्था झाली नाही. शेक्सपिअरच्या गावची दुसरी स्मरणीय वास्तू म्हणजे ॲना हॅथवेचे चिमणे घर! आपल्या कोकणातल्या घरासारख्या लहान लहान खोल्यांचे आणि गवती छताचे हे झोपडे आहे. जावईबुवा म्हणून शेक्सपिअरचा पहिला दिवाळसण इथे झाला असेल. खुद्द शेक्सपिअरने आयुष्याच्या अखेरीला घेतलेले घर आज उभे नाही. तिथे फक्त पाया आहे. परंतु त्याने लावलेली बाग मात्र मोठ्या काळजीपूर्वक राखलेली आहे. त्याच्या वडिलांचे घर टिकवले आहे. त्याचा जन्म झाला ती खोली दाखवतात. काही हस्त-लिखिते शिल्लक आहेत.

पण त्याचे खरे स्मारक म्हणजे एव्हनकाठचे मेमोरियल थिएटर! हॅम्ले-टचा प्रयोग दुपारी होता. इथे आठवड्यातून दोनतीन वेळा दिवसातून दोन दोन खेळ होतात. मायकेल रेडग्रेव्हची मी सकाळी मुलाखत घेणार होतो. परंतु दुर्दैवाने ती होऊ शकली नाही. त्याचे कारण कळल्यावर मात्र आश्चर्य वाटले. एक प्रकारचा आदर वाटला. मायकेल रेडग्रेव्ह आणि त्याच्या जोडीची मंडळी ह्यांनी आजवर हॅम्लेटचे अनेक प्रयोग केले अस-तील. परंतु लवकरच कंपनीचा मुक्काम मॉस्कोला होणार होता; आणि दुपारी नि संध्याकाळी असे दोन खेळ असताही सकाळी त्यांची हॅम्लेटची तालीम होती. म्हणजे सकाळी नऊ वाजल्यापासून रात्री अकरा वाजेपर्यंत तीनदा हॅम्लेट नाटक होणार होते. तपश्चर्या म्हणतात ती याहून काय निराळी असायची!

दुपारी हॅम्लेट पाहताना तर माझी 'अश्रुनीर वाहे डोळा' अशी अवस्था

झाली. मायकेल रेडग्रेव्ह हा नट ऑलिव्हिअर किंवा गिलगुड यांच्या तोडीचा मानला जात नाही. पण मी ऑलिव्हिअरचा हॅम्लेट चित्रपटात पाहिला आहे व गिलगुडचा तबकडीवर ऐकला आहे. रेडग्रेव्हचा हॅम्लेट मला कुठेही उणा वाटला नाही. बोलण्या-वागण्यात अशी काही विलक्षण मोहकता होती की, शेवटल्या 'स्वीट प्रिन्स' ह्या संबोधनाची वाक्यावाक्याला प्रचीती यावी. डोरोथी ट्यूटिन नावाच्या नटीने ऑफिलियाची भूमिका केली होती.



बाकीच्या भूमिकाही अशाच तोलामोलाच्या नटनटींनी केल्या होत्या. सारा प्रयोग कसा सुंदर लयकारीने बांधल्यासारखा होता. प्रत्येकाच्या वागण्यात, बोलण्यात आणि चालण्यात हमखासपणा होता. त्या क्षणाला प्रेक्षकांकडून जो प्रतिसाद हवा तो मिळवण्याचे कसब होते. हे कसब परिश्रमाने साध्य झालेल्या सहजतेमागे खुबीने दडवले होते. प्रकाशयोजना आपले अस्तित्व जाणवू न देता इष्ट परिणाम साधत होती. संगीत जाणिवेच्या पाठीशी लपून राहून आपली जादू पसरीत होते. कुठेही काही बेसूर नाही, बेलय नाही. असा नाट्यप्रयोग पाहताना आनंद झिरपल्यासारखा अंत:करणात शिरत असतो. हॅम्लेटच्या मानाने 'रोमिओ अँड ज्युलिएट'चा प्रयोग आधुनिक मराठी नाटयसमीक्षणातला टीकाकारांचा आवडता शब्द वापरायचा म्हणजे 'थिटा' वाटला! कदाचित हॅम्लेटचा प्रभाव अधिक पडला म्हणून असेल किंवा लेस्ली हॉवर्डचा रोमियो डोक्यात बसला होता म्हणून असेल, मायकेल रेडग्रेव्हचा रोमियो जमल्यासारखा वाटेना! डोरोथी ट्यूटिन मात्र ऑफिलियापेक्षा ज्यूलिएट म्हणून अधिक गोड वाटली. नेहमीप्रमाणे ज्यूलिएटच्या नर्सचे काम करणारी नटी भाव खाऊन गेली. ह्या नर्सचे पात्रच मुळी शेक्सपिअरने मोठे भाबडे आणि हृद्य असे रंगवले आहे. 'रोमियो

अँड ज्यूलिएट 'ची रंगसज्जा मोठी आकर्षक होती. रंगमंचावर एकमेका-समोर एकमजली गच्च्या उभ्या केल्या होत्या. हे जणू काय एकमेकां-समोर राहणाऱ्या मँटेग्यू आणि कॅप्युलेट्स यांच्या वाड्यांचे दर्शनी भाग! मेजवानीचे वगैरे देखावे ह्या पहिल्या मजल्यावर होत. प्रकाशयोजनेची जादू तर होतीच. रंगमंचावर विविध स्तरांचा उपयोग केला जात होता.

रंगसज्जा, प्रकाशयोजना यांचा उपयोग अत्यंत चतुराईने करणे हा तर पाश्चात्त्य दिग्दर्शकांच्या हातचा मळ आहे. परंतु संवादाच्या वजनदार उच्चाराकडे दुर्लक्ष नाही. आमच्या रंगभूमीवर हल्ली मी नव्या हौशी दिग्दर्शकांकडून नेहमी चर्चा ऐकतो ती केवळ रंगसज्जेची आणि प्रकाश-योजनेची. नाटककाराने लिहिलेले शब्द हा नाटकाचा प्राण आहे, हे आता ओरडून सांगायची पाळी आली आहे. नवे दिग्दर्शक नटाच्या गळ्यापेक्षा सुताराच्या खिळ्यावर आणि विजेच्या बटनांवर अधिक ध्यान देऊ लागले आहेत. नक्कल पाठ असणे हा अनावश्यक भाग होऊ लागला आहे. पाश्चात्त्य रंगभूमीवर मी जवळ जवळ पन्नास नाटके पाहिली अस-तील, पण कुठे कोणी भाषणासाठी चाचरताना आढळले नाही, की प्रॉम्प्टिंग ऐकू आले नाही.

रंगभूमीवर निरनिराळे देखावे उभे करण्यातले कसब खरोखरीच थक्क करणारे आहे. 'सिंडरेला 'मध्ये म्हाताऱ्या चेटकिणीची जादूची कांडी फिरल्याबरोबर त्या प्रचंड भोपळ्यातून बारा चिमुकले जिवंत घोडे जोड-लेला आणि जडजवाहिरांनी मढलेला रथ जेव्हा झगमग करीत आला, तेव्हा त्या थिएटरातल्या मुलांपेक्षाही मी थक्क झालो. मीदेखील रंगभूमीवर काही दिवस काढले आहेत. पण ही ट्रिक शेवटपर्यंत माझ्या लक्षात आली नाही. पॅरिसला एका निशागारात



प्रेक्षकांना आतल्या पोहणाऱ्या युवतींच्या जलक्रीडा व्यवस्थित दिसाव्या म्हणून कलता केलेला पोहण्याचा तलावच रंगभूमीवर हा हा म्हणता आला होता. अमाप पैसे आणि चतुर कारागिरी यांच्या संगमातून असले चमत्कार निर्माण करता येतात. पण आपल्या पोटच्या पोरीला आपल्याबद्दल तिरस्कार आहे, हे कळल्यावर चार्ल्स लॉटनने केलेला अभिनय, गरीब आणि काबाडकष्ट उपसून संसार करणाऱ्या बायकोला फसवून जगणाऱ्या नायकाची राल्फ रिचर्डसनने दाखवलेली हालचाल, किंवा सीझरच्या शवपेटिकेपुढे शेक्सपिअरची अमर वाक्ये फेकणारा तो तरुण मार्क अँटनी ही माणसे नाटके उभी करतात! चित्रापेक्षा चौकट भारी होऊ नये! इंग्रजी रंगभूमीवर ही दखल घेतलेली मला दिसली. थिएटरे जुनी आहेत. महाराणी विक्टूरियाच्या अमदानीतली सजावट आहे, सोनेरी नक्षीकाम आणि हंड्याझुंबरेच आहेत. पण नट जीव ओतून साऱ्या प्रेक्षागाराचे लक्ष आपल्याकडे ओढून घेतात.

अर्थात खुद्द लंडनमध्ये व्यावसायिक रंगभूमीला नाके मुरडणारे लोक कमी आहेत असे नाही. दुर्दैवाने अशा उच्चभ्रू लोकांच्या मेळाव्यात जाण्याचा प्रसंग आला. कॉकटेल पार्टी होती आणि यजमान होते लंडन-मधल्या एका नाट्यशिक्षण संस्थेचे प्रमुख. तिथे जो समुदाय जमला होता, त्याची हिंदी आवृत्ती मुंबईला कोटातल्या हॉटेलांतून हल्ली पाहायला मिळते. यात दाढी बाढवलेला एखादा चार-साडेचार फूट उंचीचा चष्मेवाला तरुण, एखादा भलतेच रंगीबेरंगी कपडे घातलेला कळकट माणूस, एखादा उत्कृष्ट शार्कस्किनचा सूट घातलेला गृहस्थ, — हा बहुतेक त्यांच्या कॉफी आणि सँडविचिसचे बिल देतो — दोनतीन पोरी! त्यांत एखादी उगीचच हँडीक्राफ्टच्या कारखान्यात बनवल्यासारखी दिसणारी आणि त्यातल्या त्यात बऱ्यापैकी. दुसऱ्या दोघींतली एक चष्मेवाली आणि बहुधा गालांवर पुटकुळ्या आलेली आणि तिसरी खांद्यावरचा पदर हातावर सांभाळणारी नि पातळांच्या जाहिरातींतल्या चित्रांसारखी सारख्या पोझेस बदलत बसणारी! ह्या लोकांत बसण्याचे दुर्भाग्य ज्यांना लाभले असेल त्यांना लंडनमध्ये त्या दिवशी त्या पार्टीला जमलेला गोतावळा कळेल. मी

तर गुदमरलोच. एकच सुदैव, त्या दिवशी माझी आणि रिचर्ड सदर्नची ओळख झाली. हा नाट्यस्थापत्याचा विशेष विचार केलेला वृद्ध गृहस्थ आहे. त्याने माझ्याशी एकदम भरतावरच बोलायला सुरुवात केली. त्याचे म्हणणे, भरताने रंगमंचाबद्दल इतक्या सुंदर सूचना केल्या असताना तुम्हां लोकांना परदेशी स्थापत्यशास्त्रज्ञांची मदत हवी कशाला ? नंतर एकदा मी लंडनच्या प्राच्यविद्या-व-आफ्रिकीविद्या मंदिरांतून प्राध्यापक जोशांना भेटून भरताच्या नाट्यशास्त्रातला तो भाग मुद्दाम मिळवून वाचला. एका गुजराती प्राध्यापकांनी सुमारे पन्नास पानांचे ते पुस्तक इंग्रजीत (परमेश्वरा !) प्रसिद्ध केले आहे. ते पुस्तक वाचून भरताविषयी माझे मत काही फारसे चांगले झाले नाही. मी सदर्नसाहेबांना म्हटले की, " भरताच्या काळानंतर हिंदुस्थान जरासा बदललाय असं मला वाटतं. " हे खास इंग्रजी पद्धतीचे अधोविधान सदर्नसाहेबांना पटले असावे. त्यांनी मोकळेपणाने हसून पुन्हा केव्हा तरी बोलू म्हणून मला वाटेला लावले. एरवी मात्र त्या पार्टीतले संभाषण असह्य होते.

" आपण चार्ल्स लॉटनचं ' पार्टी ' पाहिलंत का ? "

" शीः शीः भयानक ! " — आम्ही मोर्चा दुसरीकडे वळवला.

" यंदा स्ट्रॅटफर्डला मायकेल रेडग्रेव्हचे खेळ चालले आहेत··· " मी पहिल्या चटक्यानंतर भीत भीत सुरुवात केली.

" रेडग्रेव्हला शेक्सपिअर कळायला आणखी पंचवीस वर्षं लागतील ! " पुन्हा मी त्याही गटातून निसटलो. ह्या मंडळींना लंडनच्या रंगभूमीवर चाललेले एकही नाटक पसंत नव्हते. विशेषतः पार्टी, फ्लॉवरिंग चेरी, फाइव्ह फिंगर एग्झरसाईज, -— वगैरे लोकप्रिय नाटकांना तर ही मंडळी सारखी आपली वाढत्या वेळेबरोबर आणि रिकाम्या होणाऱ्या पेल्याबरोबर लाल लाल होत चाललेली नाके अधिकाधिक मुरडत होती.

मला मुंबईतल्या नवनाट्यवाल्यांची गंगोत्री सापडली. ' सौभद्रा 'पासून ते आजतागायतच्या लोकप्रिय झालेल्या यच्चयावत नाटकांना ( असलेली व नसलेली ) नाके मुरडण्याचा जो अतिनव प्रयत्न चालला आहे त्याच्या जणू काय हेडहापिसात मी शिरलो होतो. माझा जीव गुदमरायला लागला.

आम्ही म्हणजे नारायणराव बालगंधर्वांच्या ‘ मधुमधुरा तव गिरा ’च्या आठवणीने गहिवरणारे पंढरीचे वारकरी. आम्हांला ही पंडितांची घट-पटाची चर्चा कशी कळायची? काही वेळ मी आपला ह्या बालिष्टरांची विद्वत्ता निमूटपणे ऐकत उभा राहिलो. ही रंगभूमी मोठी खट्याळ आहे. प्रत्येक काळात ती नव्या नव्या प्रियकरांना जवळ करते! सध्या तिने नट नाटककार, गायक, वादक वगैरे आपले सगळे जुने प्रियकर सोडले आहेत आणि तिचा रंगारी, बत्तीवाले आणि आयुष्यात तोंडाला रंग न लावलेले आणि नाटक पाहण्यासाठी जागरणसुद्धा न पेलणारे टीकाकार ह्यांच्याशी लडिवाळपणा चालला आहे. धूर्त लेखकांनी कदाचित हे ओळखून “ आमची नाटके मुळी रंगभूमीसाठी नाहीतच ” असे म्हणून लायब्ररीच्या कपाटांसाठी नाटके लिहायला सुरुवात केली आहे. आणि दिग्दर्शकांनीही नटाकडे अधिक लक्ष देण्याऐवजी पेंटर आणि बत्तीवाले ह्या रंगभूमीच्या नव्या प्रियकरांची खुशामत सुरू केली आहे. ‘ प्ले इज द थिंग ! ’ हे वचन जुने झाले.

पण इंग्रजी व्यावसायिक रंगभूमी ह्या ओरखड्यांनी घायाळ होत नाही. हौशी रंगभूमीवर यशस्वी ठरलेली नाट्यकृती ती लगेच स्वीकारते. बहुते-कांचे ध्येय प्रेक्षकांचे मनोरंजन करणे हे आहे. कोणताही नवा प्रयोग असो, थिएटरात जमणाऱ्या अगर जमायला हव्या असलेल्या गर्दीचा विचार डावलून हे कार्य होत नाही. इंग्रजीत ज्याला ‘ शो बिझिनेस ’ म्हणतात, त्यात किती तरी मनोरंजनाचे प्रकार येतात. त्यात काही काही चांगल्या साहित्यिक दर्जाचेही आहेत. एमलिन विल्यम्ससारखा नट रंग-भूमीवर ‘ चार्ल्स डिकन्स ’ किंवा ‘ डिलन टॉमस ’ म्हणून दाखवतो. एकदा शनिवारी दुपारी ‘ हे मार्केट ’ मध्ये एक नाटक पाहून बाहेर पडलो. पिकॅडलीच्या भागात बरीच थिएटरे आहेत. पूर्वी मुंबईला बॉंबे थिएटर, बालीवाला, रिपन, व्हिक्टोरिया ही नाट्यगृहे जशी आसपास होती तशी! फिरता फिरता एका थिएटरवर ‘ ए बॉय ग्रोईंग अप ’ अशी डिलन टॉमसच्या साहित्यकृतीवर आधारलेल्या खेळाची जाहिरात वाचली. लंडनमध्ये आयत्या वेळी तिकीट मिळणे मुश्किल! मनाचा धडा करून तिकिटाच्या खिडकी-

पाशी गेलो. तेवढ्यात एका गृहस्थाने आपली दोन तिकिटे परत केली आणि आम्ही त्यांवर झडप घातली.

रंगमंचावर एक काळा पडदा होता आणि पियानोवर उत्कृष्ट संगीत वाजवले जात होते. काही वेळाने काळा, बावळटासारखा सूट घालून, पांढऱ्या शुभ्र चमकदार केसांचा एक देखणा गृहस्थ आला. त्याच्या काखेत एक बाड होते. प्रकाश वाढला आणि मध्यभागी ' डिलन टॉमस ' असे मोठ्या अक्षरात रंगवलेले शब्द आले. डिलन टॉमस हा सुविख्यात वेल्श कवी ! विलक्षण जीवन जगलेला. अतिरिक्त मद्यपानामुळे व अमर्याद जीवनपद्धतीमुळे अकाली मृत्युमुखी पडला. हा असामान्य प्रतिभेचा कवी आणि लेखक. एम्लिन विल्यम्सने त्याच्या वाङ्मयातून त्याच्या बाल्यापासून ते वयाच्या सतराव्या वर्षी त्याने लंडनच्या एका लँडलेडीच्या घराचा दरवाजा ठोठावल्यापर्यंतच्या हकीकतीचे भाग निवडून काढून साभिनय म्हणून दाखविले ! कार्यक्रम तीन तास चालला होता, हे घड्याळ पाहिल्यावर कळले ! अडीचतीन तास अश्रूंचा आणि हास्याचा खेळ चालला होता. सुमारे सहा महिने रोज हा कार्यक्रम चालला होता आणि आम्ही गेलो त्या दिवशीही थिएटरमध्ये मुंगीला जागा नव्हती. आम्हांला केवळ नशिबाने तिकिटे मिळाली. खेळ संपला. अंधारात एम्लिन विल्यम्स गडप झाला. एका प्रकाशरेखेने अक्षरे दाखवली, ' डिलन टॉमस '— प्रेक्षकांनी टाळ्यांचा कडकडाट चालवला. एम्लिन विल्यम्सने प्रवेश करून उजवा हात त्या ठळक अक्षरांकडे नेत न बोलता म्हटले — हे माझे नाही, ह्या माझ्या दिवंगत मित्राचे आहे. पाणावलेल्या डोळ्यांनी प्रेक्षक उठले. अडीच तास डिलन टॉमसचे शब्द आणि एम्लिन विल्यम्सची ते प्रेक्षकांपर्यंत पोचविण्याची हातोटी ! ह्या प्रकाराची तुलना करायचीच झाली तर जुन्या पट्टीच्या कीर्तनकाराशी करावी ! निजामपूरकरबुवा, कवीश्वरबुवा, केवळ ह्या अस्खलित शब्दसामर्थ्यावर श्रोत्यांना रात्र रात्र तरंगत ठेवीत. हीच किमया एम्लिन विल्यम्सची. रंगभूमीवर एक घडीची खुर्ची, याशिवाय काहीही नव्हते. होती ती एम्लिन विल्यम्सची अस्खलित वाणी आणि डिलन टॉमसची अलौकिक प्रतिभा ! हे ऐकताना सारखे वाटे की,

व्यंकटेश माडगूळकरांनी आपल्या गोष्टी गावोगावी जाऊन का सांगू नयेत ? त्यांची कथनशैली सुंदर आणि त्यांच्या गोष्टीत गोष्टी आहेत, विनोद आहे, कारुण्य आहे, मनुष्यस्वभावाचे शेकडो हृद्य नमुने आहेत. मराठी रंगभूमीवर प्रयोगांची आवश्यकता आहे, ती ह्या अशा तऱ्हेच्या प्रयोगांची !

लंडनचा मुक्काम आवरत आला होता आणि आणखी नाटके पाहिली नाहीत, पाहता आली नाहीत, याची हुरहूर होती. अर्थात जी पाहिली त्यांतले प्रत्येक असामान्य होते, अशातला भाग नाही. टी. एस. इलियटचे 'एल्डर स्टेट्समन' पाहायला गेलो आणि संपूर्ण निराश होऊन परत आलो, तर 'फाइव्ह फिंगर एग्झरसाईझ' नावाचे एका नव्या लेखिकेने लिहिलेले नाटक फारच परिणामकारक होते. गिलगुडने ह्या नाटकाचे दिग्दर्शन केले होते. मी पाहिलेल्या जवळ जवळ पन्नास नाटकांत मला ह्या नाटकाची रंगसज्जा फार आवडली. एका श्रीमंत माणसाच्या घराचा उभा छेद रंग-भूमीवर मांडला होता. खालचा दिवाणखाना, वरच्या मजल्यावरच्या खोल्या, तिथे जायचे जिने या साऱ्यांचा उपयोग पात्रांच्या हालचालीसाठी अतिशय चतुराईने केला होता. ह्या नाटकात एका निराश्रित जर्मन शिक्षकाची भूमिका करणाऱ्या तरुण नटाने साऱ्या प्रेक्षागाराला आपल्या संयत अभि-नयाने हलवून सोडले. शेवटल्या अंकात हा आत्महत्या करतो असा प्रसंग आहे. त्यानंतर मिनिटा-दोन-मिनिटांतच नाटक संपते. टाळ्यांचा कडकडाट पाचदहा सेकंद ओसरल्यावर झाला. अभिवादन करायला सर्व नटनटी आल्या, त्यांत हा नट होता. मला उगीचच वाटले, हा आला नसता तर त्याच्या त्या असामान्य अभिनयाची प्रेक्षकांना अधिक खोलवर आठवण राहिली असती.

पाश्चात्त्य देशांतली ही अभिवादनाची पद्धत मला फार आवडली. नाटक संपल्यावर प्रेक्षक टाळ्या वाजवून नटनटींना परत बोलावतात. एकदा-दोनदा नव्हे, दहा दहा पंधरा पंधरा वेळा ! तितक्या वेळा पडदा वरखाली जातो. आणि ह्या शेवटल्या अभिवादनासाठी येण्याची पद्धतही फार छान असते. आधी दुय्यम पात्रे येतात आणि शेवटी नायक-नायिका येतात. 'रोअर

लाइक ए डव्ह ' नावाचे एक विनोदी नाटक पाहायला गेलो होतो, त्यात नायिका प्रसूत होऊन तिला मुलगा झाल्याची बातमी येते आणि त्या पुत्रजन्ममहोत्सवाबरोबर नाटक संपते. प्रेक्षकांनी टाळ्यांचा कडकडाट केला. सर्व पात्रे आली पण नायिका येईना. पुन्हा टाळ्या वाजल्या आणि चेहऱ्यावर बाळंतिणीचा थकवा घेऊन आणि हातात लोकरी कपड्यात गुंडाळलेली नवजात बालकासारखी दिसणारी बाहुली घेऊन नायिका विंग-मधून आली आणि नायकानेदेखील अगदी ' सांभाळून ये — सांभाळून ये ' म्हणत तिला आणली. हे कर्टन कॉल्स किंवा ' आं कोर ' घेताना नटनटी काही गमतीही करतात. चार्ल्स लॉटन पाचव्यासहाव्या टाळीनंतर निम्मा पडदा खाली आल्याबरोबर टुणकन उडी मारून पळाला; तेवढ्यात पडदा वर गेला आणि भयंकर चपापल्यासारखे दाखवून पुन्हा गंभीरपणे त्याने टाळ्यांचा स्वीकार केला, आणि प्रेक्षक त्याच्यावर आणखी खूष झाले. प्रेक्षकांच्या ह्या लाडक्या नटांच्या आणि नटींच्या भाग्याचा देवांनीही हेवा करावा !

काही वेळा केवळ शिष्टाचार म्हणूनही टाळ्या वाजवल्या जातात. परंतु कलावंताला खऱ्याखोट्या टाळीचे वजन तेव्हाच लक्षात येते. बेहोषीतल्या टाळीचा कडकडाट हा काही निराळाच असतो. अशा प्रचंड टाळ्या ब्रऱ्याच वेळा ऐकायला मिळाल्या. आठ-आठ दहा-दहा वेळा पडद्यामागून नटाला बोलावून टाळ्यांनी त्याचे अभिनंदन झालेले मी पाहिले. अशा वेळी आनंदाने कलावंताच्या डोळ्यांत पाणी तरळते. एम्लिन विल्यम्सला अशा मुंबईच्या पावसासारख्या टाळ्या पडत होत्या, त्या वेळी ' हा मान माझा नव्हे, डिलन टॉमसचा आहे ' अशा अत्यंत कृतज्ञ भावाने तो पडद्यावरील त्या नावाकडे आणि खुर्चीवरील डिलन टॉमसच्या पुस्तकां-कडे हात दाखवीत होता. तो प्रसंग आजदेखील डोळ्यांपुढे आहे.

बाकी कलावंताला दाद देण्याची एकेका देशाची एकेक पद्धत आहे. आपल्याकडे मैफलीत पहिल्या समेच्या ' हो 'काराबरोबरच बुवांच्या मनात श्रोत्यांच्या रसिकतेची कुंडली मांडली जाते ! गळ्यातून सुंदर जागा गेली आणि समोरच्या माना हलल्या नाहीत तर आपले तमाम बुवा आणि

वाया कायमच्या माना टाकतात. आपल्या संगीतातील ही देवाणघेवाण आवर्तना-आवर्तनागणिक, नव्हे मात्रेमात्रेगणिक चाललेली असते. कारण आपण वाहवा 'देत' नाही. आपली वाहवा 'जाते'! "गाण्यात माना कधी हलवायच्या असतात हो?" असा एक केविलवाणा प्रश्न विचारला जातो. अशा मंडळींची पाश्चात्त्य देशांत चांगली सोय आहे. तिथली गायनवादनकलाच निराळी आहे, श्रवणकलाही निराळी आहे. मैफिल रंगवण्याची जबाबदारी तिथे जाणकार श्रोत्यांवर अजिबात नाही. कधी कधी अशा मैफिलीत आपल्याला गुदमरायला होते. एका असामान्य वादकाच्या मैफिलीत मला हा अनुभव आला.

लंडनचे वास्तव्य आटपत आले होते. टेलिव्हिजनचा शिक्षणक्रमही संपला होता आणि त्याच दिवशी पॅरिसमध्ये दोन महिने त्याच अभ्यासासाठी म्हणून युनेस्कोने एक शिष्यवृत्ती दिल्याचे कळवले होते. रात्री यहुदी मेनुहिनचे व्हायोलिन ऐकायला लंडनच्या फेस्टिव्हल हॉलमध्ये जायचे होते. लंडनच्या मुक्कामात मी पाश्चात्त्य संगीताच्या फारशा मैफिली ऐकल्या नाहीत. एक तर पाश्चात्त्य संगीतात मला अजिबात गम्य नाही. ते संगीत ऐकताना लक्ष फक्त मेलडीच्या भागात गुंतते आणि मधूनच भारतीय संगीताशी सुंदर साम्य आढळले तरच अंतःकरणात काही सुसंवादित्व निर्माण होते.

संध्याकाळची दिवेलागणी झाली होती. हिवाळ्यात साडेतीन-चार वाजताच वास्तविक दिवेलागणी होते. परंतु ही घड्याळातली संध्याकाळ होती. टेम्स नदीच्या काठी असलेल्या ह्या प्रचंड रॉयल फेस्टिव्हल हॉलमध्ये आम्ही तासभर आधीच पोचलो. टेम्स नदी रात्री इतकी सुंदर दिसते, याची कल्पनाही नव्हती. बाकी मोठ्या शहरातून वाहणाऱ्या नद्या रात्रीच पाहाव्यात. बकालपणा लपवायला काळोखाची बरीच मदत होते आणि उरते केवळ नदीत उमटलेले दिव्यांचे प्रतिबिंब. दिव्यांनी पंक्चरलेली रात्र अशा वेळी आकाशातल्या चांदण्यांशी स्पर्धा करते. फेस्टिव्हल हॉलच्या आसपास सुंदर हिरवळी आहेत आणि त्या अगदी नदीच्या काठापर्यंत जातात. बोटीच्या डेकवर बसल्यासारखे वाटते. काठावर बाके ठेवली

आहेत. पाच-सहा फूट उंचीवर ही बाके ठेवली आहेत. वर जायला वळणदार पायऱ्या आहेत. आम्ही रिकामे बाक शोधायला लागलो. जवळ जवळ सगळी बाके प्रणयी युग्मांनी शृंगारलेली होती. संध्याकाळच्या त्या प्रशांत वेळी दिव्यांच्या लक्ष माळा अंगाखांद्यावर रुळवीत वाहणारी ती टेम्स आणि तिच्या काठी चालणारे ते प्रियाराधन, जवळच्या टुमदार मद्या-लयात माफक मद्यसेवन, त्यानंतर फेस्टिव्हल हॉलमध्ये जाऊन अभिजात संगीतात घडणारे अवभृथ स्नान ! नदीच्या काठाने मैलभर चालूनदेखील रिकामे बाक मिळेना, काही काही बाकांवर तर दोन दोन जोडपी एक-मेकांच्या अस्तित्वाची दखल न घेता वळचणीतल्या कबुतरांसारखी बसली होती. यहुदी मेनुहिनच्या कार्यक्रमाला अजून बराच अवकाश होता. आम्ही मनाचा धडा करून एका अर्ध्या बाकाचा ताबा घेतला. अवघ्या दोन फूट अंतरावर एक तरुण आणि तरुणी गुजगोष्टी करीत होते. त्या दिशेची दखल न घेण्याचा मी कसून प्रयत्न करीत होतो. दोनचार मिनिटांतच प्रकरण असह्य झाले आणि आम्ही तिथून उठून उपाहारगृहाच्या दिशेने निघालो. दहापंधरा मिनिटांतच ते जोडपे तिथे आले. आमच्यासारखीच त्यांनी कॉफी मागवली, आणि 'अहो आश्चर्यम्'– कॉफी पिऊन झाल्यावर त्या इंग्रजी मदनाने आपल्या खिशातून सहा पेनी टिकवल्या आणि त्या इंग्रजी रतीने पर्समधून स्वतःच्या कॉफीचे बिल भागवले ! काही क्षणांपूर्वी वाहत्या तमसेच्या साक्षीने एकमेकांसाठी प्राण देण्याच्या भाषा करणारे ते प्रणयी युग्म दुसऱ्याच्या सहा पेनी द्यायला काही राजी नव्हते !

फेस्टिव्हल हॉल दोनएक हजार माणसांनी तुडुंब भरला होता. पण ही सारी माणसे कशी पावलांची चाहूल न लागू देता आपल्या जागी बसत होती. चारी बाजूंनी श्रोते बसतात आणि मधल्या मंचावर गायकवादक असतात. आम्ही पाचसात मिनिटे आधीच गेलो होतो. माणसे येत होती. द्वारपालिका त्यांना 'इत इतो भवान्' करीत होत्या. आमची तिकिटे पंधरा पंधरा शिलिंगाची असूनही आम्ही दुसऱ्या मजल्यावर होतो. काही वेळाने दिवे मंदावले आणि पिवळ्या फुलांनी सुशोभित केलेल्या मंचाच्या दिशेने यहुदी मेनुहिन आणि त्याची बहीण यांनी प्रवेश केला. यहुदी मेनुहिनची बहीण

आपल्या भावाला पियानोची साथ करते. प्रेक्षकांनी उठून उभे राहून मेनुहिनचे स्वागत केले. हा मान आपल्याकडे हल्ली फक्त राजकारणी पुढाऱ्यांनी राखून ठेवला आहे. त्यानंतरच्या दोन तासांत मेनुहिनने सारा फेस्टिव्हल हॉल तमसेच्या तीरावरून उचलून आकाशगंगेच्या काठी नेला. इंग्रजी संगीतातले मला काहीही कळत नसूनही त्या साऱ्या श्रोत्यांप्रमाणे मीही भारावून गेलो. अधूनमधून एखादी सुंदर स्वरमाला परिचयाची वाटून तोंडून एकदोनदा 'आहा' असे उद्गार आले. शेजारच्या साहेबाने मान वळवून पाहिले आणि मी उगीचच ओशाळलो. व्हायोलिन ह्या वाद्याला नाजूक स्वरवेलीपासून ते वादळापर्यंत काहीही उभे करता येते, हे त्या दिवशी मला कळले. आपल्याकडल्या व्हायोलिन वाजवणाऱ्यांच्या गजांची किचकिच अधिक ऐकू येते. हे वाद्य आम्ही वाजवले पण ओळखले नाही, असे मला वाटते.

एवढ्या विशाल स्वरमंदिरात मायक्रोफोनच्या मदतीशिवाय यहुदी मेनुहिन व्हायोलिन वाजवीत होता; पण स्वर न् स्वर स्वच्छ ऐकू येत होता. हा फेस्टिव्हल हॉल म्हणजे वास्तुशिल्पाने संगीतकलेला दिलेला मोलाचा नजराणा आहे. त्या हॉलचे वातावरण असे काही सुरेल की, सामान्याच्या हातूनदेखील असामान्य स्वरशिल्प निर्माण होऊन जावे. वास्तविक बाहेरून हा हॉल विमानांच्या हँगरसारखा दिसतो. अंतरीची कळामात्र निराळीच आहे. तिथल्या ऑर्गनच्या प्रचंड पाइप्स पाहून तो ऐकायची इच्छा बळावली, पण योग आला नाही.

यहुदी मेनुहिनचे व्हायोलिन ऐकताना स्वरांत न्हाऊन निघाल्यासारखे वाटले. मात्र अजाणत्या मनाला हे कळेना की, त्यात मेनुहिनच्या स्वरांचा परिणाम किती आणि फेस्टिव्हल हॉलच्या वातावरणाचा किती ! वास्तविक इंग्लंडमधल्या मुक्कामात इतकी नाटके पाहिली, किती नामवंत नटांचे कसब पाहिले, रंगभूमीवर थक्क करून टाकणारे देखावे पाहिले; पण अंतःकरणात उमटले आहे ते दृश्य मात्र त्या पिवळ्या फुलांच्या ताटव्यात काळा सूट घातलेला तो देखणा मेनुहिन, गुलाबी रंगाचा झगा घालून काळ्याशार पियानोच्या पांढऱ्या शुभ्र पट्ट्यांवरून लीलेने आपल्या गुलाबी

अंगुलीचे नर्तन करणारी त्याची बहीण आणि मागल्या बाजूला पार फेस्टि-




व्हल हॉलच्या तीनमजली छतापर्यंत पोचलेल्या ऑर्गनच्या त्या सोनेरी पाइप्स! त्या भव्य वास्तूतल्या गर्भागाराची ती किमया अद्भुत आहे! आयुष्यभर धन्य धन्य वाटावे, असे हे क्षण असतात. एडिंबराच्या किल्ल्यावरच्या बुरुजावर दूरवर काजळ्यासारखा अंधाराला हलवून गेलेला तो बॅगपाईप वाजवणारा हायलंडर, कालप्रवाहाखाली नेऊन गतीचा विसर पडायला लावणारा हा यहुदी मेनुहिन! हे कलावंत असंख्य अंतःकरणांच्या गुहांमधून अशी काही चित्रे काढून जातात की, त्या सामान्य गुहांना अजंठ्याचे वैभव प्राप्त होते! विसाव्याच्या क्षणी आपले आपणच आत डोकवावे आणि तृप्त व्हावे!

इंग्लंडमधला मुक्काम आटोपताना दुःख होत होते ते अशा अनेक थोर कलावंतांच्या कलादर्शनाला यापुढे मुकणार ह्याचे! ही माणसे काही निराळ्याच मातीची आहेत. युद्धकाळात आकाशातून बाँब बरसत होते. पण ओल्डविकमधले नाटक बंद नव्हते. तिथल्या एका नटाशी गप्पा मारीत होतो. मी म्हटले, "बाँबहल्ला होताना तुम्हांला भाषणं सुचत कशी होती?" तो म्हणाला, "छे छे — भाषणंबिषणं विसरत नव्हतो. फक्त ह्या शिंच्या बाँबगोळ्यांचा आवाज फार मोठा होत असे — आम्हांला संवाद ओरडावे लागत!" बस्स — बाँबविरुद्ध एवढीच कंप्लेंट!

समोरच्या मृत्यूला नाटक करून दाखवणारा हा इंग्रज! साक्षात

यमदूतदेखील साहेबाला उचलायला आधी अपॉइंटमेंट घेऊन, दारावरची घंटी वाजवून, आपल्या नावाचे कार्ड पाठवून — हॅट आणि छत्री कोपऱ्यातल्या स्टँडवर ठेवून येत असेल, आणि तो मिनिटभर आधी आला तर साहेबाचा बटलर त्याच्यापुढे मकाळचा टाइम्स टाकून मिनिटभर वाट पाहायला लावीत असेल !

थंडीचा कडाका वाढत होता. परंतु अजून हिमसेक मात्र सुरू झाला नव्हता. लंडनच्या मुक्कामात हवेचा तेवढाच एक चमत्कार पाहायचा राहिला होता. बाकी फॉग, स्मॉग आणि हवामानाच्या इतर लहरी भरपूर अनुभवल्या होत्या. त्यातल्या त्यात दाट धुक्याचा अनुभव एकदा लंडनच्या पोलिसाला आणि एका पोस्टाच्या पेटीला टकरावून घेतला होता. इंग्रज लोक ह्याला 'पी-सूप' धुके म्हणतात, म्हणजे कोकणातल्या गुळवणीइतके दाट धुके. (देशावरच्या मंडळींनी पिठल्याइतके दाट म्हणावे.) साऱ्या लंडनभर आंधळी कोशिंबीर चालते. रेल्वेचे एकदोन अपघात होतात. मोटारी रस्त्यांतून रांगायला लागतात. माणसे अंदाजाने पावले टाकतात आणि अशाच वेळी नाताळ येतो. मला नाताळ म्हटले की ओ. हेन्रीच्या त्या प्रसिद्ध कथेची आठवण होते. लंडनच्या प्रचंड दुकानांतून नाताळचे जंगी सेल सुरू झाले. नाताळाला आठदहा दिवस अवकाश होता, पण दुकाने गिऱ्हाइकांनी तुडुंब भरली होती. ऑक्सफर्ड स्ट्रीट, पिकॅडिली वगैरे लंडनच्या बाजारभागात तर गर्दी आवरायला खास पोलिस नेमले होते. त्यातल्या त्यात एखादा उजळ दिवस मिळाला की लोकांच्या उत्साहाला ऊत येई. बाकी अशा वेळी वाटते की माणूस ह्या प्राण्याच्या इतर सगळ्या व्याख्या



रद्द करून ‘ माणूस म्हणजे खरेदीत आनंद मानणारा प्राणी ’ एवढी एकच व्याख्या मंजूर करावी. दाढीवाला सांता क्लॉज पोरांना आवाहन करीत होता. ही परस्परांना द्यायच्या बक्षिसांची खरेदी एकमेकांना नकळत करायची. हे गुपित नाताळाच्या रात्री उघडे करायचे. सुंदर सुंदर बाहुल्यांना हेवा वाटावा अशी ही गुटगुटीत, सोनेरी, कुरळ्या केसांची इंग्लिश बालके आपले निळे निळे डोळे विस्फारून दुकानांतल्या काचांपलीकडला खेळ पाहताना पाहून मला तर आनंदाने गदगदून यायचे. सांता क्लॉज हा मुलांचा सगळ्यांत आवडता देवदूत! हा ख्रिसमसच्या रात्री घरांच्या धुराड्यांतून गुपचूप खेळणी ठेवून जातो. इंग्लंडच्या मुक्कामात मी निरनिराळ्या दुकानांतून



हिंडलो. सेल्फ्रिजिस, हाउन्सडिचसारखी प्रचंड दुकाने पाहिली. परंतु खेळण्यांच्या दुकानात हिंडण्यासारखा आनंद नाही. शेकडो मुले त्या पाच-पाचमजली खेळण्यांच्या दुकानांतली हजारो तऱ्हेची खेळणी अशा काही डोळ्यांनी पाहतात की आपण मुग्ध होऊन त्या चिमुकल्या डोळ्यांतल्या बाहुल्यांचा नाच पाहावा. पापण्यांची पाखरे काय भिरभिरतात, ओठांचे चंबू काय होतात, चिमुकल्या टाळ्यांच्या पाकळ्या काय उघळतात. एवढेच नाही, एकदा तर बॅटरीवर चालणारा खेळातला बँड सुरू झाला आणि चिमुकल्या गिऱ्हाईक-मंडळींनी त्या दुकानांतच सांघिक नृत्य सुरू केले. लाजरीबुजरी पोरेदेखील दोनचार मिनिटांत त्या दंग्यात सामील झाली. ही खेळणी विकणाऱ्या पोरीही चतुर. त्यांना ह्या चिमण्या गिऱ्हाइकांना

गुंगवण्याची कला जमलेली असते. मग त्याही मुलांत मूल होऊन जातात.

आमच्या आयुष्यात दुर्दैवाने खेळणेच आले नाही. लहानपणी नाही म्हणायला बाहुलाबाहुलीच्या लग्नाचे खेळ खेळलो आहे. पण भूमिका दोन — एक, भटजी आणि दुसरी, सनईवाला ! ! मला भटजीची नक्कल



फार लहानपणी यायला लागली; आणि नाकपुड्या चिमटीत धरून सनई वाजवता येत असे. त्यामुळे बाहुलाबाहुली कशीही असेना, भटजीला आणि सनईवाल्याला त्याचे काय, अशा भावनेने त्या खेळण्याकडे आम्ही पाहिले. त्यातून आमच्या लहानपणी ज्यांना बाहुल्या म्हणत, त्या पदार्थांचे वर्णन काय करावे! एका लाकडी ओंडक्यावर पिवळे-तांबडे-हिरवे रंग असत. हात अंगाला चिकटलेले असत. डोक्यामागून पाठीच्या खाली पायापर्यंत एकच एक सपाटी असे. ही बाहुली टेकूशिवाय उभी राहिली नाही आणि आयुष्यात खाली बसली नाही. तिचा उपयोग खेळणे, खिळे ठोकणे किंवा जात्याचा खुंटा बसवणे अशा विविध प्रकारे केला जाई व ही बाहुली पिढीजात टिकत असे. मुलींना निदान बाहुली होती. मुलांना फक्त मैदानी खेळ ! साऱ्या आळीत एखाद्या मुलाकडे क्रिकेटची बॅट असे; आणि त्याचे "तीनदा आऊट झाल्यास एकदा आऊट" असे कोष्टक असायचे. हे निमूटपणे मानण्यावाचून गत्यंतरच नसायचे. इंग्रज पोरांच्या भाग्याचा हेवा वाटला. अर्थात हल्ली आपल्याकडेही खेळण्यांकडे लक्ष जायला लागले आहे. पण बाहुल्या मुलींना खेळायला देण्याऐवजी आईच त्यांचे प्रदर्शन मांडून

त्यांच्यावर लेख वगैरे लिहिताना अधिक आढळते. अशा वेळी मुलींची आणि त्या मुक्या बाहुल्यांची दया येते. बाहुल्या पोरींच्याच हाती सोपवाव्या. कपाटातल्या बाहुल्या अगदी नव्या कोऱ्या असल्या तरी करुण वाटतात. माझ्या एका मित्राच्या मुलीने परवाच माझी आपल्या सहा मुलींशी ओळख करून दिली. त्यांची अवस्था पाहून त्या पोरींची लग्ने कशी होणार, याची काळजी मला लागली. सहांपैकी एकही हातीपायी धड नव्हती. रंग उडालेले, हात ढिले झालेले, पाय तुटलेले अशा अवस्थेतल्या त्या तिच्या 'सहा पोरी' आम्हांला तशा वाटत होत्या. पण आईसाहेब खूष होत्या. 'रोज संध्याकाळी त्यांची लग्नं होतात' हीदेखील बहुमोलाची माहिती मला मिळाली. बाकी इंग्रज पोरीदेखील आपल्याच मुलींसारख्या त्या बाहुल्यांचे धिंडवडे करतात. छान सुबक बाहुलीचा ह्या पोरींना हेवा वाटतो की काय कोण जाणे. तिला एकदा मातीत लोळवून विद्रूप केली की मगच प्रेमाचे खरे भरते येते. बाकी नाताळात केवळ मुलेच नव्या खेळण्यांनी खेळतात असे नाही. बच्चा, बच्चेका बाबा आणि आईदेखील मुलांत मूल होऊन खेळतात.

परदेशातला हा नाताळ एखाद्या पाश्चात्त्य कुटुंबात साजरा करावा, अशी माझी फार इच्छा होती. परंतु ख्रिसमस सुरू होण्याच्या सुमाराला लंडनमधला मुक्काम हलवून पॅरिसला जावयाचे होते. पॅरिसमध्ये माझे मित्र माधव आचवल यांखेरीज माझ्या ओळखीचे कोणीही नव्हते आणि जनरल द गॉलखेरीज दुसऱ्या कुठल्याही फ्रेंच रहिवाशाचे मला नावही ठाऊक नव्हते. परंतु फ्रान्समध्ये नाही तर जर्मनीत अचानकपणे एकाच नव्हे तर पाचसहा कुटुंबांत नाताळ साजरा करण्याचा योग आला. आचवलांचे बंधू गेली दोनतीन वर्षे जर्मनीत उच्च शिक्षणासाठी राहिले होते. त्यांचे आमंत्रण आले आणि ख्रिसमसच्या आधी आम्ही लंडन सोडले. आता लंडनचा आमचा ऋणानुबंध संपला होता. पॅरिसचा दोन महिन्यांचा मुक्काम आटोपल्यावर परत फक्त दोन दिवसांसाठी लंडनला येऊन हिंदुस्थानात परतण्यासाठी बोट पकडणार होतो.

लंडन ते पॅरिस विमानाने दीडदोन तासांत पोचता येते. पॅरिसच्या

विमानतळावर आल्यावर सारा व्यवहार करपल्लवीत सुरू झाला. माधव आचवल आमच्या आधी काही महिने पॅरिसला येऊन राहिले होते. त्यामुळे त्यांना फ्रेंच शब्द, काही आवश्यक वाक्ये आणि दुकानदारांना समजणाऱ्या खुणा यांचे ज्ञान झाले होते. ब्रोशा नावाच्या पॅरिसच्या भागात एका खाजगी हॉटेलात ते राहत होते. त्यांच्याच शेजारी आम्हांलाही खोली मिळाली. तिथे एक रात्र मुक्काम करून लगेच आम्ही आगगाडीने जर्मनीतल्या क्रेफेल्ड शहरी जायला निघालो. भोवताली सारे पॅरिस पसरले होते. पण तूर्त ह्यातले काही म्हटल्या काही पाहायचे नाही, असा निश्चय करून आम्ही पॅरिस सोडले. पहाटे आमची आगगाडी जर्मनीच्या दिशेला निघाली. गार दु नॉर्द हे पॅरिसमधले बोरीबंदरसारखे भव्य पण काळोखे स्टेशन आणि शेवटी संध्याकाळी आलेले क्रेफेल्ड स्टेशन यांपलीकडे ह्या प्रवासात काहीही समजले नाही. आजूबाजूचे प्रवासी फ्रेंच भाषेत बोलत होते. बहुतेक मंडळी आपल्याकडे मुंबईहून होळी-दिवाळीला माणसे आपल्या खेड्याकडे जातात तशी नाताळाला निघाली होती. वाटेत बेल्जमची सीमा ओलांडताना दोनतीन धिप्पाड लष्करी अंमलदार डब्यात शिरले. त्यांनी आमचे पासपोर्ट पाहिले. ट्रँझिट व्हिसा असल्याची खात्री करून घेतली.

त्यांतल्या एकाने आमच्याकडे हिंदी नाणी काय आहेत याची चौकशी केली. सुरुवातीला आम्हांला काही कळेना. शेवटी त्यानेच मोडक्यातोडक्या इंग्रजीत समजावून सांगितले. आम्ही त्याला हिंदी नाणी दाखवली. ती घेऊन त्याने त्याच्या बदली आम्हांला बेल्जमची नाणी देऊ केली. आम्ही बिस्किटांच्या बशीतले, शिष्टाचार म्हणून एकच बिस्किट उचलतात तसे एकच नाणे उचलून आमची नाणी त्याला बक्षीस दिली, आणि त्याला 'हॅपी ख्रिसमस' केला. हे सगळे प्रकरण नीट लक्षात येईपर्यंत माझी उगीचच बोबडी वळली होती. जर्मनीला जाताना वाटेत मॅजिनो की सिगफ्रीड अशी कुठली तरी भिंत लागते, असे उगीचच कुणी तरी सांगून आम्हांला उचकून दिले होते. त्यामुळे दिसेल त्या पडक्या भिंतीला मॅजिनो आणि सिगफ्रीड ठरविण्याच्या भानगडीत वेळ बरा गेला. पुढे कुणी तरी मला ह्या दोन्ही लायनी जमिनीखालून गेल्या होत्या, असे सांगून संपूर्ण निराश केले.

बाकी जर्मनी म्हटले की आपल्या डोळ्यांपुढे फक्त हिटलर आणि युद्ध उभें राहते. क्रेफेल्ड शहरात आम्ही प्रवेश केला त्या वेळी हे शहर युद्धात संपूर्ण जमीनदोस्त झाले होते, ह्या घटनेवर विश्वास बसेना. इथे एका कुटुंबाने चालवलेल्या एका खाजगी हॉटेलात आम्ही उतरलो. एका प्रसन्न चेहऱ्याच्या व्हिक्टोरिया राणीसारख्या दिसणाऱ्या प्रशस्त म्हातारीने आमचे स्वागत केले आणि घटकाभरात सारे कुटुंब आमच्याभोवती जमले. माधवचा भाऊ पंडित त्यांच्याशी अस्खलित जर्मन भाषेत बोलत होता, आणि आम्ही कोर्टात खडाखड इंग्रजीत बोलणाऱ्या वकिलाच्या चेहऱ्याकडे खेड्यातले शेतकरी पक्षकार ज्या कौतुकाने पाहत असतात, तसे पाहत उभे होतो. जर्मन भाषेत केवळ लष्करी हुकूम असतील, अशी आमची कल्पना.




पण जर्मन बायकांत अशा प्रसन्नवदना सुंदरी आणि भाषेत आणि वागण्यात असा जिव्हाळा असेल, असे स्वप्नातदेखील वाटले नव्हते. तेवढ्यात जवळ जवळ अर्धा डझन कुटुंबांतून पुढल्या पाचसहा दिवसांतील भोजनाची आमंत्रणे आली. पंडित आचवलच्या कॉलेजातले प्रोफेसर्स आणि इतर

सहाध्यायी यांनी आमचा जो पाहुणचार केला त्याची फक्त वऱ्हाडी अगत्याशीच तुलना करता येईल. आमच्या लँडलेडीने आपल्याकडल्या बायका सजवलेली गौर ज्या आस्थेने दाखवतात त्या आस्थेने 'क्रिसमसट्री' आम्हांला दाखवली. तिचा मुलगा, लेकी, सुना, नातवंडे यांनी घराला लग्नघराची शोभा आणली होती. जर्मन माणूस कमालीचा कौटुंबिक आहे. घरात पोरांचा दंगा चालू आहे — सासूबाईंच्या भोवती भोवती सूनबाई नांदताहेत — म्हातारीच्या डोळ्यांतून आपल्या सुंदर आणि कामसू सूनबाईचे कौतुक ओसंडत आहे — हे दृश्य पाहिल्यावर पुन्हा भारतात आल्यासारखे वाटले. इंग्रजांच्या बेतशुद्ध पाहुणचारापुढे तुलनेने हे जर्मन अगत्य भलतेच आकर्षक वाटले. वास्तविक त्या हॉटेलात आम्ही पैसे देऊन राहत, जेवत होतो. परंतु 'काय हवे, काय नको' ते काळजीने पाहण्याचा प्रकार इंग्लंडात जवळ जवळ आढळला नाही. इथे रहायच्या खोल्याही सुंदर; सगळी घरे आतून गरम आणि उबदार केलेली. दहा-बारा वर्षांपूर्वी जिथे अक्षरशः राखरांगोळी झालेली, त्यातून फिनिक्स पक्ष्यासारखा पुन्हा उठलेला हा जर्मनांचा देश पाहून आदर दुणावतो.

ष्मिड कुटुंबात जेवायला गेलो होतो. फ्रांझ आणि इल्मा हे जोडपे दृष्ट लागण्यासारखे. फ्रांझ खट्याळ आणि इल्मा शांत पण विलक्षण लाघवी. इथेच आमची व इतर जर्मन मंडळींची ओळख झाली; आणि पुढल्या आठ दिवसांत आम्ही सारेजण जन्मजन्मांतरीचे सोबती असल्यासारखे वावरलो. विशेषतः म्हातारा 'आबिल' आम्हांला इथे भेटला. जर्मनीने आम्हांला घडवलेले आबिल हे माणसाचे अत्यंत हृदयंगम दर्शन. वास्तविक आबिलचे नाव आबिल नाही. त्याचा चिमुकला नातू त्याला आबिल म्हणतो. त्याचे नाव अर्स्ट एनगेलर! पंडित आचवलच्या भव्य प्रयोगशाळेतल्या सुतारखात्याचा हा प्रमुख आहे. जर्मन माणसे फार भव्य आणि धिप्पाड असावीत, अशी आपली उगीचच कल्पना! म्हातारा 'आबिल' उद्या गोरेगावकराच्या चाळीत रहायला आला आणि धोतरात हिंडू लागला तर बंडोपंत गोगटे किंवा जनूभाऊ दामले वगैरे नावाने सहज खपेल. हा उत्तम चित्रकार आहे. त्याची स्वतःची शैली आहे आणि त्याहूनही विशेष म्हणजे हा

चांगल्यापैकी संगीतज्ञ आहे. त्याच्या घरी सुमारे हजार, दीड हजार रेकॉर्ड्सचा संग्रह आहे. मला पाश्चात्त्य संगीतातले काही कळत नाही. हे ऐकल्यावर तो चक्क व्याकूळ झाला; आणि एके दिवशी संध्याकाळी सात वाजल्यापासून पहाटे चार वाजेपर्यंत त्याच्याकडून पाश्चात्त्य संगीतातले मर्म समजावून घेण्याचा आणि भारतीय संगीताशी त्याचा परिचय करून देण्याचा खटाटोप केला. त्याची आणि आमची भाषा एक नव्हती. पंडित आचवल आमचा दुभाषी! फ्रांझ हा उत्तम फोटोग्राफर. त्याचे रंगीत फोटो पाहण्यात रात्र कशी गेली कळली नाही. हे जर्मन लोक विलक्षण कलासक्त. संगीत तर बियरसारखे त्यांच्या रोमारोमांत भिनलेले. आबिलला खूप काही बोलायचे असे. आम्हांला त्याची भाषा येत नव्हती. मग तो उगीचच आम्हांला आमच्या नावाने हाका मारायचा. 'देशपांडे' ह्या शब्दाचा इतका स्वच्छ उच्चार पाश्चात्त्य देशात एकदाच झाला! त्या पाचसहा रात्री आम्ही त्या जर्मन मंडळींबरोबर ज्या आनंदात काढल्या, त्याचे स्मरण आजन्म राहील.

क्रेफेल्ड शहर टुमदार आहे. तिथून डुसलडॉर्फ हे पाचसहा मैलांवर असेल.एक ट्रामवजा गाडी डुसलडॉर्फ ते क्रेफेल्ड येत जात असते. डुसलडॉर्फ शहर प्रचंड आहे. ऱ्हाईन नदी शहरामधून वाहते आहे. तिथल्या एका बॉंबहल्ल्यात अर्ध्याहून अधिक निखळलेल्या म्युझियममध्ये आम्ही एक सुंदर चित्रकलाप्रदर्शन पाहिले. मात्र सारी शहरे आता सारखीच दिसायला लागली. युद्धकाळानंतर उद्ध्वस्त झालेल्या शहरांतून ही जी नवी शहरे उठली त्यांचे शिल्प आता अमेरिकन ढंगाचे आहे. घरांना देशोदेशींच्या संस्कृतीचे लेणे राहिले नाही. असल्या इमारती आता आपल्याही देशात आल्या. मुंबईतल्या फोर्ट विभागातल्या नव्या इमारती आणि या परदेशी इमारती ह्यांच्यात फरक नाही. देशोदेशींचे पेट्रोल पंप जसे सारखे, तशाच ह्या नव्या इमारती. जुनी जर्मन इमारत औषधालाही आढळली नाही. इंग्लंड, अमेरिका, रशिया, — सगळ्यांच्या बॉंबहल्ल्यांखाली ह्या इमारती भुईसपाट झाल्या. हिटलरने गावागावांत बालेकिल्ले बांधले होते. त्यांच्या आसऱ्याला माणसे जायची. ते बालेकिल्ले मात्र अजूनही उभे आहेत. हिटलरच्या

जमान्याची तेवढी एकच खूण ! बाकी आम्ही सुज्ञपणे हिटलर आणि नाझी यांच्याविषयी अक्षरही बोलायचे नाही, असे ठरविले होते; पण परिचय वाढल्यावर धिटाई आली आणि एके दिवशी मी विचारले, " हिटलरमध्ये अशी काय जादू होती म्हणून तुम्ही त्याच्यामागे गेला ? " चटकन एक वृद्ध जर्मन गृहस्थ म्हणाला, " ते आमच्या इतिहासातलं तमोयुग आहे. आपण त्याबद्दल न बोलणं बरं ! " त्याच संभाषणातला एक भाग मला आठवतो. बॉम्बिंगबद्दल बोलणे चालले होते. फ्रांझ म्हणाला, " क्रेफेल्डवर बाहात्तर तास बॉम्बिंग झालं. आम्ही बालेकिल्ल्यात लपलो होतो. तीन दिवसांनी बाहेर आलो. आत शिरताना घडलं तेच त्या क्रेफेल्डचं शेवटलं दर्शन. बाहेर आल्यावर पाहिले ते जळणाऱ्या घरांचे ढिगारे. मी लहान होतो. मला एकाच गोष्टीचा आनंद झाला —आमची शाळा पार जळून खाक झाली होती ! "

अशा या मातीच्या ढिगाऱ्यातून – राखेतून – जळत्या सामानासुमानातून पराजयाची नामुष्की डोक्यावर घेऊन ही जर्मन माणसे वर आली. जर्मन मजूर आजदेखील सकाळी सात वाजता काम सुरू करतो. गेली दहा वर्षे ही माणसे राबराब राबली. आज नवा जर्मनी उभा आहे. जीवनावर अमेरिकेचा ठसा आहे. बेटोव्हनच्या देशात रॉक अँड रोलने धुमाकूळ घातला आहे. पण आत कुठे तरी डॉयशलँडचा अभिमान जिवंत आहे. जर्मन बियरचा अभिमान आहे. मोझेल-काठच्या द्राक्षांचे मळे पुन्हा त्याच जोमाने फुलायला लागले आहेत. अठरा अठरा वर्षांची पोरे कारखान्यांचे विभागचे विभाग सांभाळू लागली आहेत. दुकानांतून नवा नवा जर्मन माल भरून वाहतो आहे. बाजारपेठांवर परत आक्रमण सुरू झाले आहे. जर्मन मार्कला पुन्हा प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे. हे पाहिले की अचंबा वाटतो. जर्मन माणूस राबणारा जबर, पण म्हणून तो रुक्ष नाही. अतिशय रसिक आहे. संगीताचे त्याला वेड आहे. पुन्हा ते शेकडो वादकांचे ताफे उभे राहिले आहेत. घरोघरी टेलिव्हिजन गेला आहे. बिचारे विजेते इंग्लंड अजून कष्टाने डोके वर काढते आहे. आणि पराभूत जर्मनी पुन्हा केवळ उभा नव्हे तर चांगला सुस्थित होऊन उभा आहे.

नव्या वर्षाचे स्वागत आम्ही जर्मनीत केले. एकतीस डिसेंबरला हे लोक सिल्व्हेस्टर साजरा करतात. म्हणजे नाचगाणे आणि बियर पिणे ह्यात रात्र जागवून रात्री बारा वाजता फटाके लावून, दिवे उजळून, नव्या वर्षाचे स्वागत करतात. क्रेफेल्डमधल्या एका हॉटेलमध्ये फ्रांझ, आबिल वगैरे मंडळींनी एक सुसज्ज तळघरच्या तळघर रिझर्व केले होते. केंगेल हा जर्मन लोकांचा आवडता खेळ! आपल्या छोट्या मुद्गलासारख्या जोड्या उभ्या करून एका जड चेंडूने त्या नेमक्या पाडायच्या! एकूण आठदहा जोडपी होती. वर हॉटेलात नृत्यगायनाला आणि मद्यसेवनाला ऊत आला होता. तळघरात आम्ही दंगा चालवला होता. त्या तळघराने कदाचित प्रथमच मराठी गाणी ऐकली असतील. तेवढ्यात फ्रांझ आत गेला आणि क्षणार्धात हिटलरसारख्या मिश्या लावून आणि कपाळावर केस ओढून आला आणि त्याने हिटलरची नक्कल केली. त्याखेरीज अनेक खेळ झाले. फटाके उडाले; आणि बियर तर ही मंडळी पाण्यातल्या माशासारखी पितात! इतक्यात साऱ्या क्रेफेल्डभरची चर्चेस बाराच्या ठोक्यांनी निनादली, आणि त्यानंतरच्या दृश्याने मात्र मी गहिवरलो. आमच्यांतल्या वृद्ध जोडप्यांनी आपल्या मुलांना आणि सुनांना पोटाशी धरले, त्यांची चुंबने घेतली आणि 'चिरंजीव व्हा' अशासारखा जर्मन भाषेत आशीर्वाद दिला. इल्माच्या सासूने आपल्या सुनेला अशा प्रेमाने कुरवाळले की, ती लाजून लाल झाली. त्या लाजण्याचे कारण मी हिंदुस्थानात परतल्यावर कळले. इल्माच्या घरी पहिला पाळणा हलणार होता!

आम्ही सगळेजण रस्त्यात धावत आलो. आकाशात नक्षत्रांशी स्पर्धा करणारे दारूकाम उडत होते. आमच्या मित्रमंडळींनीदेखील ही सामग्री आणली होती. सारा रस्ता गजबजला होता. तरुणतरुणीच काय, पण सत्तरीतले म्हातारे आणि म्हाताऱ्या मुक्त आनंदाने नाचून नव्या वर्षाचे स्वागत करीत होत्या. म्हातारा आबिल बियरचे प्याले भरभरून वाटत होता. खाण्यापिण्यात आणि नाचण्यात नव्या वर्षाची पहाट फुटली. आमच्या मित्रमंडळींत लू होती. लू एका प्राध्यापकाची पत्नी. अतिशय देखणी. तिच्यावर सगळ्यांनी हल्ला केला आणि कॉफी पाजण्याचा आग्रह झाला.

मग पहाटे पाच वाजता ल्ह्च्या घरी आम्ही कॉफी प्यालो. तेवढ्यात मी हिंदू ज्योतिष्याचा अवतार आणून सर्वांचे हात पाहिले. सगळ्यांना मी सांगितलेले भूत पटले आणि भविष्य खरे ठरण्याची ते वाट पाहात असतील. अर्थात हा परिणाम डोर्ट मुंडर बियरचा होता. एरवी माझे हस्तसामुद्रिकाचे ज्ञान ' स्वयंवरा 'तल्या दिनेश्वरापेक्षाही हातभर मागेच आहे.

सकाळी आठची गाडी पकडून पॅरिसला यायचे होते. पहाटे आमच्या ह्या जर्मन मित्रमंडळींचा आम्ही निरोप घेतला. म्हाताऱ्या आबिलने आम्हां दोघांचे हात आपल्या हातात घट्ट धरले आणि जर्मन भाषेत गहिवरून तो काही तरी बोलला. मी पंडितला अर्थ विचारला. आबिल म्हणत होता— " कुठल्या दूर देशाची माणसं तुम्ही — मला तुमची भाषादेखील बोलता येत नाही — गेल्या आठ दिवसांची आपली ओळख — मग तुम्ही जाताना मला असं भरून का येतं ? " मी पुटपुटलो — " भावस्थिराणि जनना-न्तरसौहृदानि ! "

नव्या वर्षाची ती पहिली पहाट ! रात्र जागवून सारे क्रेफेल्ड झोपले होते. आम्ही आमच्या बॅगा घेऊन स्टेशनच्या दिशेने निघालो होतो. पाय जड झाले होते. डोळेही जड झाले होते — आणि अंतःकरणही ! ह्या जर्मन लोकांनी प्रचंड द्वेषाचा केवढा डोंब उभारला होता; आणि ही जर्मन मंडळी आम्हांला भरल्या डोळ्यांनी सांगत होती — " पुन्हा या — पुन्हा या — लवकर या. " आम्ही त्यांना सांगत होतो — " आमच्या देशात या — ताज पाहा — गंगा पाहा — अजंटा-एलोरा पाहा —"

ह्या चिमण्या क्रफेल्ड गावाने आणि त्या जर्मन मंडळींनी मनात कुठे तरी घर केले खरे ! कदाचित गाव लहान म्हणून असेल; अजून प्रचंड शहराचा माणसामाणसाच्या वागण्यातला अलिप्तपणा ह्या क्रेफेल्डमध्ये आला नाही. कुठे तरी जुन्या जगातले संस्कार इथे रेंगाळताना आढळतात. दर पंधराव्या मिनिटाला गावातल्या साऱ्या चर्चच्या घंटा घणघणतात.

फ्रांझच्या घरी भिंतीवर मेणबत्त्या ठेवायचा स्टँड होता. माझ्या पत्नीने त्या चिमुकल्या पितळी स्टँडचे कौतुक केले आणि हा कुठे मिळतो, अशी चौकशी केली. फ्रांझच्या घरचे जेवण आटपून रात्री दीडदोनच्या सुमाराला

निघताना इल्माने गुपचूप एक पाकीट माझ्या पत्नीजवळ दिले. त्यात तो स्टँड होता. मला जुन्या जमान्याची आठवण झाली.

एका म्हाताऱ्या फळवालीच्या दुकानात फळे घेतली. तिचे पैसे दिले आणि आम्ही दुकानाबाहेर पडलो. तेवढ्यात ती म्हातारी आम्हांला थांबा म्हणाली, आणि एका बरणीतून चॉकलेट काढून तिने माझ्या पत्नीला दिले. आमच्या दुभाषीबुवांनी विचारले, "हे काय?" म्हातारी म्हणाली, "आपल्या गावात ही मुलगी पाहुणी आली आहे, तिला छोटं बक्षीस!"

नव्या वर्षाची ती सिल्व्हेस्टर साजरी करताना सहज चाळा म्हणून आमच्या सौभाग्यवतीने तांबड्या टिकल्या, लिपस्टिक वगैरेंच्या साहाय्याने साऱ्या जर्मन बायकांच्या कपाळाला कुंकू लावले. फ्रांझच्या म्हाताऱ्या आईला तर चांगले ठसठशीत कुंकू लावले, आणि आमच्या हिंदू सौंदर्यदृष्टीला त्या गौरांगना अधिकच सुंदर दिसायला लागल्या.

क्रेफेल्ड भरमसाट वाढते आहे. उद्या ते शहर डुसलडॉर्फएवढे प्रचंड होईल. अधिक सुबत्ता येईल, भरभराट होईल. आज घरोघरी टेलिव्हिजन आहे, उद्या खोलीखोलीत जाईल. भीती वाटते, हे सारे होताना सध्याचा जिव्हाळा ह्या नव्या प्रचंड इमारतींखाली चेंगरून जाईल की काय ह्याची!

नव्या वर्षाचा प्रारंभ मात्र लक्ख उन्हाने झाला होता. क्रेफेल्डहून पॅरिसला येताना आम्ही अर्धा युरोप ओलांडला. सगळीकडे छान सूर्यप्रकाश होता. आदल्या रात्रीच्या जागरणाने आमचे डोळे मात्र पेंगले होते. रात्री आमची गाडी पुन्हा पॅरिस शहरात पोचली, आणि यापुढे दोन महिने हे अनोळखी पॅरिस आपले स्वागत कसे काय करते, याच्या चिंतेत आम्ही आमच्या होतेल-द-ला-गारमधल्या खोलीत शिरलो. आमच्या सुदैवाने इथली लँडलेडी आणि दिवसभर ओठात सिगरेटचे पेटते थोटूक नाचवणारा तिचा नवरा ही भलतीच प्रेमळ निघाली.

फ्रेंच भाषेची तुलना करायची झाली तर शँपेनशीच करावी लागेल. ही भाषा बाटलीतून ग्लासात ओतल्या जाणाऱ्या शँपेनसारखी खळखळते – फसफसते – जिभेच्या शेंड्याशी सारखा लडिवाळपणा करीत असते. मात्र ही केवळ जिभेने बोलायची भाषा नाही. ती डोळ्यांनी, भिवयांनी, मानेने आणि हातापायांनी बोलायची भाषा आहे. फ्रेंच ' मेर्सी ' या शब्दाचा पॅरिसमधल्या रमणींच्या तोंडचा उच्चार ऐकण्यासाठी केवळ पॅरिसला जावे. आभारप्रदर्शनाचा हा शब्द पॅरिसमध्ये सीन नदीच्या लहरीइतक्या वेळा उच्चारला जात असेल, पण त्या शब्दाचा ताजेपणा हा सदाफुलीसारखा आहे. इंग्रजांचे ' थँक यू ' त्या मानाने भलते थंड वाटायला लागते. बाकी बाँजू, सिल्वूप्ले, पारदाँ, आरव्हा मॉसिय मदाम — यांसारखे शब्द लिहायला देवनागरी लिपीच काय, पण कोणतीही लिपी असमर्थ आहे. इंग्लिश ' पार्डन 'च्या जातीचा हा फ्रेंच ' पारदाँ ' आहे खरा. पण ह्यातला ' र ' हा ' र 'पेक्षा ' ख 'च्या जवळ जातो. ' पाखदाँ ' यासारखा उच्चार होतो. त्यात पुन्हा ती मानेची हालचाल, ते विशिष्ट स्मित, ते हात हवेत

फेकणे आणि खांदे उडवणे! त्यामुळे फ्रेंच भाषा शिकणे हे मला तर भरतनाट्यम् शिकण्याइतके अवघड वाटले; आणि फ्रेंच भाषा आल्याखेरीज पॅरिसमध्ये रहायचे म्हणजे चोंदल्या नाकाने सुगंध्याच्या दुकानात बसण्या-पैकी प्रकार होता. पॅरिसमध्ये सगळ्यांत पाहण्यासारखे काय असेल तर ही फ्रेंच भाषा! फ्रेंच मनुष्य होय म्हणायला 'उई' म्हणतो — नकळत सुई टोचल्या-वर आपण एकदम 'उई' म्हणू तसे. पण त्याचे नुसते एकदा 'हो' किंवा 'उई' म्हणून समाधान होत नाही. किमान पक्षी दहा वेळा 'उय् उय् उय्' करावे तेव्हा एकदा 'होय' असे ठरते, आणि पंधरा वेळा 'नू नू नू नू' केल्याशिवाय 'नाही' हे सिद्ध होत नाही. ही फ्रेंच माणसे बोलताना इतके हातवारे का करतात कोण जाणे! आपल्याकडे गोव्याच्या कोकणीत हा आविर्भाव आहे! "कितें सांगूं तुका सायबा — ह्मण म्हळ्यार् अशें सुरभूस जाल्लें म्हण सांगूं —" अशी सुरुवात करून जेव्हा जातिवंत गोमंतकीय माशाच्या दाट कालवणाचे वर्णन सुरू करतो, तेव्हा त्याच्या त्या कोकणीला फ्रेंच भाषेचा स्वाद येतो. त्याचेही हात — भिवया — नाकडोळे तसेच उडतात. ही फ्रेंच माणसे खूप बोलतात. ही भाषाच तशी आहे. ही माणसे आधीच भोगवादी — शब्ददेखील भोगतात! इतक्या चवीने बोलणारी माणसे मला आपल्या देशात फक्त गोव्यात आढळली. आपल्याकडे एखादी भाषा तोंडात चणे उडवल्यासारखी बोलली जाते, तर एखाद्या भाषेची जिभेत टाईपरायटरची शाईची पट्टी ठेवून खटखट केल्यासारखी पद्धत. एखाद्या भाषेच्या चंचीतून सुपारीची खांडे, चुना, तंबाखू शोधून शोधून हातात



द्यावी तसा वाक्ये पुरी करण्याचा नबाबी ढंग. एखादी भाषा रुजाम्यावरून चाल बांधलेली पावले टाकीत येते. पण फ्रेंच भाषेसारखी शब्दांची कारंजी उडवणारी भाषा नाही. इटालियन भाषा गोड खरी — अगदी जलतरंगाच्या भांड्यासारखी वाजते. त्या भाषेला नुसताच नाद आहे, फ्रेंच भाषेला असलेली कथकच्या बोलासारखी नर्तन करीत येण्याची शक्ती नाही. दोन महिने पॅरिसमध्ये राहिलो, पण या भाषेने ओळखीचे स्मितदेखील केले नाही. ठेंगू माणसाने उड्या मारीत दांडीवरचे धोतर ओढावे, तसे माझे फ्रेंच शब्द आत्मसात करण्याचे प्रयत्न चालले होते. पण या भाषेतल्या काही शब्दांच्या स्फोटक सामर्थ्यापुढे नमून 'फोर्मिदाब्ल ! फोर्मिदाब्ल !' म्हणून हात उडविण्यापलीकडे काही म्हटल्या काही जमले नाही. या भाषेतले काही शब्द खरोखरीच थक्क करतात. 'वाला !' हे उद्गारवाचक अशांपैकी एक आहे. हा 'वाला' म्हणजे वा, छान, बरं आहे, अरेच्या, काय म्हणता, घ्यायला, शाबास, चला सुटलो — अशी असंख्य रूपे धारण करतो.




फ्रेंच दुकानात दोन आण्यांची वस्तू खरेदी करायला वर आणखी पंचवीस शब्द खर्चावे लागतात. आधी 'बाँजू मसियेऽऽदाऽऽम–'. मग आम्ही 'बौंजू मदाम' करायचे. मग आठदहा सिल्वूप्ले — मग दहाबारा 'उई उई उई' — मग 'मेर्सी मसियेऽ ऽ दाम' — मग पुन्हा ती वस्तू 'त्रे बाँ' असल्याची पावती — मग

दुकानदारीणबाईंचे पुन्हा ' मेर्सी '— मग ' क्यात्र व्हां सँक ' वगैरे पैशांचा हिशोब. मग पुन्हा एकदा ' आर व्हा मदाम ', ' आर व्हा मसिये ', ' आर व्हा मदाम ' हे सारे फ्रेंच सूक्त म्हटल्याखेरीज गतीच नाही. अर्थात आमचे फ्रेंच अगदी बालबोध होते. वस्तूवर बोट ठेवायचे आणि पंजाने ' किती पैसे ? ' अशी खूण करायची. एखादे वेळी दुकानात हवी ती वस्तू दिसत नसे. एकदा मला दुधाची बाटली हवी होती. मी घरून दुधाला फ्रेंचमधे काय म्हणतात ते घोकत गेलो होतो आणि दुकानात शिरताच त्या फ्रेंच पोरीच्या ' बाँजू मोसिये 'च्या स्वागताने साखरेसारखा विरघळलो. दुधाला काय म्हणतात ? शेवटी एका कागदावर माझ्या ड्रॉइंगमास्तरांचे स्मरण करून गाय काढली. माझे आणि ड्रॉइंगचे बालवैर ! बोडस मास्तरांनी नेहमी म्हणावे, " पुर्ष्या, एक रेघ सरळ ओढशील तर काय मरशील ? " त्यांची कृतज्ञतापूर्वक आठवण झाली. गाय काढली कसली ? साक्षात गोहत्याच ती ! त्या पोरीच्या डोक्यात काही प्रकाश पडेना. बरे, हल्ली विजेच्या यंत्राने गायीचे दूध काढतात हे वाचलेले. त्यामुळे दूध काढायची ' ॲक्शन ' देखील निरुपयोगी. शेवटी त्या गायीच्या आचळातून नळी काढून एका बाटलीच्या चित्रात बुडविली आणि बाटली-भोवती वर्तुळ काढले; आणि ' ओले — ओले ' किंवा असेच काही तरी ओरडत त्या पोरीने दुधाची बाटली पुढे केली. त्या थंडीतही मी घाम टिपला. ते चित्र पुढेमागे



पॅरिसच्या ' लूव्र ' मध्ये लागण्याचा संभव आहे. कारण ती गोमाता त्या पोरीकडेच ठेवून मी दुकानातून पळालो. पुन्हा केव्हाही त्या दुकानात गेलो की ती तरुणी असे काही छद्मीपणाने हसायची की, मी तिची जिरवण्यासाठी म्हणून पाचसहा फ्रेंच वाक्ये मराठीतून लिहून घेऊन तिला धडाधड म्हणून दाखवली. पण माझे अस्खलित फ्रेंच तिला कळले नसावे. तिने प्रत्युत्तर म्हणून एक दुधाची बाटली, एक तांदळाची पिशवी आणि एक बूट पॉलिशाची डबी माझ्यापुढे ठेवून ' हेच का तुला हवं आहे ? ' असे खुणेने विचारले. माझी सारी तपस्या फुकट गेली. माझ्या त्या फ्रेंच वाक्यांचा अर्थ ' मी तुला पंधरा दिवसांत खडाखड फ्रेंच बोलून दाखवले तर तू मला काय देशील ? ' असा होता.

पहिले आठदहा दिवस अगदी खडतर गेले. एक तर पाट्या वाचता येतात असे वाटायचे. पण त्यांचा उच्चार भलताच असायचा. उद्या मराठीत आपण ' गोडबोले ' असे लिहून त्याचा उच्चार मात्र 'अलबुकर्क' असा करायचा ठरवला तर जो घोटाळा होईल, तीच गत ! रोमन लिपी तीच; पण उच्चार भलतीकडेच. युनेस्कोत माझ्या तैनातीला मादाम वेबेर नावाची एक फ्रेंच बाई होती. तिच्याबरोबर मी फ्रेंच टेलिव्हिजन व रेडिओ यांतल्या निरनिराळ्या विभागांत जात असे. वेबेरबाई उंचीला साडेचार फूट, जुन्या वळणाच्या व इंग्रजी उत्तम बोलणाऱ्या. परंतु आयुष्याची पन्नाशी उलटली तरी इंग्लिश खाडी ओलांडून पलीकडे न गेलेल्या ! फ्रेंच टेलि-व्हिजनने आशियाई पाहुण्यांच्या मदतीला एक ऑफिस ठेवले आहे, त्यात त्या वरच्या अधिकाराच्या जागेवर होत्या; आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे भारतीय तत्त्वज्ञानाविषयी माझ्याहून कणभर अधिक माहिती असलेल्या ! —गीतेचे भाषांतर वाचलेल्या. " तुमच्या देशात कशाला उगीच हे टेलिव्हिजन नेता ? " म्हणून एके दिवशी तिने कळवळ्याने मला विचा-रले. अजूनही हिंदुस्थानात ऋषिमुनी वावरताहेत, अशी तिची समजूत होती. पौर्वात्य संस्कृतीविषयी ह्या नवराबायकोला विलक्षण ओढ होती. प्रोफेसर वेबेर अरेबिक चांगल्यापैकी जाणतात. मादाम वेबेर मला पत्ता सांगायच्या इंग्रजीत, पण पॅरिसमधल्या ठिकाणांचे उच्चार असायचे फ्रेंच !

' शांजेलीझे ' हा शब्द जसा लिहिला जातो तसा वाचला तर कुणालाही कळणार नाही. ' मॉंट पार्नासे ' अशा रीतीने लिहिलेल्या शब्दाचा उच्चार ' मोपार्नास ' होतो, हे आम्हांला कसे कळावे ? ' सिते युनिवर्सिते'तल्या शेवटच्या सितेपुढे ' ए आय आर ई ' हे शेपूट काय मारुतीचे म्हणून आणून सोडले होते म्हणून समजायचे ! ह्या फ्रेंच भाषेचा मी तर असा धसका घेतला की, रस्त्यात महत्त्वाची वाक्ये पुटपुटण्याच्या नादात पॅरिसच्या रस्त्यातून वाहणारे फ्रेंच यौवन पाहायला सवड होईना. असाच आणखी काही दिवस वावरलो असतो तर पॅरिसमधल्या त्या प्रसिद्ध कुबड्याप्रमाणे पॅरिसमधला मुका म्हणून माझी ख्याती झाली असती. शेवटी मनाचा निधडा निश्चय केला आणि ठरवले की, जोरात इंग्रजी धडकवायचे ! फ्रेंच लोकांना इंग्रजी कळूनदेखील न कळल्यासारखे दाखवतात, असा मला शोध लागला, आणि त्यानंतर दुकानात धडाक्याने इंग्रजी बोलायला सुरुवात केली. मग दुकानदारीणबाई शेपटीवर पाय दिलेल्या मांजरीसारखी इकडून तिकडे धावायची आणि आजूबाजूच्या दुकानांतून इंग्रजी जाणणाऱ्याला घेऊन यायची. अर्थात हा प्रयोग सर्वत्र यशस्वी होत नसे. काही ठिकाणी दहाबारा फ्रेंच माणसे जमत आणि माझ्या इंग्रजीचा आपापसात अर्थ लावीत. विशेषतः एकदोनदा मी रस्ता चुकलो होतो, तेव्हाचा अनुभव आहे. मी एका दुकानात जाऊन इंग्रजीत पत्ता विचारू लागलो. दोन मिनिटांत माझ्याभोवती मला पत्ता समजावून सांगणाऱ्यांची दाटी जमली. त्यांचे आपसांत वाद सुरू झाले. तेवढ्यात एक इंग्रजी जाणणारा म्हातारा फ्रेंचमन आला आणि त्याने माझी सुटका केली !

भाषा कळो वा न कळो, हे पॅरिस हळूहळू अंगावर चढायला लागते. सुरुवातीला नुसताच कोलाहल वाटतो, पण हळूहळू स्वर सापडायला लागतात. हे शहर, ही माणसे कशी उलगडल्यासारखी वाटायला लागतात. इथल्या जीवनाचा ठेका लक्षात यायला लागतो. समेच्या, कालाच्या जागा सापडतात आणि मग भाषा हा मुद्दा मागे पडतो. इंग्रजांच्या मानाने फ्रेंचांचा घड्याळावर विश्वास अगदी कमी. वॉटर्लूचा इतिहास साक्ष आहे.

दिलेल्या वेळी हजर रहायची सवय इथे कामी येत नाही. दहा लोकांपैकी आठ लोक अपॉइंटमेंट चुकवायचे आणि अर्धा अर्धा तास वाट पाहून झाल्यावर एकदम उगवायचे. मग क्षमायाचना काय, हात खेचणे काय, पाठीवर थापा मारणे काय, कशाला काही अर्थ नसायचा ! फ्रेंच माणसाने स्वतःला कसल्याच पिंजऱ्यात अडकवून घेतले नाही. त्याची बंडखोरी सर्वत्र आढळते. रस्त्यातल्या रहदारीच्या नियमांखेरीज पॅरिसमधली माणसे दुसरे कोणते नियम मानतात, हे मला शेवटपर्यंत कळले नाही. फ्रेंच माणूस अत्यंत वाह्यात करमणूक कमालीच्या गंभीरपणाने पाहतो आणि तत्त्वज्ञानासारख्या गंभीर विषयाचा फ्रेंच प्राध्यापक वर्गात ' झांबो ' खात खात जीवनातली गुह्ये उकलून दाखवतो.

प्रासे नावाच्या जीवशास्त्राच्या विख्यात प्राध्यापकाच्या प्रयोगशाळेत मी गेलो होतो. मॉ. लाह्र नावाचा एक प्रसिद्ध चित्रपटनिर्माता आहे. त्याचे टेलिव्हिजनवरील शास्त्रीय विषयांवरचे चित्रपट फार प्रसिद्ध आहेत. मी त्याच्या टोळीबरोबर काही माहितीपटांचा अभ्यास करीत होतो. प्रासेच्या प्रयोगशाळेत मला सकाळी नऊ वाजता पोचायचे होतें. मी वेळेवर जाऊन पोचलो. दहा-साडेदहापर्यंत लाह्र आणि त्याचे कॅमेरामन आले. कॅमेऱ्याचे शॉट्स वगैरे ठरवले. प्रासेची प्रयोगशाळा जीवशास्त्राच्या विश्वात मशहूर आहे. काही वेळाने वृद्ध प्रासे आले. छोटासा माणूस, लुकलुकणारे डोळे आणि त्यात विलक्षण मिस्किल झाक. ते आपला विषय समजावून सांगणार होते. त्यांच्या मागे त्यांच्या एका विद्यार्थ्याला सूक्ष्मदर्शक यंत्रातून काही तरी पाहात उभे केले होते.

" ह्याला इथे कशाला उभा केला आहे ? " प्रासेंनी विचारले.

" प्रयोगशाळेच्या वातावरणासाठी ! "

" छे छे ··· मग ह्याला कशाला ? जरा थांबा ···" त्यांनी आपल्या एका विद्यार्थ्याला जवळ बोलावले आणि त्याच्या कानात काही तरी सांगितले. तो विद्यार्थी हसायला लागला. त्याच्या डोक्यावर चापटी मारून प्रासेंनी त्याला लवकर पळ म्हणून इशारा केला. लाह्र आणि आम्ही पाहतच राहिलो. थोड्याच वेळात तो विद्यार्थी एका सुंदर सहाध्यायिनीला

घेऊन आला.

"ही राहू दे इथे उभी!" त्या मुलाला तिथून हुसकावीत ग्रासे म्हणाले आणि हळूच डोळे मिचकावीत तिला त्यांनी सांगितले की, मी जे काही सांगेन त्याला तू मान डोलव. कारण लोक वार्धक्याचे म्हणणे ऐकत नाहीत — सौंदर्याचे लगेच ऐकतात! आणि दुसऱ्या क्षणात अत्यंत गंभीरपणाने त्यांनी कॅमेऱ्यापुढे आपला विषय समजावून द्यायला सुरुवात केली.

पुष्कळ वेळा वाटते की, ह्या फ्रेंचांच्या बाबतीत 'जीवन त्यांना कळले हो' म्हणावे. एका पॅरिस शहरात हे जीवन किती तऱ्हेने फुलले आहे! पॅरिस म्हणजे केवळ 'त्या रम्य रात्री' नव्हेत. केवळ ती निशामंडळे नव्हेत. — इथे लोकशाहीचे पहिले उषःसूक्त गायिले गेले. इथे एका झोलासारख्या साहित्यिकाने आपली लेखणी अन्यायाविरुद्ध तलवारीसारखी उगारली. इथे सोरबाँ विद्यापीठात उन्मत्त यौवन ग्रंथसंग्रहालयात नतमस्तक होऊन तासच्या तास समाधिस्थ झालेले दिसते आणि इथेच प्रूस्तसारख्या लेखकाने जीवनातला क्षण न् क्षण पिंजण्याचा विराट प्रयत्न केला. आजही 'सारा बर्नहार्ट' थिएटरात मोलिअर लोकांना हसवतो आहे. ह्या शहराच्या अंतःकरणात दाटलेल्या सीन नदीने जे पाहिले ते जगातल्या फार थोड्या नद्यांनी पाहिले असेल. पॅरिसची अनेक स्वरूपे आहेत. टूरिस्टांचे पॅरिस निराळे आहे आणि फ्रेंचांचे पॅरिस निराळे आहे. वेबेरबाई मला वारंवार बजावून सांगायची, 'पॅरिस म्हणजे फ्रान्स नव्हे!' हे तलम, पातळ, झिरझिरीत, नखरेल पॅरिस म्हणजे पॅरिस नव्हे! प्रोफेसर ग्रासेच्या बुटावर पाणी पडलेले आपल्या नव्या हातरुमालाने चटकन वाकून पुसून काढणारा विद्यार्थी पॅरिसमध्ये आढळतो; आणि फूटपाथवर आलेल्या काफेमध्ये टेबलावर काल्वाडोझ किंवा साध्या बियरचा प्याला घेऊन वाहत्या जीवनाकडे तास न् तास शांतपणे पाहणारा फ्रेंचमन अन्यत्र आढळत नाही. पॅरिस रात्री फुलते हे खरे, पण मूलँ रूझसारख्या पिगालच्या वेश्यापुरीतल्या निशागारात सारे जीवन घालवून चित्रकलेला अमोल नजराणा अर्पण करणारा बुटका तुलुस लोत्रेक हा हे पॅरिसच जन्माला घालू जाणे! मोमार्तच्या टेकडीवर ठेचेठेचेला चित्रकार आपले फलक घेऊन बसले आहेत आणि

सीनच्या पाण्यात तास न् तास गळ टाकून मत्स्यमुनी तपाचरण करीत आहेत. ह्या नदीच्या काठी असलेली चिमुकली पुस्तकांची दुकाने हे एक पॅरिसचे पुरातन वैशिष्ट्य आहे. इथले बाजार आपल्या मासळीबाजाराशी स्पर्धा करणारा गोंगाट दाखवतात आणि इथली प्रदर्शने माणसाला मौन धारण करायला लावतात. ही पॅरिसची विविधता पाहायला मनाची उंची खूप वर न्यायला हवी ! आणि म्हणूनच केवळ कागदावर गणित मांडून फक्त पोलादाच्या सांगाड्यावर उभारलेला आयफेल टॉवर पाहिला की मला वाटे, ह्या पठ्याला जर वाचा फुटली, तर तोच एकटा ह्या यक्षनगरीचा अर्थ सांगू शकेल !

पॅरिसमधील युनेस्कोची प्रचंड इमारत मी प्रथम पाहिली तेव्हा वाटले की, ही अजून पुरी व्हायची आहे. एखादे सिमेंट कॉंक्रीटचे जंगीच्या जंगी तिपाई प्लँचेट असावे किंवा चांभाराच्या पुढे बुटाचे तळवे ठोकायचे लोखंडी तिकाटणे असते, अशा स्वरूपाचा ह्या इमारतीचा आकार आहे. पुढल्या पटांगणात आर्थर मूरने केलेला एक अगम्य पुतळा आहे. भरीव जागा पोकळीने भरून काढण्याचे हे नवे शिल्पतंत्र माझ्या डोक्यातल्या पोकळीत शिरत नाही. तीच गत भिंतीवरच्या पिकासोची ! एका खडबडीत दगडी भिंतीवर निरनिराळ्या रंगांची आणि आकृत्यांची आपसात दंगामस्ती चालली आहे. मी चांगला पाच मिनिटे त्या भित्तिचित्रापुढे उभा राहून तो गोंधळ समजावून घेण्याचा प्रयत्न केला; आणि शेवटी ' हे कार्य नव्हे तुजजोगे ' असे माझ्या मनाला सांगत तिथून निघालो. बाकी ही युनेस्कोची इमारत म्हणजे नाना देशांतील नाना लोकांचे एक प्रदर्शन आहे. कोकणी उपमा द्यायची म्हणजे इथे काळ्या-गोऱ्या, लाल-पिवळ्या माणसांचे एक चालतेबोलते खतखते शिजते आहे. कोकणी खतखत्यात ज्याप्रमाणे भोपळा, वांगी, कणसे, मुळा, ऊस, चवळी, बटाटे, वाली — सगळ्या भाज्या एकत्र शिजतात, त्याप्रमाणे एकाच लिफ्टमधून जपानी, अमेरिकन, इजिप्शन, फ्रेंच, इंडोनेशियन, आफ्रिकन, हिंदी असे प्रचंड विसंवादी थवे वरखाली जात येत असतात. मला का कोण जाणे, ही इमारत फारशी आवडली नाही. एक तर सिमेंट कॉंक्रीटचे ते प्रचंड खांब गिलावा वगैरे

केल्याशिवाय तसेच सोडले आहेत. त्याच्या 'नॅचरल ग्रेन्स'चे सौंदर्य त्यांतून दिसते म्हणतात. माझ्या अज्ञ डोळ्यांना ते दिसेचना. लाकडाचे नॅचरल ग्रेन्स छान दिसतात. पण सिमेंट कॉंक्रीटचे नॅचरल ग्रेन्स काही तसे वाटले नाहीत. पण हा दोष सर्वस्वी माझाच. मला ह्या नव्या शिल्पातले किंवा चित्रकलेतले काही म्हटल्या काही कळत नाही. मी पॅरिसमध्ये अनेक प्रदर्शने पाहिली. त्यांत एक मॉडर्न आर्टचेही प्रदर्शन पाय दुखेपर्यंत पाहिले. प्रत्येक चित्रापुढे उभे राहून तोंडात मारल्यासारखा चेहरा करून पुढे सरकत होतो. दोनतीन तास प्रदर्शनात हिंडल्यानंतर आरशापुढे उभे राहून माझे नाक-कान-डोळे जागच्या जागी आहेत की नाहीत याची खात्री करून घेतली. कारण नवकलेतले काही पुतळे पाहताना अवयवांचा चमत्कारिक थारेपालट केलेलाही मी पाहिला होता. कुठे कपाळातच डोळा — एका अश्मसुंदरीला बिचारीला एकच स्तन होता. शिल्पकाराने या एकवक्षेच्या निमित्ताने 'एकैकमप्यनर्थाय' असे सुचविले होते की काय कोण जाणे ! की विधात्याच्या उधळपट्टीवर ही टीका होती ?

बाकी पॅरिस शहरातली नुसती प्रदर्शनेच पाहायची म्हटली तरी एक जन्म पुरायचा नाही. केवळ चित्रकला–आणि मूर्तिकला–प्रदर्शनच नव्हे, तर नाविकशास्त्रापासून ते केशभूषा आणि वेषभूषा-प्रदर्शनापर्यंत शेकडो प्रदर्शने, अजबखाने आणि संग्रहालये यांनी हे शहर गजबजले आहे. पॅरिसचे दोन 'मूड्स' आहेत. एक दिवसाचे पॅरिस आणि दुसरे रात्रीचे ! रात्रीचे पॅरिस आधी पाहिले तर दिवसाचे पॅरिस ह्याच लोकांनी का निर्माण केले, अशी शंका येते. रात्रीच्या वेळी चालणाऱ्या पॅरिसच्या अतवर्य कामलीला पाहून आपल्यासारख्या भारतीयांच्या शेंडीला झिणझिण्या येतात, तर दिवसा या लोकांनी केलेल्या प्रचंड ज्ञानोपासनेची, परिश्रमाची आणि चिकाटीची उदाहरणे पाहून आपल्या पगडीचा जर किती खोटा आहे, याची साक्ष पटते ! इथली विद्वत्तादेखील शँपेनसारखी लकलकलक करीत खळाळते ! एका परिषदेत ग्रामीण जनतेसाठी टेलिव्हिजनने केलेल्या कार्याविषयी एका फ्रेंच निर्मात्याचे भाषण ऐकण्याचा मला योग आला. एक तासभर तो फ्रेंचमध्ये बोलत होता. फळ्यावर गमतीगमतीची चित्रे काढून

त्यानं आपला विषय समजावून सांगितला. क्षणात गंभीर, क्षणात अवखळ, क्षणात आवेश, तर दुसऱ्या क्षणी विलक्षण नम्रता अशा थाटात त्या फ्रेंच पंडिताने आपला विषय इतका सुंदर रीतीने मांडला की, तासाभराचे भाषण ऐकण्याचा, विशेषत: कानाला हेडफोन लावून दुभाष्यामार्फत ऐकण्याचा शीण अजिबात जाणवला नाही. ह्याच परिषदेत एका फ्रेंच विदुषीनेही भाषण केले. तिने तर साऱ्या परिषदेला थक्क केले. तिथे साऱ्या युरोपीय देशांतले प्रतिनिधी होते. तिचे भाषण संपल्यावर फ्रेंच प्रतिनिधींनी चक्क ' ब्रेवाँ ब्रेवाँ ' करीत त्या रमणीच्या गालाचे चुंबन घेतले, आणि मी मनात पुन्हा एकदा रामरक्षा म्हटली. उद्या आमच्या साहित्यसंमेलनात 'मराठी व्याकरणातील ल्यबन्त-आणि तुबन्त-विचार ' ह्यासारख्या एखाद्या परिसंवादात समजा जर असे काही घडले तर---अब्रह्मण्यम् ! सीन नदीचे पाणी जिथे असे चढते तिथे अन्य पेयांबद्दल काय सांगावे !

पॅरिसमध्ये गेलेल्या माणसाला आयफेल टॉवर पाहायला मुद्दाम जावे लागत नाही. पुण्यातल्या पर्वतीसारखा हा सारखा दिसतच असतो. पण जवळ गेल्यावर मात्र आपली टोपी पडते हे खरे ! हा प्रकारच अजब आहे. विजेरी पाळण्यातून वर जाताना त्याच्या पोलादी सांगाड्याची कल्पना येते आणि वर गेल्यावर सभोवतालचे ' पारी ' पाहून दृष्टीचे साफल्य होते. बाकी अशा भव्य वास्तुशिल्पाचा शिल्पकाराच्या मनोभूमीवर जो पहिला साक्षात्कार होतो, त्या क्षणाचा मला हेवा वाटतो. दक्षिणेतल्या विशाल उत्तुंग देवालयांच्या निर्मितीचा पहिला साक्षात्कार — वेरुळच्या काळ्याकभिन्न पत्थरांत चमकून गेलेले शिल्प — भव्य जुम्मा मशीद — ताजमहाल या साऱ्यांचे त्या त्या श्रेष्ठ कलाकारांच्या मन:पटलांवर उमटलेले पहिले दिव्य चित्र हे खरे महत्त्वाचे ! हा आयफेल टॉवर तर गणिताच्या आकडेमोडीतून उभा राहिला. मी प्रथम टॉवर पाहिला तो सरत्या संधिप्रकाशात ! दिवसा त्याचे शरीर नजरेत भरते, पण मन उघडे होत नाही. आयफेल टॉवरचे ते त्या धूसर अशा संध्यासमयीचे दर्शन अंत:करणाला स्पर्श करून जाते. असल्या वास्तूंची ' हिस्टरी ' दिवसा समजावून घ्यावी आणि ' मिस्टरी ' सूर्यास्तानंतर ओळखावी ! युद्धातल्या विजेत्यांनी अनेक स्तंभ उभे केले,

पण आयफेल टॉवर हा गणिताने उभवलेला विजयस्तंभ आहे! बहुधा उंच असे स्तंभ आकाशात खुपसतात; आयफेल टॉवर गगनाशी हातमिळवणी करतो. त्याचे टोक आकाशाला टोचत नाही. त्या संध्याकाळी टॉवरखालच्या बागेत बसून निवांतपणाने त्या उत्तुंग आकाराशी एकाग्र होऊन ध्यानस्थ बसलेले फ्रेंच लोक मी पाहिले आणि पुन्हा एकदा ह्या फ्रेंच जीवनाच्या कोड्याने मला बुचकळ्यात टाकले.

हे फ्रेंच लोक प्रत्येक गोष्ट अशी काही चवीने पाहतात की, त्यांच्या डोळ्यांचा हेवा वाटतो. हे शहर आणि त्यातले रहिवासी म्हणजेच एक कोडे आहे. ह्या पॅरिसने क्षणोक्षणी मला दिङ्मूढ केले. इथे जीवनातल्या प्रत्येक व्यवहाराला कलेचा स्पर्श झाला आहे. पॅरिसच्या विद्यापीठाइतकीच इथल्या काफे, बिस्त्रो किंवा तर्रास यांमधून जीवनातली गुह्यतम शास्त्रे उलगडली जातात. हे काफे किंवा बिस्त्रो किंवा फुटपाथवर आलेले तर्रास म्हणजे केवळ भूक भागवण्याची हॉटेले नव्हेत! इथे पाककलेने अनेक रूपे धारण केली आहेत. पॅरिस भयंकर महाग आहे हे खरे, पण सगळ्या तऱ्हेच्या खिशांची इथे सोय आहे हे काही दिवसांनी कळते. मात्र हॉटेल लहान असो किंवा मोठे असो, ह्या हॉटेलमध्ये एखादा वेटर आपल्या पुढ्यात खाण्याचा पदार्थ आणून ठेवतो तोदेखील अशा थाटात की, बशीतून जणू काय जडावाचे दागिनेच आणले आहेत.

मासे खाण्यात माझा जन्म गेला. पण खाण्यापूर्वी मी या फ्रेंचांच्या दृष्टीने मासा कधी पाहिला नाही. फ्रेंच माणूस पदार्थ आधी डोळ्यांनी खातो आणि मग जिभेने! काही मोठ्या हॉटेलांतून तर 'ट्राउट' सारखे मासे आधी आपल्याला जिवंत आणून दाखविले जातात. मग आपल्या पसंतीला उतरल्यानंतर परमेश्वराचा तो प्रथमावतार अन्नब्रह्म होऊन येतो; आणि मग तो वेटर असा काही तलवारीच्या पात्यासारखा लपकत ती बशी आपल्यापुढे ठेवतो की, निम्मी भूक तिथेच भागावी. तशात तुमच्या बरोबर तुमची 'ही' असावी. (लग्नाची की बिनलग्नाची हा बुरसट प्रश्न इथे संभवत नाही.) मग तिच्यापुढे त्या माशाची बशी आणून तो प्रथम नुसतीच दाखवील. खमंग लोण्यात न्हालेल्या त्या बशीतला काळसर

रंगाचा तो अख्खा मासा, त्यावर पिवळ्या लिंबाच्या चकत्या, चिरलेली हिरवीगार पार्स्ली. ही सारी सजावट पाहून ' ती ' प्रसन्न झालेली दिसली की तिने मनात दिलेले धन्यवाद अत्यंत नम्रतेने स्वीकारून ती बशी तो तिच्या पुढ्यातून उचलून शेजारच्या टेबलावर ठेवील. मग काटा आणि सुरी यांचा त्या बशीत चाललेला नाच आपण पाहतो न पाहतो तोच क्षणार्धात त्या माशाच्या पोटातील काटा त्याने बाहेर काढलेला दिसेल. धुतल्यासारखा स्वच्छ आणि पुन्हा कुठेही न मोडता. इथे तुमचे आश्चर्य शिगेला पोचलेले असेल; आणि ' हि 'च्यापुढे पूर्ववत माशाची बशी ठेवून दुसऱ्या एखाद्या रिकाम्या बशीतून तो काटा घेऊन तो वेटर तसाच लपकत निघून जाईल. तिच्यापुढे ठेवलेला आता तो बिनकाट्याचा मासा आणि तुमच्या पुढ्यातला तो काट्यासकटचा मासा यांत सकृद्दर्शनी तरी काहीच फरक नाही, हे लक्षात येताच आपण पूर्ण थिजून जातो. काटा काढावा तर हा असा! दिङ्मूढ होऊन पुढ्यातल्या बशांकडे आपण काही वेळ नुसतेच पाहत बसतो. विशेषतः केवळ कर्तव्यबुद्धीने स्वागता-पुरते तोळाभर स्मित करणाऱ्या, प्रत्यक्ष खाद्यपदार्थांपेक्षा त्यांच्या उप-करणांनाच अधिक महत्त्व देणाऱ्या, टेबल मॅनर्समधे तुमची जराशी चूक झाली तरी ती कटाक्षाने तुमच्या नजरेला आणून देणाऱ्या आणि जेवण संपताच तुम्ही कधी उठता याची वाट पाहणाऱ्या इंग्लिश वेटर्सच्या देशा-तून तुम्ही फ्रेंच वेटर्सच्या देशात आला असाल, तर त्यांच्या तत्परतेने, वाकवाकून केलेल्या स्वागताने, अधिक स्वादिष्ट आणि सुंदर फ्रेंच जेवणाच्या दर्शनाने आणि त्याहून म्हणजे त्या वेटर्सच्या साऱ्या नृत्यमय हालचालींनी तुम्ही असे काही विरघळून जाता की, मग जेवताना भूक नाहीशी होते आणि उरतो फक्त आस्वाद!

फ्रेंच हॉटेल्समध्ये वेटर्स चालत नाहीत, तरंगतात. पण हे लपकणे पुरुष वेटर्सनाच जमते. वेट्रेसिस मात्र ते नर्तन करीत वाढीत नाहीत. फ्रेंच माणूस दुपारच्या जेवणाचा भोक्ता! रात्री त्याला जेवणात वेळ घालवायला सवड नसते. पंचेंद्रियांपैकी प्रत्येक इंद्रियाच्या समाधानाचे त्याने मुहूर्त साधलेले आहेत. सकाळच्या वेळी तो ' बागेत ' नावाचा पाव खातो.

सकाळी उठून खिडकीबाहेर पाहावे. तमाम फ्रेंच रामभाऊ आणि जानकी-




काकू लांब दांडक्यासारखे 'बागेत' आणि दुधाच्या बाटल्या खरीदून न्याहरीची तयारी करीत असतात. हा बागेत म्हणजे पावांतला बादशहा ! मात्र हा बेकरीतून आणल्यापासून तासाभरात संपवावा लागतो. फ्रेंच लोक दुसरा कुठलाही पाव पसंत करीत नाहीत. जर्मनीत काळा पाव खातात. मला वाटते, ते लोक त्याला 'ब्रूड' की 'ब्रूट' असे काही तरी म्हणतात. त्या पावाला 'ब्रूट' हेच नाव योग्य आहे. बागेतने ज्या देशात दिवसाचा प्रारंभ होतो, त्या देशाच्या खाद्यभक्तीबद्दल काय लिहावे ! नाश्ता एकदा आटोपला की कामाला सुरुवात. हे काम, ही सारी मेहनत दुपारच्या भोजनासाठी करायची. पॅरिसमध्ये लंचची सुटी दोनएक तास असते.

फ्रेंच माणूस लंचच्या टेबलापुढे बघावा. लोक त्याच्या रतिरंगाचे खूप कौतुक करतात. पण जेवावे फ्रेंचांनी ! श्वेत किंवा रक्त वारुणीची सुरई पुढ्यात घेऊन दुपारच्या जेवणाची नांदी सुरू होते. ह्या जेवणात 'रोज रोज तेच ते' ही भावना अजिबात नाही. पुढल्या व्हँरूजचा किंवा रक्त वारुणीचा पहिला घुटका घेऊन जेव्हा फ्रेंच माणूस त्या आस्वादाच्या आनंदात एकदा डोळे मिटतो, तेव्हा मनातल्या मनात जणू काय 'अथातो अन्नजिज्ञासा' असा संकल्प सोडतो. बाकी फ्रेंच हॉटेलातली खाद्यपदार्थांची यादी वाचण्यात भोजनाचा निम्मा आनंद आहे. या मानाने आमचा

बटाटावडा – कांदाभजी – सुकी भाजी – मिसळ ही नामावली विलक्षण तेलकट. त्यातून खमणढोकळा, ऊँधियू वगैरे रामभरोसे घराण्यातल्या मंडळींच्या नामोल्लेखानेदेखील पोट बिघडल्याचा भास होतो. कोंबडी ह्या शब्दाच्या उच्चारात खडबडाट आहे; पण 'पूले' हे नाव धारण करून फ्रेंच कोंबडी येते. प्वासाँ आणि मासा फार दूर नाहीत, पण सूपपेक्षा पोताज अधिक डौलदार वाटते. त्याखेरीज 'ब्रूया बूज' किंवा बच्चा-इ-साकूच्या चालीवर जेव्हा मासा-इ-मार्साय किंवा ट्राऊट-इ-व्हर्साय आपल्या विशेष मद्यवैभवासहित टेबलावर येतो, त्या वेळी उदरभरण हे केवळ कोरडे यज्ञकर्म न राहता तो खऱ्या अर्थाने सोमयाग होतो.

माशाची सुरी मटणाला वापरली की इंग्रजाच्या शिष्टाचाराचा खिमा होतो. पण फ्रेंच माणूस काट्याचमच्याला आणि सुरीला गौण मानतो. प्रभू रामचंद्र जसे एकबाणी, तसा हा एक-सुरी आहे. जेवताना तो सुऱ्या बदलत नाही; पदार्थ बदलतो. त्याच्या जोडीची दारू बदलतो. मार्सायचा मासा असला तर त्याला मार्सायच्याच दारूने पोटात सद्‌गती लाभावी याची त्याला अधिक तळमळ आहे. टेबल क्लॉथऐवजी टेबलावर तो पांढरे कागद पसरतो. (आणि चौघांत एका टेबलावर एक कागद पसरला तरी चौघांच्या चार कागदांचे बिल लावतो.) वेटर त्याच कागदावर शेवटी पेन्सिलीने हिशेब मांडतो. जुन्या संगीत नाटकांतून जसे भाषणाभाषणाच्या जोडीला गाणे येई, तसे फ्रेंच जेवणात पदार्थापदार्थाबरोबर वारुणी येते. इथे पाणी मागवले की वेटर्स आणि आजूबाजूची मंडळी मिस्किल हसतात. आमच्या रू ब्रोशांवरील एका हॉटेलमधील मालकाची मुलगी आम्ही तिथे जेवायला गेलो की खट्याळपणाने पाण्याचे ग्लास आमच्यापुढे ठेवून 'हरहर परमेश्वरा, काय हा प्रसंग!' असा आविर्भाव करून दोन्ही हात अंगाबाहेर फेकीत असे. 'लंच' हा इतका महत्त्वाचा असल्यामुळे लंचनंतर फ्रेंच माणसाला कामासाठी भेटले की त्याच्या चित्तवृत्ती अधिक उल्हसित असायच्या!

एकदा दुपारी चारच्या सुमारास पोस्टात पत्र टाकायला गेलो होतो. हिंदुस्थानात पाठवायच्या कार्डाला आणखी किती तिकिटे लावायची हा प्रश्न त्या कार्डावर बोटांनी 'इथे इथे नाच रे मोरा' करीत त्या कारकुनाला मी

केला. त्याने त्याच्याकडून खरेदी केलेल्या पोस्ट कार्डाचे वजन केले! पाकिटाचे वजन ठीक आहे, पण कार्डाचे वजन होताना पाहून त्याच्या शेजारची पोरगीदेखील चकित झाली आणि तिने त्याच्या डोक्यावर टपली मारून मला डोळा मारला! पॅरिसच्या साऱ्या मुक्कामात आमच्या वाट्याला आलेली तेवढी एकच ईषत् प्रणयलीला! एरवी सह्याद्रीच्या कडेकपारीतल्या ह्या समर्थांचिया (सर्कारी) सेवकाकडे एकीनेही वक्र पाहिले नाही. मदिरेचा आणि मदिराक्षींचा आदर अन्यत्र कुठेही इतका होत नसेल. लंडनला तमसातीरी प्रणयप्रसंग पाहून माझी नजर जराशी मेली होती. पण इथे तर सारे पॅरिस रतिरंगरंगी रंगलेले! जळी-स्थळी, काष्ठी-पाषाणी 'आमूर'च आमूर! प्रेमाला 'लामूर' हा शब्द आहे. तो उच्चारताना डोळे मिटायचे असतात, हात सैल सोडायचे असतात. डोळे उघडे ठेवून 'लामूर' म्हटले तर कदाचित सत्तर वर्षांच्या नवऱ्याने पासष्ट वर्षांच्या बायकोवर, पंचेचाळीस वर्षे संसार व दहा मुले झाल्यानंतर केलेले प्रेम असा शुष्क अर्थ होत असेल. हॉटेलात गेल्यावर 'आज काय पिणार?' हा पहिला प्रश्न आणि 'टुकडा पानी' हे त्याचे उत्तर नव्हे! 'पंखा — पानी — पेपर और माचिस' ही आपली फुकटी सुरुवात; फ्रेंचांची नव्हे!

दुपारच्या जेवणानंतर हा फ्रेंच माणूस रंगायला लागतो आणि मग पॅरिसची संध्याकाळ उमलते! आपल्याकडे सकाळ उगवते तशी पॅरिसला संध्याकाळ उगवते. मग मोमार्तचा पायथा, पिगाल, शांजेलीजे वगैरे भागांत यौवनाला आवाहन सुरू होते. पेयागारे तुडुंब भरतात. निशागारे फुलतात. 'मुलँ रूझ'ची तांबडी पवनचक्की घुमायला लागते. अमेरिकन टूरिस्टांचे तांडे फोटो काढून काढून थकलेले असतात, ते ताजेतवाने होऊन पॅरिसच्या रम्य रात्रीचे भोग भोगायला जथ्याजथ्यांनी मोकाट सुटतात.

नाईट क्लब्जच्या इथे शेकडो परी! लिडोसारख्या प्रचंड नाईट क्लबपासून ते नुसते तंबू उभे करून त्यांत नाचकाम करणाऱ्या पोरींचे उत्तान हावभाव दाखवणाऱ्या 'रस्तेमे ऐष' करणाऱ्या करमणुकीपर्यंत सगळ्यांची गिऱ्हाइकी दाटू लागते. बाकी 'फोलीज' किंवा 'कॅसिनो' किंवा 'लिडो' यांमधील नृत्ये आणि इतर करमणुकीचे प्रकार पाहून 'नको नको मना

गुंतू मायाजाळी ' म्हणण्याऐवजी ते जाल निर्माण करणाऱ्याविषयी आदर निर्माण होतो. ' नग्न नृत्य ' ह्या शब्दांनी त्या नृत्याचे वर्णन करणे म्हणजे नग्न या शब्दाचा अपमान आहे ! रंगभूमीवरची दृश्ये पाहून प्रेक्षक थक्क होतात. खट्याळपणा खूप असतो; पण तो इतका चतुर असतो की, कुठेही घृणेची भावना येत नाही. लिडोत एक कोंबडा-कोंबडीचा फार्स पाहताना तर मी इतका हसलो की, मला त्या फार्सच्या आठवणीने आजही हसू येते. दोन पुरुषांनी हा फार्स केला होता. तोंडाने केवळ शीळ वाजवल्यासारखे आवाज काढून त्या पठ्ठ्यांनी कोंबडाकोंबडीचा प्रणय, त्यांचे कलह, मत्सर, मनधरणी, —सारे काही दाखवले. हा हसण्याचा भर ओसरेपर्यंत रंगभूमीवर क्षणभर अंधार झाला आणि दुसऱ्या क्षणातच चक्क प्रचंड काचेच्या मागे पोहण्याचा तलाव आला, धबधबे आले आणि पंचवीस-तीस तरुणतरुणींनी पाण्यात अवगाहनलीला दाखवल्या ! शरीरसौंदर्याचे असले असामान्य नमुने पाहून ' अश्लील अश्लील ' म्हणणारा माणूस हा केवळ ' पशू ' असला पाहिजे. लहानसहान नाईट क्लबांतून ह्याहून खालच्या दर्जाचे खेळ चालतात. पण कुठेही गेले तरी नेपथ्य, प्रकाशयोजना आणि संगीत विलक्षण जादू निर्माण करतात. प्रकाशयोजनेची जादू तर केवळ थक्क करते !




फोलीज पाहताना रंगभूमीवर काळ्या संगमरवरात कोरलेल्या मूर्तीसारखा एक युवतींचा तांडा नाचत आला आणि पाहता पाहता प्रकाशाची अशी किमया झाली की, त्या साऱ्या तरुणी सोन्याच्या

मुशींतून ओतल्यासारख्या दिसायला लागल्या. ह्या मुलींच्या सौष्ठवात इंचाइंचाचा देखील फरक झाला तर सारे नृत्य बेलय वाटेल, अशी त्यांची शरीरसाधना असते. इथे 'रती' हे सत्य आहे आणि 'उपरती' मिथ्या आहे! अर्थात रात्रीच्या काळोख्या बाजूला कोणत्याही शहराप्रमाणे पॅरिस हे अपवाद नाही आणि ही बाजू कोणत्याही शहरातल्या तसल्या गलिच्छ गल्ल्यांइतकीच इथेही भयाण आणि बकाल आहे. त्यातून ज्या गावात दूरदेशींच्या पाहुण्यांची दाटी अधिक, तिथे तनुविक्रयाचा बाजारही मोठा! कैरोत हेच आहे. खुद्द लंडनही याला अपवाद नाही. पिगालच्या वस्तीत थंडीच्या कडाक्यात गल्लीबोळांत आडून लपून उभ्या असलेल्या, चेहऱ्यांवर भडक रंगाचे रोगण लावलेल्या, दडदडीत दिसणाऱ्या, त्या वारयोषिता पाहून शिसारी येते. त्यांचे आवाहन भेसूर असते. पण गया-प्रयागच्या पंड्यांचे आणि अन्य क्षेत्रस्थ पुजारी-बडव्यांचे आवाहनही तितकेच गलिच्छ. फार कशाला, एकदा मुंबईच्या पोलिस कोर्टात माझ्या एका वकील मित्राला भेटायला गेलो होतो, त्या वेळी माझ्या अंगावर चाल करून आलेल्या बेकार वकिलांच्या झुंडी पाहूनदेखील मी असाच शहारलो होतो. बकील लोक अशिलाच्या बाहीला खेचून आपल्याकडे ओढीत असतील, असे मला स्वप्नातदेखील वाटले नव्हते.

ह्या मोठमोठ्या नाईट क्लब्जमध्ये पैसे मात्र पाण्यासारखे उधळावे लागतात. अर्थात केवळ करमणुकीसाठी किंवा शँपेन पिण्यासाठी ते पैसे गेले तर दुःख नव्हते. पण इथला टिप्सचा प्रकार भयंकर आहे. सार्वजनिक मूत्रविसर्जन-केंद्रात बसलेल्या सेवकालादेखील कारण नसताना दर वेळी शंभर शंभर फ्रँक्स टिकवावे लागतात. आम्ही एकदा तीनचार मित्र मिळून घाऊक रीतीने अशा ठिकाणी शिरलो, आणि सर्वांचे मिळून शंभर फ्रँक्स टाकले, तर त्या बाईने बाकीच्यांचे कोट ओढून सक्तीने टिप द्यायला लावली. एरव्ही ओव्हरकोट ठेवायला टिप, हॅट ठेवायला टिप, थिएटरात आपली सीट दाखविणारीला टिप, टॅक्सी-ड्रायव्हरला टिप, हॉटेलात तर बिलाबरोबर टिपचा हिशेबही येतो. मात्र हॉटेलात आपण मागितल्याखेरीज बिल येत नाही. "लॉदिसिऑं सिल्वू प्ले" म्हटल्यावर थाळीवर

बिल नाचवीत वेटर येणार. मग त्याला विचारायचे, "तु कांप्री ?" त्याने उई उई उई उई केले की त्यात टिपदेखील मोजली आहे हे ओळखायचे आणि वट्ट रक्कम वाचायची नि टिकवायची !

पॅरिसमध्ये भाषेच्या अडचणीमुळे मी नाटके फारशी पाहिली नाहीत. मात्र जी पाहिली ती मी जन्मात विसरणार नाही. 'पॅले-द-शाय्यो' हे प्रचंड नाट्यगृह आहे. सुमारे अडीचतीन हजार माणसे तिथे बसतात. माझे पंधराशे फ्रँक्सचे म्हणजे जवळ जवळ पंधरा रुपयांचे तिकीट असूनही मी दुसऱ्या मजल्यावर होतो. या थिएटरात मी एक 'लॅरेंझशिओ' नावाचे ऐतिहासिक नाटक पाहिले. त्यातल्या मुख्य नायकाचे काम करणाऱ्या माणसाचा आवाज आजदेखील माझ्या कानात घुमतो. आपल्याकडल्या गणपतराव जोशांच्या आवाजाच्या ज्या कथा मी ऐकल्या होत्या, त्या सर्वस्वी खऱ्या असल्या पाहिजेत, याची मला खात्री पटली. मायक्रोफोन नव्हता, तरीही ते प्रचंड नाट्यगृह ह्या नटाच्या आवाजाने दुभंगून जाईल की काय, असे वाटत होते. एका उन्मत्त राजाचे काम तो करीत होता. त्याच्या गरजण्यात वादळाची शक्ती होती; आणि एवढे असून कुठेही आरडाओरडा किंवा आक्रस्ताळेपणाचा अंशही नव्हता. आवाजाची जातच असामान्य ! ह्याच नाटकात एका प्रसंगात संघनृत्यवजा प्रवेशात पात्रांच्या वेशभूषेच्याच रंगांच्या सावल्या रंगभूमीवर पडत होत्या. त्यांतून साऱ्या रंगमंचावर नुसत्या रंगांचे वृंदवादन चालल्याचा भास होत होता. मी 'डायरी ऑफ ॲन फ्रँक' ची फ्रेंच आवृत्तीदेखील पॅरिसमध्येच पाहिली. ही नाझींच्या अमानुष राजवटीतली करुण कहाणी. तेराचौदा वर्षांच्या ज्यू पोरीने अज्ञातवासात आपल्या आईबापांबरोबर लपूनछपून एका तळघरात राहताना ही रोजनिशी लिहिली आणि ह्या पुस्तकाला जागतिक लोकप्रियता लाभली. मी ती डायरी इंग्रजीतून वाचली होती. ॲनचे काम करणाऱ्या पोरीने प्रेक्षकांच्या काळजाचे पाणी पाणी केले. तिने आपल्या बापाला 'ओ पापा…ओ पापा' म्हणून मारलेल्या केविलवाण्या हाका माझ्या कानात अजून घुमताहेत. तिच्या बापाच्या अभिनयासारखा संयत अभिनय मला पुन्हा केव्हा पाहायला मिळेल कोण जाणे ! या

नाटकाने माझी झोप घालवली.

आणि त्यानंतर काही दिवसांनी पाहिलेल्या मार्सेल मार्सोच्या मूकाभिनयाच्या कार्यक्रमाने तर आपल्याला अभिनयातले काही येते, या अहंकाराची संपूर्ण विकेट उडाली. तोंडातून एक शब्द नाही. केवळ मूक हालचाली आणि अभिनय यांतून हा पठ्या प्रेक्षकांना तीन तीन तास बांधून ठेवतो. तो त्यांना पोट फुटेपर्यंत हसवतो, रडवतो, अंत:करणाला गुदगुल्या करतो आणि काळजाला बघता बघता हात घालतो. 'माईम' हे फ्रेंचांचे वैशिष्ट्य आहे. दिनकर कामण्णासारखा दिसणारा हा माणूस सर्कशीतल्या विदूषकासारखा तोंडाला पांढरे लावून आणि अंगात घट्ट कपडे घालून येतो. ह्याने मूक-नाट्याचे अनेक प्रकार केले. विशेषत: डेव्हिड आणि गोलिआथच्या कथेतला भाग अचाट होता. क्षणात माणूस आणि दुसऱ्या क्षणी राक्षस बनून हा स्वत:चाच दोन भूमिकांतून पाठलाग करीत होता. मध्ये फक्त एक तीन फूट रुंदीचा पडदा होता. त्याच्यामागे जाऊन आला की राक्षस — तिथून पुन्हा पुढे आला की घाबरलेला माणूस. अशा फेऱ्या याने सुरू केल्या. त्या फेऱ्यांचा वेग इतका वाढला की, शेवटी दोन माणसे धावताहेत, असा भास निर्माण झाला. त्याखेरीज एका हॉटेलमधल्या वेटरचा आणि भोवतालच्या गिऱ्हाइकांचा ह्या एका नटाने केलेला मूकाभिनय तर कमालीचा सुंदर होता. रंगभूमीवर एक खुर्चीदेखील नसते. पण खुर्चीवर बसण्याच्या ह्या



मार्सेल मार्सोने जितक्या तऱ्हा दाखवल्या, त्यांवरून ती बसणारी माणसे काय स्वभावाची होती हे तर दर्शन घडलेच, पण त्या खुर्च्यांची घडण कसली होती, हेदेखील ध्यानात आले. ह्या क्षेत्रातला हा महान कलावंत आहे. रंगभूमीवर नुसत्या गजांचे छोटेसे सेटिंग मांडून त्याच्या पलीकडे

फक्त पाय प्रेक्षकांना दाखवून ह्याने एका तरुणीपायी झालेल्या खुनाची कथा केवळ पायांच्या हालचालींनी सांगितली; आणि शेवटी तर गोगोलच्या सुप्रसिद्ध 'कोट' ह्या गोष्टीचे अर्ध्या तासाचे मूकनाट्य ह्याने आपल्या सहकाऱ्यांबरोबर करून दाखवले. मार्सेल मार्सोचे हात, पाय, बोटे, भिवया, कान, डोळे हे अवयव बोलतात आणि ही भाषा इतकी प्रभावी आहे की, शब्द नावाची गोष्ट दुबळी वाटते! वेताच्या छडीसारखे त्याचे शरीर वाकते आणि जीवनातील शेकडो अनुभव न बोलता सांगते. मी ह्या नटवर्याला मनातल्या मनात दंडवत घालून निघालो. जेमतेम पाच, सव्वापाच फूट उंचीच्या ह्या नटाची अभिनयातली उंची आयफेल टॉवरएवढी आहे.

पॅरिसमधला थंडीचा कडाका वाढत होता. पण व्यवहार थंडावले नव्हते. माझे प्रो. आंबेकर नावाचे मित्र सोरबॉं विद्यापीठात उच्च शिक्षण घेत आहेत. त्यांनी त्यांच्या विद्यार्थिगृहात जेवायचे निमंत्रण दिले. पॅरिस-मध्ये विद्यार्थ्यांना हॉटेलातूनदेखील सवलती आहेत. सिनेमा-नाटके-प्रद-र्शने सर्व अर्ध्या दरात, आणि वसतिगृहात तर कमालीच्या सवलती. एरवी ज्या जेवणाला हजार फ्रॅंक्स पडावे ते जेवण शे-दीडशे फ्रॅंकांत — अगदी दारूसकट! सिते युनिवर्सितेमध्ये निरनिराळ्या देशांतल्या विद्यार्थ्यांसाठी त्या देशांनी वसतिगृहे बांधून दिली आहेत. ह्या इमारतींची रचना प्रत्येक देशाचे वैशिष्ट्य दाखवणारी अशी आहे. भोजनासाठी मात्र सारे विद्यार्थी आणि विद्यार्थिनी एकत्र जमतात. दोन प्रचंड हॉल्समध्ये जवळ जवळ हजार हजार विद्यार्थी-विद्यार्थिनींचे सहभोजन चालते. थट्टामस्करीला ऊत येतो. प्रत्येकाने काउंटरवर जाऊन आपल्या थाळ्या आणून टेबलावर मांडायच्या आणि जेवण संपल्यावर उचलून दुसऱ्या टोकाच्या काउंटरवर ठेवून द्यायच्या. आम्ही आंबेकरांचे पाहुणे म्हणून त्यांच्याबरोबर आत शिरलो आणि 'शापो शापो' असा आरडाओरडा झाला. हजारो काटेचमचे थाळ्यांवर वाजू लागले आणि 'बागेत' पावाचे तुकडे हॉलमध्ये शिरणाऱ्या एका विद्यार्थिनीच्या दिशेने मारले गेले. त्या विद्यार्थिनीने चटकन डोक्या-वरची टोपी काढली तेव्हा कुठे हा पावांच्या तुकड्यांचा गोळीबार थांबला. ह्या हॉलमध्ये शिरताना उघड्या डोक्याने शिरावे लागते. डोक्यावर हॅट

राहिली आणि जेवणाऱ्या मुलांचे लक्ष गेले की, ‘ शापो शापो ’— ‘ हॅट हॅट ’ असा आरडाओरडा होतो; आणि हॅट काढीपर्यंत पावाच्या तुकड्यांचा वर्षाव होतो. जेवण हे अगदी उजळमाथ्याने करावयाचे कृत्य आहे असा ह्या विद्यार्थ्यांचा सिद्धान्त आहे. पण या रूढीची चतुर बाजूही एका विद्यार्थिनीने चटकन दाखवून दिली. एखाद्या पोरीला आपल्याकडे सर्व विद्यार्थ्यांचे लक्ष वेधून घ्यायचे असले की, ती मुद्दामच डोक्यावर हॅट नाही तर निदान रंगीबेरंगी फुलाफुलांचा रुमाल तरी बांधून येते. कुणाच्या तरी ते लक्षात येते. ‘ शापो शापो ’चा आरडाओरडा होतो आणि हजार गुणिले दोन डोळे चटकन तिकडे वळतात. हजारो तरुणतरुणी गप्पा-गोष्टी-थट्टा-हितगूज-चर्चा करीत त्या हॉलमध्ये दुपारी-संध्याकाळी भोजनाला जमतात. त्याच इमारतीत विद्यार्थ्यांचे सुंदर थिएटर आहे. तिथे निम्म्या दरात उत्तमोत्तम फिल्म्स पाहतात, नाटके करतात किंवा चांगल्या नटांची नाटके पाहतात. तास-दीडतास पुढल्या बागेत भटकतात !

आमचे जेवण आटोपून आम्ही हॉलच्या बाहेर आलो आणि थक्क झालो. बाहेर प्रचंड हिमवृष्टी चालू होती. माझ्या आयुष्यात मी पाहिलेला हा पहिला हिमसेक ! सर्वत्र पांढरीशुभ्र जादू पसरली होती. त्यात भोवतालची ही शेकडो तरुण मंडळी ! तासाभरात सगळीकडे हिमाचे थर साचले होते आणि कापसासारखे हिम पडत होते. ‘ स्नो व्हाईट ’ किंवा हिमधवल असा पांढऱ्या रंगाचा विशेष का मानतात, ते हा हिमसेक पाहिल्यावर कळले. या वर्षाचा पहिला हिमसेक ! भोजनगृहातून बाहेर पडणाऱ्या तरुणतरुणींनी हिमाच्या गोळ्यांची फेकाफेक सुरू केली. त्यांच्या त्या अब-खळ हिमसंग्रामात आम्हीही भाग घेतला. वयाची दहापंधरा वर्षे मागे पळाली. सारी बाग पांढरी शुभ्र झाली होती. पायऱ्यांवर, झुडपांच्या तुऱ्यांवर कुंपणाच्या भिंतींवर साचलेले हिम गोळा करून लाडू वळायचे आणि “ लगाव ” ! विद्यार्थिनींनी आपापल्या होस्टेल्सच्या गच्चीवर मोर्चे बांधून तिथून बर्फाचे ‘ कुलपी गोळे ’ फेकायला सुरुवात केली. काही-जणांनी अगदी समोरासमोर हल्ले सुरू केले. दोनचार गोळ्यांचा मारा खाल्ल्यावर ते हात दिसतात तितके नाजूक नाहीत, याची खात्री पटली.

त्या रात्री दोन-अडीच वाजेपर्यंत आम्ही हा नव्या हिमवृष्टीचा स्वागतोत्सव साजरा केला. पॅरिसमधल्या ह्या रात्रीची सर त्या तथाकथित ‘ रम्य रात्रीं ’ना येणार नाही ! फुलांच्या घोसासारखे तरुणतरुणींचे जिवंत घोस निसर्गाच्या दर्शनाने बेभान झाले होते. गात्रे गोठवणाऱ्या शिशिराचेदेखील इथे असे स्वागत होते, तिथे वसंतागमनाच्या वेळी काय होत असेल !

हळूहळू या शिशिराचे स्वरूप बरेच उग्र व्हायला लागले. आदल्या रात्रीच्या त्या शुभ्र सौंदर्याचा दिवसाच्या रहदारीखाली चिखल झाला आणि मग पॅरिस शहरातले आमचे हिंडणे काही काळ मुष्किल झाले. पॅरिस हे खरोखरच नुसते हिंडत राहण्याचे शहर आहे. सीनच्या काठी हिंडावे, निरनिराळ्या ‘ बुल्वा ’मधून प्रचंड वृक्षांची दुतर्फा सलामी घेत हिंडावे. मोमार्तच्या टेकडीवर हिंडावे, इतकेच काय पण गजबजलेल्या फुटपाथवरूनदेखील, काफेत शांतपणे कॉफी किंवा शराब पीत बसलेल्या लोकांकडे पाहत पाहत हिंडावे. हे शहर म्हणजेच एक खुले प्रदर्शन आहे. टूरिस्टांसाठी छापलेल्या माहितीपत्रकांतलीच स्थळे पाहत सुटणे म्हणजे पॅरिस पाहणे नव्हे. पॅरिस घुटक्याघुटक्याने पाहावे. वखवखलेल्या डोळ्यांनी पाहू नये, थंडपणे पाहावे. पॅरिसमधल्या मोटारींचा वेग अचाट असतो. पण सीनवरच्या अनेक पुलांपैकी एखाद्या पुलावर उभे राहून खालच्या ‘ के ’वरून सटक् सटक् बंदुकीच्या गोळ्यांसारख्या निसटणाऱ्या मोटारी पाहत बसायलादेखील मजा येते.

बाकी पॅरिसमध्ये भाषा येवो न येवो — एकदा आपल्याला पॅरिसच्या भुयारी रेल्वेची ओळख झाली की भीती नाही. लंडनच्या ट्यूबपेक्षादेखील पॅरिसची ‘ मेत्रो ’ अधिक सोयीची आणि स्वस्त. मुंबईला ज्याप्रमाणे एके काळी एका-आण्या-दीड-आण्यात म्यूझियम ते खोदादाद सर्कलपर्यंतचा प्रवास ट्रॅममधून करता येत असे, त्याप्रमाणे ह्या मेत्रोतून चारपाच आण्यांचे तिकीट काढावे आणि कुठूनही कुठेही जावे. विद्यार्थ्यांना यातही कन्सेशन ! ही मेत्रोदेखील कधी भुयारातून, कधी नदीच्या पुलावरून, तर कधी नदीच्या पाण्याखालून अशी नाना लीला करीत जाते. मात्र लंडनची ट्यूब अधिक ऐटबाज आहे. आतल्या आत स्टेशने बदलताना फारसे चालावे लागत

नाही. इथे तो ताप फार.

थंडी वाढायला लागल्याबरोबर आम्ही प्रदर्शने पाहण्याचा सपाटा लावला. 'लूव्र' पाहिल्याखेरीज पॅरिस घडले, असे म्हणता आले नसते. ते जगड्व्याळ चित्रकला-मूर्तिकला-प्रदर्शन पाहिले. मोनालिसाचे ते सुप्रसिद्ध चित्र पाहिले. खुदांना तिच्या त्या स्मिताचे रहस्य उलगडले नाही. कुणी म्हणतात, ती स्त्री गरोदर आहे आणि त्या स्मितात तिचे तेही गुपीत दडले आहे. पण लिओनार्डोने एका पाद्र्याचे चित्र काढले आहे, त्याच्या-देखील चेहऱ्यावर तशीच मुस्कराहट आहे म्हणे! आता पाद्र्याचे गुपीत कुठले नि मोनालिसाचे कुठले? मी मोनालिसाला पाहणाऱ्या सरकत्या प्रेक्षकांकडे पाहत होतो. चार इतर चित्रांतच मोनालिसा बसली आहे. त्यामुळे बरेचसे लोक तिच्यापुढून तसेच जातात. मग विचारतात, 'अहो, मोनालिसा कुठे आहे?' कुणी तरी त्यांना मागे खेचतो. मग चेहऱ्यावरचा भोटमपणा लपवीत ते म्हणतात, "आहाहा! ब्यू ऽऽऽऽऽ टिफुल्!" आम्ही चित्रकलेच्या बाबतीतला आमचा पराजय केव्हाच लिहून दिलेला, त्यामुळे माझ्यावर तो प्रसंग कधीच आला नाही. जिथे बोडसमास्तरांनी माझ्यापुढे आपले हात टेकले, तिथे लिओनार्डो काय होय! मेमरी ड्रॉइंगच्या एका परीक्षेत मी दोन लांब आडव्या रेघा आणि बऱ्याचशा उभ्या रेघा मारून पाच मिनिटांत त्यांच्यापुढे कागद धरला होता. मास्तर म्हणाले, "काय काढलं आहेस हे?"




"शिडी." मी अभिमानाने म्हणालो.

"गधड्या, मग ती निदान उभी तरी काढायचीस."

"पण मास्तर, उभी शिडी भिंतीशिवाय उभी कशी राहील?"

माझी शंका.

" तिरडीसारखी दिसतेय तुझी शिडी — त्याच्यावर एखाद्या माणसाला निजव आणि खाली लिही — कैलासवासी बोडस मास्तर ! "

' लूव्र ' पाहताना माझ्या चित्रकलेची ही मरणगाथा मला आठवली. त्यानंतर मी तिथे अनेक मास्टरपीसेस पाहिली. त्या पीसेसखालच्या मास्टर्सच्या सह्या वाचायच्या आणि " वा ! सुंदर ! ! " असे म्हणून पुढे सटकायचे. पण काही जातिवंत रसिकमात्र अशा भारावलेल्या डोळ्यांनी त्या चित्रांकडे टक लावीत की, त्या चित्रांहून मला तीच मंडळी प्रेक्षणीय वाटे ! भगवंतापेक्षा मला भक्तच नेहमी आवडत आले आहेत.




मात्र एका प्रदर्शनाने माझे अंत:करण हलवले. नेपोलियनच्या समाधीजवळ नेपोलियनच्या वस्तूंचा संग्रह आहे. तत्कालीन पोषाख, शस्त्रसामग्री इत्यादी गोष्टींचे ते प्रदर्शन आहे. त्यात नेपोलियनची शय्या आहे. सेंट हेलिना बेटातून ती इथे आणली. लहानसा पलंग, मच्छरदाणी आणि नेपोलियनची गादी-उशी-पलंगपोस ! किती ठेंगणा होता हा नेपोलियन ! एखाद्या शाळकरी पोराचा बिछाना असावा तेवढा हा बिछाना आहे— त्याच्यापुढे उभे राहिले की मात्र मन थरकते, उदासते. तिथून जवळच नेपोलियनची भव्य समाधी आहे. पायऱ्या उतरून खालच्या गर्भगृहात जावे लागते. संगमरवराचे थडगे आहे आणि भोवती चौदा विद्या अधो-वदना सुंदरींच्या रूपाने संगमरवरात थिजून उभ्या आहेत. हे सारेच दृश्य गंभीर आहे. मनाला चटका लावणारे आहे. पण त्याहूनही नेपोलियनच्या ह्या थडग्याचे नाव अंत:करण हलवते. सम्राट नेपोलियनच्या या थडग्याला

'चिमण्या शिलेदाराची कबर' म्हणतात. छत्रपती शिवाजीमहाराजांना आपण शिवबा म्हणतो तसे! ते नाव ऐकल्यावर एकदम डोळे पाणावले. ह्या चिमण्या शिलेदाराने फ्रान्सला केवळ साम्राज्य नाही दिले — खूप गोष्टी दिल्या. कायदा दिला, ज्ञानोपासनेची साधने मोकळी करून दिली, कलांना उत्तेजन दिले. फ्रेंचांचे या चिमण्या शिलेदारावर अपार प्रेम आहे!

पॅरिसमधले दोन महिने कसे गेले, ते कळले नाही. आता परतीच्या प्रवासाचे वेध लागले. शेवटले दिवस नुसतेच अमुक एक म्हणून न पाहता भटकण्यात घालवले. कॅसिनो, लिडो आणि अन्य करमणुकी यांत घालवण्याइतके पैसेही जवळ नव्हते.

पण त्याहूनही, त्या आकर्षणापेक्षा केवळ पॅरिस शहराचे आणि त्या अजब फ्रेंच लोकांचे आकर्षण अधिक होते. संध्याकाळी आर्क – दु – त्रिऑम्फच्या आसपास त्या तसल्या थंडीत हिंडायचे किंवा खोलीबाहेर भुरभुर पडणारा स्नो पाहत पॅरिसमधला आमचा 'फ्रेंड-फिलॉसॉफर-आणि-गाईड' माधव आचवलबरोबर गप्पा मारायच्या, हा कार्यक्रम सुरू झाला. म्हणजे पॅरिस शहरात राहण्याचे परकेपण, एक भाषेचे अज्ञान सोडल्यास, काहीसे संपले होते. ही भाषा-सुंदरी मात्र अजिबात प्रसन्न झाली नाही आणि मीदेखील तिची फारशी आराधना केली नाही. काही गोष्टी पुढल्या जन्मावर सोपवाव्या लागतात. पुढल्या



जन्मी मात्र अस्खलित फ्रेंच बोलत पॅरिसमध्ये हिंडायची इच्छा आहे. मग मी अगदी फ्रेंच माणसाच्या ऐटीत त्या शँपेनसारख्या भाषेत द्राक्षांविषयी बोलेन. "औंदा पाऊस पडंल का ?" ही जशी आपल्या देशातल्या माणसाची चिंता, त्याप्रमाणे फ्रेंच माणसाची एकच चिंता म्हणजे यंदा द्राक्षांचे मळे फुलतील का ? मूल जन्माला आले म्हणजे त्याच्या नावाची एक शँपेनची बाटली तळघरात राखून ठेवली जाते आणि त्याच्या लग्नाच्या वेळी ती उघडली जाते. वयाच्या बाबतीत मदिरा आणि मदिराक्षी यांचे प्रमाण व्यस्त. एक जुनी तितकी जास्त गुणकारी, तर दुसरी — जाऊ दे. हा द्राक्षांचा विषय इये देशीचिये क्षोणी उपयोगाचा नाही. फ्रान्समधल्या त्या द्राक्ष-संस्कृतीतून परत आपल्या रुद्राक्षसंस्कृतीत यायची तयारी सुरू झाली. फ्रेंचांची द्राक्षे आंबट आहेत म्हणणे हेच सगळ्यात उत्तम !

एका संध्याकाळी आम्ही पॅरिसमध्ये आलो — तशाच एका संध्याकाळी पॅरिसमधून निघून गेलो. पॅरिसवर त्याचा काय परिणाम होणार होता ? सीन नदी वळणावळणांनी तशीच वाहत होती. त्या नदीच्या मध्येच एका मत्स्याकृती बेटात नोत्रदामचे भव्य चर्च झळकून गेले आणि पाहता पाहता आयफेल टॉवर ढगांखाली कायमचा झाकला गेला. हे पॅरिस आमच्याशी मनमोकळे करून मात्र बोलले नाही. विलासी पॅरिस न पर-वडणारे, व्यासंगी पॅरिस न समजणारे आणि कलासक्त पॅरिस ठायी ठायी कोड्यात टाकणारे; त्यामुळे पॅरिस सोडताना मी मनात कुठे तरी दुखावला गेलो होतो. एखाद्या सुंदर कादंबरीची पहिली आणि शेवटली पाने सुटून हरवली असावी आणि हाती आलेल्या मधल्या मधल्या प्रकरणांनी चटक लावावी, तशी ह्या अचाट शहराने लावली.

आमचे विमान लंडनच्या दिशेने प्रचंड धुक्यातून, ढगांतून वाट काढत होते. हवा विलक्षण खराब होती. दोनतीन वेळा लंडनच्या विमानतळावर उतरण्याचा प्रयत्न झाला. शेवटी तो विमानतळ सुरक्षित नाही असे कळले, आणि चांगले लंडनच्या माथ्यावर आलेले आमचे विमान लंडनपासून दूर असलेल्या गॅटविकच्या विमानतळावर उतरले. त्या लहानशा विमानतळावर अगदी पंढरीची यात्रा जमली होती. धुके तर इतके घट्ट होते की, दोन

हातांवरचे माणूस दिसत नव्हते. आम्ही 'विठ्ठला पांडुरंगा' म्हणत उतरलो आणि लंडनला जाणाऱ्या आगगाडीत बसलो; दोन-अडीच तासांनी घरी पोचलो आणि रात्री टेलिव्हिजनवर बातमी पाहिली — आमच्या मागून तासाभरातच आलेले तुर्कस्तानी शिष्टमंडळाचे विमान गॅटविक एअरपोर्ट-वर कोसळून दोनचार माणसे सोडून बाकीची जागच्या जागी ठार झाली होती! गॅटविक एअरपोर्टवर मृत्यूने जबडा पसरला होता. ह्या विमानावर पडायचा तो हात त्या विमानावर पडला. आपण नाही का चटणीकडे हात नेतो नि पापडाचा तुकडा मोडून तोंडात टाकीत!

माझ्या छातीत उगीचच धडधडले आणि नकळत माझ्या एका भाबड्या हितचिंतकाने माझ्या सुटाच्या खिशात टाकलेल्या देवाच्या अंगाऱ्याच्या पुडीची आठवण झाली. त्या वेळी हसू नाही आले — आता येते!

निघताना विमानाने निघाल्यामुळे जलपर्यटनाची हौस भागली नव्हती. त्यामुळे येताना आगबोटीने यायचे ठरवले होते. बोटीतून 'चिक्कार' सामान नेता येते हे कळल्यावर 'चिक्कार' सामान बरोबर घेतल्याखेरीज बोटीवर घेत नाहीत, असा समज होऊन खरेदीला सुरुवात झाली. विलायतेला जाताना बरोबर पैसे नेण्याच्या बाबतीत ज्याप्रमाणे असंख्य गैरसमज आहेत, त्याचप्रमाणे कस्टम्स ड्यूटी न भरता हिंदुस्थानात काय काय नेता येते, याविषयीदेखील महान गैरसमज आहेत. भारतीय वकिलातीतल्या कार्यक्षम मंडळींकडून तर हे गैरसमज वाढवण्याचे पद्धतशीर कार्य चालू आहे. भारतीय वकिलातीबद्दल इतर कोणाचेही काहीही मत असो, माझा मात्र अनुभव अतिशय चांगला आहे. सर्व भारतीय परंपरेचे इथे उत्कृष्ट जतन केले आहे. इंग्रजांच्या सहवासात आमची ही शाळिग्राम मंडळी अजिबात बिघडली नाहीत. इंग्रजाला आपण कुणाची पर्वा करीत नाही असा गर्व करण्याचे काहीही कारण नाही. इथे त्याच्या वरची पायरी आहे. मला इतर देशांतल्या वकिलातींचा अनुभव नाही; परंतु इंग्लंडमधल्या भारतीय वकिलातीत आमचे अत्यंत प्रेमाने स्वागत झाले — अत्यंत आध्यात्मिक स्वागत! आमचा आत्मा आणि त्या स्वागतकक्षातल्या सकाळी अकरा वाजता वामकुक्षी करणाऱ्या कर्मचाऱ्याचा आत्मा एकमेकांना भेटले. हसणे, बोलणे वगैरे बाह्य शारीरिक उपाधींना पूर्ण फाटा होता. आमच्या प्रश्नाला मौनाने उत्तर मिळाले. हे मौन विगतसंशय करणारे गुरूचे मौन नव्हते, हा केवळ तपशिलातला फरक! भारताच्या जागतिक शांततेच्या नीतीचा इथला अवलंब पाहण्यासारखा आहे. सर्वत्र सामसूम असते. बहुतेक खुर्च्या रिकाम्या. कोणत्या अदृश्य देवता येऊन इथे कामे सांभाळतात भारतमाताच जाणे! काही खुर्च्यांवर मला इंग्रज कारकून दिसले. ते मात्र

असंस्कृत होते; कारण ते अकरा-साडेअकराच्या सुमाराला काम करीत असताना आढळले. बारा ते दोन ही इथली दुपारच्या जेवणाची वेळ आहे. या बाबतीत नियमितपणा वाखाणण्यासारखा आहे. मंडळी साडेअकराच्या सुमाराला सोवळी नेसायला लागतात आणि तीन-साडेतीनला खुर्चीकडे परततात. मग चारच्या चहाला उशीर नको म्हणून पावणेचारला जातात ते साडेचारला परततात आणि पाच वाजता छत्र्या, कोट गोळा करण्याच्या खोलीत गर्दी नको म्हणून पावणेपाचला त्या दिशेला धावतात. त्यांच्या कामाच्या मिनिटांत त्यांना गाठून हिंदुस्थानात कोणत्या वस्तू नेता येतात, याची चौकशी केली; आणि त्याचे उत्तर 'काहीही नेता येणार नाही' असे मिळाले.

मला इतर वस्तूंचे विशेष काही महत्त्व नव्हते. पण जर्मनीत मी कॅमेरा घेतला होता. गॅटविक एअरपोर्टवर कस्टम अधिकाऱ्याने तो अडवला होता. मीही घाबरलो. कस्टम अधिकारी दोनतीन मिनिटे तो कॅमेरा हातांत खेळवीत होता. काही वेळाने त्याने तो मला परत दिला आणि आपण स्वतः- देखील हाच कॅमेरा नेहमी वापरतो असे त्याने मला सांगितले. आत्मा कुडीतून गडगडला होता, तो जागेवर येऊन बसल्याचे माझ्या अंतश्चक्षूंनी पाहिले. मीदेखील कार्श ऑफ ओटावा हा माझा शिष्य असल्याच्या थाटात त्याच्याशी फोटोग्राफीवर बोललो. वास्तविक माझ्या फोटोग्राफीची कथा विलक्षण करुण आहे. केवळ चारचौघे घेतात म्हणून मी कॅमेरा घेतला होता. प्रत्येक जण त्या कॅमेऱ्याची तारीफ करतो. पण माझा अनुभव



निराळा आहे. ह्या कॅमेऱ्यातून मी काढलेला आयफेल टॉवर पिसाच्या टॉवरसारखा कलता आला आहे. दिवसा काढलेले फोटो रात्री काढल्या-सारखे आले आहेत; आणि गौरवर्णीयांचा नक्षा प्रत्येक फोटोत उतरवून त्यांचा वर्णवर्चस्वाचा सिद्धान्त खोटा पाडला आहे. फक्त हिमवृष्टीचे फोटो सुरेख आले आहेत. फोटोभर पांढरेशुभ्र बर्फच बर्फ. मी ज्याच्याकडे म्हणून फिल्म धुवायला दिली, त्याने ती मला स्वच्छ धुऊन दिली. एकदा अशीच एक ग्रुप फोटोची पारदर्शक फिल्म पाहताना मला दोनतीन ठिपके सापडले तेवढेच मी छापून घेतले. शेवटी माझे मित्र माधव आचवल, मी आणि सौ. या तिघांनी मिळून त्या फोटोचा अर्थ लावला. डाव्या बाजूला आंबेकरांचे बूट आले होते, मधला डाग म्हणजे सौ.-च्या हातातली पर्स, एका कोपऱ्यात वळ-लेली मूठ दिसत होती ती आचवलांची होती, असा निर्णय झाला; आणि वैद्य गुप्त झाले होते.

मला ट्रिक फोटोग्राफी इतक्या लवकर येईल, याची कुणालाही कल्पना नव्हती. त्यामुळे ह्या सर्व मित्रांचा असूयेने झालेला जळफळाट मी विसरू शकत नाही. केव्हाही मी कातडी पिशवीतून कॅमेरा काढला की लांडगा आला रे आला म्हणून भर पॅरिसच्या रस्त्यात हे लोक ओरडायचे ! पॅरिसच्या म्यूझियम्समध्ये कॅमेरा आत नेऊ देत नाहीत; बाहेर ठेवावा लागतो आणि तो सांभाळण्याबद्दल वर पन्नास फ्रँक द्यावे लागतात. माझ्या सर्व मित्रांनी अत्यंत दुष्टपणाने 'ह्याला कॅमेरा नेऊ द्या, कारण ह्याची फोटोग्राफी ह्या दर्जाची आहे' म्हणून, खिशातून मी काढलेले कोरे फोटो काढून दाखवले. मला फ्रेंच कळत नसले तरी 'ला कॅमेरा', 'ला फोतूग्राफेर' वगैरे शब्द समजले; पण माझ्या मित्रांचे फ्रेंच माझ्या फोटो-ग्राफीइतकेच पारदर्शक होते की काय कोण जाणे, मला कधीही कॅमेरा आत नेऊ दिला गेला नाही.

पॅरिसच्या रस्त्यात धंदेवाईक फोटोग्राफर चालता चालता फोटो काढतात आणि कार्ड देऊन पसंत पडला तर विकत घ्या असे सांगतात. मी चालता चालताही फ़ोटो काढून पाहिले. पण ही पाश्चात्त्य देशांतली माणसे फारच जलद चालतात. त्यामुळे मला फोटो काढता आले नाहीत, तरी

उलटे चालायची थोडीशी प्रॅक्टिस झाली. बाकी माणूस जोखावा फोटोग्राफरपुढे किंवा आरशापुढे! कॅमेरा आणि आरसा हे मी मी म्हणवणाऱ्या किंवा मीपण गमावल्याचे मीपण सांभाळणाऱ्या संतमहंतांना-देखील तोलणारे उत्कृष्ट तराजू आहेत. आरशात बायकाच पाहतात असे म्हणणे हा केवळ पुरुषी अहंकार आहे. फुटपाथवरून चालता चालता डाव्या बाजूच्या दुकानात मोठा आरसा आला आणि उजव्या बाजूने त्रैलोक्यसुंदरी गेली तर कुरूपातला कुरूप माणूसदेखील पहिली नजर आरशावर आणि दुसरी त्या सुंदरीवर फेकेल. पॅरिसच्या रस्त्यावर आपण हिंडत होतो, याचा पुरावा लोक काय हौसेने गोळा करतात! आयफेल टॉवरवर जाऊन पोचल्यावर खाली पसरलेले पॅरिस पाहण्याआधी आम्हीदेखील आमच्या महादेव जोशांच्या कॅमेऱ्यापुढे 'पोज' देऊन उभे राहिलो. त्यानंतर पॅरिसचे विहंगमावलोकन!

तीनचार दिवसांत परदेशचा मुक्काम आवरणार होता. पी. अँड ओ. कंपनीच्या बोटीवर आधी पाठवायच्या सामानाची लेबले चिकटवण्याचे काम सुरू झाले होते. काय काय वस्तू घेतल्या यापेक्षा काय काय घेता आल्या नाहीत, याची खंत मोठी होती. 'फ्रिज' नेता येतो की नाही, या विषयावर सकाळ-दुपार परिसंवाद होत होते. फक्त वर्षभर वापरलेला फ्रिज नेता येतो, असे कळल्यावर तो नाद सोडला. पण या फ्रिज प्रकरणात मात्र माझे एक स्वप्न भंगले. एक इंग्रज दुकानदार चक्क जुनी पावती करून द्यायला तयार झाला आणि मग त्याला ज्या ऐटीत आम्ही असले नियमबाह्य आणि गर्ह्य (फार दिवसांनी हा शब्द कामी आला.) वर्तन करायला नकार दिला, तो प्रसंग 'थोरांच्या आठवणी'त पुढे मागे नमूद व्हावा. मात्र इंग्रज दुकानदारसुद्धा पावत्या फाडताना असली गंडवागंडवी करतो याचा विलक्षण खेद झाला. शेवटी इंग्रज काय नि शा. चापशी नरशी किंवा तसलाच एखादा काय, 'दुकानदार' हेच खरे! साहेब लेबलात मारतो. मंडईतला मटारवाला वजनात मारतो.

स्वतःच्या फाड फाड तोंडात मारून घ्याव्यात, असे वाटायला लावणारा दुसरा प्रसंग म्हणजे लंडनच्या पेटीकोट लेनमधला! इथे सर्व वस्तू

विलक्षण स्वस्त मिळतात, असा एक लोकभ्रम आहे. पेटीकोट लेन म्हणजे मुंबईतला चोरबाजार ! हा रविवारी सकाळी भरतो. ' रस्तेका माल सस्तेमे' या सूत्रावर इथला व्यापार उभा आहे. लंडनमध्ये माणसांची दाटी मी वेळी प्रसंगी पाहिली, पण आपल्या बुधवार-शुक्रवारच्या बाजारासारखी माणसे घोंघावताना पाहिली नव्हती. ती इथे आढळली. आजवर पाहिलेले लंडन आणि हे लंडन फार निराळे होते. नॉटिंगहिल गेटच्या आसपासचे दरिद्री लंडन मी पाहिले होते. तिथे अधिक वस्ती निग्रो आणि तत्सम लोकांची. पण ह्या पेटीकोट लेनच्या बाजारात मात्र चांगले जातिवंत गोरे वचावचा करताना आढळले. दुकानदारांच्या जिभांवर सरस्वती नाचत होती. तिचा नाच मात्र अगदीच तमाशाच्या बोर्डावरचा होता. ( जाता जाता हा ' बोर्ड ' म्हणजे स्टेज हे सांगणे बरे. सरकारी तमाशा बोर्ड आहे ते निराळे. ) त्या वाचिवीरांनी आमचा पाहता पाहता मोरू केला. आम्हांला तिथली प्रत्येक वस्तू स्वस्त वाटायला लागली आणि सभ्यता, सारासार विचार सारे बाजूला ठेवून आम्हीदेखील त्या चेंगराचेंगरीत घुसलो. लहानपणी देवळातील आरती आटोपल्यावर पोरे प्रसादाचे ताट फिरवणाऱ्या-भोवती आशाळभूतपणे हात पसरून गर्दी करतात, तस्से त्या गर्दीत घुसू लागलो. मला वास्तविक ह्या गोष्टीचा लहानपणापासून तिटकारा आहे. मूल म्हणूनसुद्धा हा आधाशीपणा मी केलेला मला स्मरत नाही. पण पेटीकोट लेनमधल्या त्या बाजाराने तीन दमडींची ताडी प्यालेल्या माणसासारखी आमची अवस्था केली. धक्के देत आणि खात आम्ही खरेदीच्या मागे लागलो. त्यातल्या त्यात एका दुकानदाराला तर मी आजन्म विसरणार नाही. माणूस नकल्या होता, हजरजबाबी होता. त्याने आपल्या दुकानाचे दिवाळे फुंकल्याचा आव आणला होता. तो लोकांकडून एक एक शिलिंग गोळा करून त्यांतल्या काही लोकांना विजेच्या शेगड्या, हीटर्स, टी-सेट्स जे हाताला लागेल ते देत होता. आम्हीही आमचा शिलिंग देऊन वाट पाहू लागलो. त्या माणसाच्या अभिनयाने, वाक्चातुर्याने, विनोदाने थक्क झालो, ' हिप्नोटाईज ' झालो. एका स्टेशनवॅगनपुढे त्याने हा लिलाव मांडला होता. तो आणि त्याचे सहकारी आपसांत भांडत होते. हा गृहस्थ

एखाद्याला विजेचा पंखा तीन शिलिंगात म्हणजे दोन रुपयांत देई, मग त्याचा सहकारी त्याच्याशी भांडे. हा म्हणे, 'बस्, माझा शब्द गेला!' तो ओरडे, 'पण मी तुझा पार्टनर आहे. हा काय धंदा आहे!' दोघे-जण गुद्दागुद्दीवर येत. शेवटी तो चिडून दूर निघून जाई आणि गिऱ्हाईक पंखा घेऊन जाई. हा सारा बनाव होता, हे शेवटपर्यंत आम्हांला कळले नाही. आमच्या शिलिंगात आम्हांला एक पुडके आले. त्यात पार्कर पेन असावे, अशी आमची समजूत झाली. कागदाची वेष्टणे सोडता सोडता आत तीन पेनांची पेन्सिल निघाली! लंडनमध्ये मी पाहिलेले हे सर्वांत उत्कृष्ट नाटक! असला अभिनय आणि असली परिणामकारक संवादाची फेक गिलगुड, रेडग्रेव्ह आणि ऑलिव्हिये ह्या तिन्ही 'सरां'ना जमणार नाही.

शॉच्या पिग्मेलियनने शॉला किती पैसे दिले मला ठाऊक नाही. परंतु त्या नाटकावरून 'माय फेअर लेडी' नावाची संगीतिका करण्यात आली, तिला मात्र कल्पनातीत लोकप्रियता लाभली. वर्षावर्षापूर्वी 'प्लॅन्स' संपले होते. मी ह्या संगीत नाटकाचे तिकीट मिळविण्याचा आटोकाट प्रयत्न केला. शेवटी अगदी शेवटचा प्रयत्न म्हणून पुन्हा एकदा थिएटरावर गेलो. तिथे एका इंग्रज गृहस्थाने गाठले आणि पाच पाच शिलिंगांची उभे राहून नाटक पाहण्याची दोन तिकिटे आमच्यापुढे केली. हा गृहस्थ म्हणजे आम्हांला पुंडलिकाभेटी परब्रह्म आल्यासारखा वाटला. आम्ही खिशातून पैसे काढू लागल्यावर त्याने हळूच त्या तिकिटांची किंमत प्रत्येकी पाच पौंड आहे असे सांगितले. म्हणजे साडेतीन रुपयांचे तिकीट तो काळ्या बाजारात पासष्ट रुपयांना विकत होता. आम्ही त्याला नमस्कार करून परतलो.

लंडनहून परतता परतता मिळालेले हे चटके फारसे सुखावह नव्हते. परदेशाच्या मुक्कामातली ही छोटी छोटी गालबोटे! ती विसरण्याचा प्रयत्न करूनही विसरता येत नाहीत.

लंडनमधल्या नव्हे, परदेशातल्याच मुक्कामातला शेवटचा दिवस. ट्रंका बोटीवर पोचल्या होत्या. स्विस कॉटेज स्टेशनजवळच्या पेंढारकरांच्या

फ्लॅटमधून बाहेर पाहत उभा होतो. बाहेर लक्ख ऊन पडले होते. रस्त्यात रहदारी वाहत होती. इंग्लिश घरांची धुराडी आणि प्रार्थनामंदिरांचे कळस यांची विचित्र खिचडी क्षितिजापर्यंत पसरली होती. काही तासांनंतर आम्ही लंडनचा निरोप घेणार होतो. बाकी निरोप काय घ्यायचा म्हणा ! आलो तसे जाणार होतो. आयुष्यातल्या एका मजेदार खंडकाव्याचे शेवटले चरण गुणगुणत उभा होतो. टॅक्सी आली. बरोबर घेण्याच्या सामानाच्या बॅगा उचलून टॅक्सीत ठेवल्या आणि निघालो. हाईड पार्कमधून टॅक्सी जात होती. ड्रायव्हर एकदम 'हा' असे ओरडला आणि त्याने रस्त्याच्या कडेने गाडी काढली. हाईड पार्कमधल्या गेले चार महिने थंडीच्या कडाक्यात गारठलेल्या एका फुलाच्या वाफ्यातली रोपे पाळण्याच्या कठड्याला धरून उभ्या राहिलेल्या बाळासारखी सूर्यकिरणांच्या जाळीला धरून उभी राहिली होती. आणि चिमण्या ओठांत चिमुकल्या दातांची हिरकणी लुकलुकावी तशी त्या पानांमागून इवली इवली पांढरीशुभ्र फुले डोकावत होती !

"स्प्रिंग !" ड्रायव्हर स्वतःशीच उद्गारला. पेंढारकरांनी त्या दिवशीचा टाइम्स उघडला. त्यात कुणाचे तरी, 'कालच मी पहिले कोकिलकूजन ऐकले' असे पत्र होते. इंग्लंडमध्ये पहिली कोकिला गाइली होती. हाईड पार्कमध्ये पहिली फुले फुलली होती. नव्या वसंताचे स्वागत झाले होते. लंडनमध्ये आम्ही कोणाचा निरोप घेणार होतो ? मी मनोमन त्या चिमण्या फुलांचा निरोप घेतला.

मला बंदर ही गोष्ट रेल्वे प्लॅटफॉर्मपेक्षा जास्त आवडते. बोटीची ही ओढ माझ्या मनात कशी निर्माण झाली हे कळत नाही. लहानपणी जुहूच्या किनाऱ्यावर बसून क्षितिजाच्या आधाराने जाणाऱ्या शीडहोड्यां-मधून मी मनातल्या मनात खूप सफरी केल्या आहेत. क्षितिजावरच्या त्या शीडहोड्या मोजत बसायच्या. त्या दिसता दिसता दिसेनाशा होतात आणि नव्या चांदण्या दिसायला लागाव्यात तशा एकाएकी नव्या होड्या मावळत्या सूर्याच्या आसपास एकदम दिसायला लागतात. 'खलाशी' व्हायची माझी खूप महत्त्वाकांक्षा होती. विशेषतः चालत्या बोटीत कठड्यावरून चालत जाणारा आणि चालता चालता तिरीप लागू नये

म्हणून उन्हाच्या दिशेला किंतान बांधणारा खलाशी हा तर आदर्श होता. खलाशाचा सूट हौसेने आपल्या मुलांना घालणाऱ्या श्रीमंत कुटुंबात माझा जन्म झाला नाही. आमच्या घराजवळ एक धनिक कुटुंब राहात असे. त्यांच्या घरातला मुलगा 'सेलर सूट' घालून त्यांच्या मोटारीतून जाई. त्याच्याइतका हेवा मी त्यानंतर आजतागायत कुणाचाही केला नाही. तेवढा सेलर सूट घालण्यासाठी एका संध्याकाळपुरते देवाने मला लहानपण द्यावे !



साउदॅम्प्टनच्या बंदरात आमची 'कॅंटन' बोट उभी होती. ही काही फारशी मोठी बोट नाही. पण आमच्यासारख्या 'चंद्रावती-' नि 'सेंट ॲंथनी-'वाल्या प्रवाशांना हीदेखील प्रचंड वाटली. कस्टम अधिकाऱ्यांनी एका अक्षराने इकडले तिकडले न विचारता खडूने सामानावर फुल्या मारल्या. जड सामान बोटीच्या तळघरात गेले नि बॅगा उचलून हमालांनी बोटीवर आणून रचल्या. त्या कामावर हिंदी मजूर होते. त्यांनी पहिला हिसका दाखवला. अनेकांच्या सुंदर सुंदर कातडी बॅगांची आतडी बाहेर काढली. आतले कपडे लोंबू लागले. मग भांडणतंटे सुरू. भारताच्या दिशेच्या प्रवासाला सुरुवात झाल्याची पहिली झलक मिळाली. आमच्या प्रवासी एजंटाने आम्हांला उत्तम कॅबिन मिळाल्याचे सांगितले होते. त्या प्रचंड बोटीत ती शोधून काढायला अर्धा तास लागला. वाळकेश्वरला फ्लॅट मिळाल्याचे कळावे आणि शेवटी ती हनुमान बिल्डिंगमधील तळमजल्यावरची जिन्याजवळची खोली आहे हे कळावे म्हणजे जे काही होईल, ते ही कॅबिन पाहिल्यावर झाले. बोटीच्या पोटातले जिने उतरत

आम्ही पाण्याखाली पोचलो. तिथे आमची कॅबिन होती. म्हणजे पुढला प्रवास सबमरीनमधून केल्याचा आनंद मिळणार होता. कुणी म्हणे, हे चांगले आहे, कारण बोट खाली कमी हलते. कुणी म्हणे, छे! बोटी सगळ्यात जास्त खालीच हालतात.

आम्ही त्या कॅबिनचा ताबा घेतला आणि कुटुंबाने कॅबिन लावायला सुरुवात केली. तेवढ्यात वरच्या बर्थला माझे डोके तीनदा आदळले. बाकी त्या कॅबिनमध्ये टॉलस्टॉयच्या ' माणसाला जागा लागते किती! ' ह्या प्रश्नाचे राहून राहून स्मरण होई. इतक्या अरुंद जागेत साऱ्या सोयी होत्या. मनात विचार आला, माणसे मोटमोठ्या खोल्यांचा हव्यास का म्हणून करतात? आमचा स्टुअर्ड गोव्याचा होता. त्यामुळे आत शिरल्याबरोबर ' इंग्लिश सगळे झाडोनी ' मी त्याच्याशी कोकणीत सलो-ख्याचे संबंध प्रस्थापित केले.

" आमचॉ मरे तूं—" हे एकदा सिद्ध झाल्यावर पुढल्या प्रवासात कसलीही अडचण आली नाही. प्रत्येक गोष्टीत तो मला " तूं सुशेगात राव रे—" म्हणून धीर देई.

बोटीच्या डेकवर आलो. रुमाल फडफडत होते, डोळ्याला लागत होते. आलिंगने दिली – घेतली जात होती. काही हिंदी कचांनी गोऱ्या देवयान्या आणल्या होत्या. त्यांच्या चेहऱ्यांवर ' गोल्डन जर्नी टु समरकंद'-मधल्या प्रवाशांचे कुतूहल होते. इतर जैसे थे परतणारे हिंदी विद्यार्थी ईषत् असूयेने त्यांच्याकडे पाहत होते. सर्वांच्या गळ्यांत कॅमेरे लटकत होते. मीदेखील धावत खाली जाऊन माझा कॅमेरा घेऊन आलो आणि साउदँप्टन बंदराचा फोटो काढला. इतरही पुष्कळ काढले. केवळ कोडॅक कंपनीचे मी गेल्या जन्मीचे देणे लागत होतो, एवढाच ह्या फोटोंचा अर्थ!

बोटीने नांगर काढला. चिप बसलेल्या आवाजात भीमाने तार-सप्तकातला 'सा' लावावा, तसा एक गगनभेदी भोंगा वाजला आणि आमची कँटन बोट इंग्लंडच्या किनाऱ्यापासून दूर सरकू लागली. इथून पुढले चौदापंधरा दिवस एका निराळ्या जगात वावरायचे होते. हिंदी मंडळींच्या बुटांवर इंग्लंडच्या रस्त्याची धूळ होती, त्यामुळे सुरुवातीला जो तो आपला

'ह्यात' होता. कुणाची ओळख ना देख! सगळेच एकमेकांना परके. प्रत्येकजण उगीचच एकमेकाला शिष्ट वाटत होता. बहुतेक लोक त्रयस्थपणाची कवचकुंडले घालून हिंडत होते. अजून इंग्लंडचा किनारा दृष्टीआड झाला नव्हता. क्षणाक्षणाला दुरावणाऱ्या त्या किनाऱ्याकडे पाहताना डोक्यात असंख्य असंबद्ध चित्रांची 'अन्-एडिटेड' फिल्म चालली होती. काही लोकांच्या चेहऱ्यांवर तर हिंदुस्थानला परत जाताना अगदी 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति' अशा प्रकारची खिन्नता होती. विशेषतः विद्यार्थ्यांच्या. यशस्वी होऊन परत मातृभूमीला चालल्याचा अभिमान नव्हता, असा त्यांच्यावर उगीचच आरोप का करावा? पण एक मोकळे, काहीसे स्वच्छंद, क्षुद्र रूढींपासून अलिप्त असलेले असे वातावरण सोडून जाताना जराशी खिन्नता यावी, हे साहजिकच होते. त्यातून एखाद्या ल्यूसीने किंवा एल्झीने चटका लावलेला असावा, मग प्रश्नच नाही. माझ्या बोटीवर ज्या काही गौरकाय सूनबाई दिसत होत्या, त्यांची मात्र मला मनापासून दया येत होती. त्या बिचाऱ्या आपल्याकडून अगदी खूप साड्या नेसायचा आणि कुंकू लावण्याचा प्रयत्न करीत होत्या. पण पदरदेखील नीट न सावरता येणाऱ्या पोरी इथे संसार कसा सावरणार, ह्याची मला उगीचच चिंता वाटत होती. पुष्कळजणी खूप उत्साहाने येतात आणि तितक्याच निराशेने परततात. पण आमच्या तरुणांनी तिथे जी गौरांगनांसह बिऱ्हाडे थाटली आहेत, त्यांची तर अवस्था फारच करुण आहे. हिंदी लोकांच्या संगतीला हे मडमांचे देशी नवरे सारखे टाळतात आणि गोऱ्यांच्या कुटुंबांत त्यांचे स्वागत फारसे मनापासून होत असावेसे वाटत नाही. गोऱ्या बाईशी लग्न केलेल्या एका मराठी मित्राची एक गोष्ट मला आठवते. तिने मराठी शिकायचा खूप प्रयत्न केला होता. पण तिला 'खरकटं' म्हणजे काय ते समजावून सांगता सांगता आमचा मित्र टेकीला आला होता. ती म्हणे, "जेवून ताटात उरलेलं जर खरकटं, तर हात कसा खरकटा? पेला कसा खरकटा?" मला वाटते, संसारात भावनात्मक एकात्मता वगैरे गोष्टी फार दूरच्या आहेत. खरकटे म्हणजे काय? पारोसे म्हणजे काय? पाण्यातील दशमी ओवळ्याची आणि दुधातली सोवळ्याची

कशी ? निऱ्या काढणे आणि घडी करणे ह्यांतला फरक करणारी रेषा कुठली ? कुंकवाची पिंजर कधी होते आणि लसणाचा ठेचा केव्हा होतो आणि चटणी कधी होते ? पिठले आणि झुणका ह्यांच्या सीमारेषा कुठल्या ? हे कळणे अधिक महत्त्वाचे ! जेवताना सणसणीत भुरका जोपर्यंत मारता येत नाही तोपर्यंत भारतीय संस्कृतीचे आकंठ दर्शन कसे होणार ? धागे जुळतात ते अशा चिल्लर गोष्टींनी ! ओंजळीतले तीर्थ पिऊन तो ओला तळवा डोळ्यांना लावताना जे गार वाटलेले असते, ते बर्फाचा खडा घेऊन वाटत नाही. माणसाची घडण काय असंख्य चमत्कारिक गोष्टींनी होते ! इंग्लंडच्या मुक्कामात मला चटकन हिंदुस्थानात जाऊन केळीच्या पानावर मऊ मऊ भात, वरण, लोणकढे तूप आणि ताज्या लिंबाची फोड त्यावर पिळून दोन घास खाऊन यावे, असे डोहाळे लागले होते. आजन्म पाश्चात्त्य वातावरणात राहिलेल्या माझ्या एका ज्येष्ठ मित्राने मृत्युशय्येवरून पिठलंभात खायची इच्छा व्यक्त केली होती. रक्ताच्या थेंबाथेंबात लपलेला तो अज्ञात आत्माराम अशा काही चमत्कारिक गोष्टींची मागणी करतो आणि — ' गड्या, तू वंशाचा दिवा नाहीस तर केवळ दुवा आहेस ' याची जाणीव करून आपल्याला एकदम लहानांत काढून टाकतो.

— आणि म्हणूनच मला सदैव वाटे की, इंग्रजी अन्नपाण्याचे माझ्या नसांतून रक्त झाले नाही. केवळ देहधारणेसाठी ते कामी आले. पॅरिसला सर्व प्रकारची मुक्तता असूनही सीन नदीच्या काठी एका संध्याकाळी आम्ही भटकत असताना कोणी नाही असे पाहून मी जोरजोरात मनाचे श्लोक ओरडून घेतले तेव्हा जिवाला गार वाटले. शेवटी संस्कृती म्हणजे बाजरीची भाकरी — वांग्याचे भरीत — ' गणपतिबाप्पा मोरया 'ची मुक्त आरोळी — केळीच्या पानातली भाताची मूद आणि त्यावरचे वरण — उघड्या पायांनी तुडवलेला पंचगंगेचा काठ — मारुतीच्या देवळात शनिवारी एका दमात फोडलेल्या नारळातले उडालेले पाणी — दुसऱ्याचा पाय चुकून लागल्यावरदेखील आपण प्रथम केलेला नमस्कार — दिव्या दिव्या दीपत्कार — आजीने सांगितलेल्या भुतांच्या गोष्टी — मारुतीची न जळणारी आणि वाटेल तेव्हा लहानमोठी होणारी शेपटी — दसऱ्याला

वाटायची आपट्याची पाने — पंढरपूरचे धूळ आणि अबीर यांच्या सम प्रमाणात मिसळून खाल्लेले डाळे आणि साखरफुटाणे — सिंहगडावर भरून आलेली छाती — आणि दिवंगत आप्तांच्या मूठभर अस्थींचा गंगार्पणाच्या वेळी झालेला स्पर्श! कुंभाराच्या चाकावर फिरणाऱ्या गोळ्याला त्याचे पाण्याने भिजलेले नाजूक हात लागून घाटदार मडके घडावे, तसा ह्या अदृश्य पण भावनेने भिजलेल्या हातांनी हा पिंड घडत असतो. कुणाला देशी मडक्याचा आकार येतो, कुणाला विदेशी कपबशीचा! एकाच लंडन शहरात राहणाऱ्या ज्यूडिथ जॅकसन आणि ॲन होगार्थ या सख्ख्या बहिणी अठरा वर्षांनी आमच्याबरोबर नाताळाच्या सुमाराला ज्यूडिथच्या घरी जेवणाच्या निमित्ताने भेटल्या. हवेत ख्रिसमस होता. टेबलावर केक ठेवली होती. तिच्यावर ब्रँडी ओतून त्या केकला फोडणी दिली. त्या धुरावर हात शेकून त्याचा वास घेत ॲन म्हणाली, "लहानपणापासून मला हा वास घेतल्याशिवाय ख्रिसमस आला असे वाटतच नाही." आणि मग त्या दोघी बहिणी आपले बालपण आठवू लागल्या. मला कधी एकदा घरी येऊन लसणाची फोडणी दिलेली अंबाडीची भाजी खाईन असे झाले होते. माझ्या आईला विलायतेहून निघताना मी पत्र पाठवले होते, त्यात जेवणाचा हा मेनू लिहून कळवला होता. देवळाच्या गाभाऱ्यात निर्माल्य, नंदादीप, उदबत्त्या, ताजी फुले आणि कापूर यांचा संमिश्र वास आल्याखेरीज तिथे भगवंताचे अधिष्ठान आहे, असे मुळी वाटतच नाही.

इंग्लंडची बोट हिंदुस्थानच्या दिशेला सरकू लागल्यावर आपली माणसे बदलायला लागली. ओळखीदेखील वाढायला लागल्या. पाच पाच, सहा सहा वर्षे विलायतेत शिक्षणासाठी राहिलेले तरुण डेकवर घोळके करून गाऊ लागले. दिवसभर इंग्रजी पोरींशी दोस्ती करून गंमत करणारा महेश-देखील आमच्या देशी घोळक्यात बसून आमच्याबरोबर हिंदी, बंगाली भजने गाऊ लागला. इंग्रजांकडून उसनवार घेतलेले अलिप्तपणाचे बर्फ वितळू लागले आणि मोठे मजेदार गट बनले. भट्टाचार्य, मूर्ती, कामत, पंथुलू, देशपांडे अशी एरवी विसंवादी वाटणारी नावे एकत्र जेवू-खाऊ लागली. डेकवरचे खेळ सुरू झाले. माझ्या सुदैवाने मला चोवीस तास बडवायला

पियानो मिळाला. भारतीय आकाशवाणीतील नोकरी आणि थोडेबहुत पियानोवर बोटे चालवण्याचे ज्ञान एवढ्या भांडवलावर मी बोटीवरचा संगीत-दिग्दर्शक झालो; आणि एकूण पुढले पंधराएक दिवस पुन्हा एकदा फर्ग्युसन कॉलेजच्या होस्टेलमध्ये राहिल्याचे सुख लाभणार असे वाटू लागले, आणि आमची बोट जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीत शिरली. भूशिर आणि बेट ह्यांखेरीज समुद्राशी निगडित असलेले इतर भौगोलिक जातिभेद ह्या जन्मी तरी लक्षात येतीलसे वाटत नाही. पण या जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीने भलताच इंगा दाखवला. सगळ्यांनी अंथरुणे धरली. झक मारली आणि बोटीच्या प्रवासाला निघालो असे झाले. बोट इतकी हलत होती की पोटात पाणी ठरत नव्हते. दिवसभर उशीला नाक लावून पडायचे. जरा मान वर केली की — ब्यॅक! हा प्रकार तीनएक दिवस चालला. हळूहळू बोट ठिकाणावर आली आणि नाकासमोर चालू लागली. बिळांतून उंदीर निघावे तशी माणसे आपल्या कॅबिन्समधून बाहेर पडली. जो तो आपल्याला काही तशी बोट लागली नाही, हे दुसऱ्याला पटवीत होता. पण अंदरकी बात स्टुअर्ड्स जाणत होते. ते पट्टे मात्र तंगड्या फाकवून निर्धास्त भटकत होते.

आमच्या बोटीच्या प्रवासाला खरी सुरुवात झाली जिब्राल्टरनंतर! जिब्राल्टरचे सुळके पाहून वाखाणणे हा एक परंपरेचा भाग आहे. मला वाटते, सदैव खवळलेल्या त्या सामुद्रधुनीच्या दर्शनानंतर शांत असे ते उघडेबोडके सुळके पाहिल्यावर मनाला हायसे वाटत असावे. त्या आनंदाचे श्रेय ह्या जिब्राल्टरच्या बोडक्या डोंगरांना फुकटचे मिळते. ठरल्याप्रमाणे त्या जिब्राल्टरबद्दल चुकीची माहिती देणारे सहप्रवासी निघालेच. भराभरा कॅमेरे बाहेर पडले आणि फोटो घेतले गेले. मीदेखील फोटो घेतले (होते)! नकाशावरून भूगोल शिकल्यामुळे जिब्राल्टर म्हटले की युरोपचे टोक आणि आफ्रिकेचे टोक अगदी विंचवांच्या आकड्यासारखे जवळ जवळ आल्यासारखे वाटते. प्रत्यक्षात जिब्राल्टर निराळेच दिसते. त्यामुळे भूगोलावरचा विश्वास पुन्हा एकदा उडतो. बाकी इथला समुद्रकिनारा जरासा ओकाबोकाच दिसतो. कोकणात जाताना समुद्रकिनारा नारळीच्या बनामुळे काय सुंदर वाटतो.

इथल्या किनाऱ्यावर नारळी नाहीत. झुलते माड नाहीत तो किनारा कसला? उसळत्या लाटांशी संवादित्व साधायला काही तरी नको का? इथे आपले स्तब्ध सुळके! दिल्लीच्या संगीत मैफलीत उत्कृष्ट गायकगायिकांच्या पुढे चेहऱ्याची घडी न बिघडवता, न डोलता, न हालता बंद गळ्याचे पांढरे कोट घालून सगळ्यांत पुढे सेक्रेटरीज, जॉइंट सेक्रेटरीज, असिस्टंट सेक्रेटरीज, अंडर सेक्रेटरीज उभ्या धडग्यांसारखे बसतात, त्यातलाच प्रकार! लाटांच्या नाचाला माडांची साथ मिळाली नाही तर दर्याची मैफल जमतच नाही.

—— पण ह्या साऱ्या प्रवासात डोळे भरभरून मी जर काही पाहिले असेल तर दर्या —— पहाटे —— दुपारी —— संध्याकाळी – रात्री नुकताच उठलेला – झोपेतून जागा झालेला – निवांत पडलेला – चांदण्यात न्हालेला – दर्या! पॅरिसच्या कॅसिनोत एका तालात पाय उडवणाऱ्या पोरींसारख्या माशांच्या टोळ्यांच्या टोळ्या पाण्यावरून एका तालात उड्या मारून जात. एखादी प्रचंड लाट गगनाला वेंघेत घेण्याच्या ईर्ष्येने निघे आणि शेख महंमदाच्या मनोराज्यासारखी फुटून जाई. काही घिटुकल्या लाटा बोटीच्या अंगाशी चावटपणा करून जात. रात्रीच्या वेळी विरुद्ध दिशेने येणारी बोट आकाशातल्या नक्षत्रांशी स्पर्धा करणारी दिव्यांची आरास मिरवीत दूर दूर निघून जाई. कुठे एखादे दीपगृह चमकधमक करी. डेक-चेअरवर पडून अंगावर वारा घेत हे सारे देवाघरचे वैभव डोळ्यांत साठवीत असताना हृदय उचंबळून येई – डोळे उगीचच पाणावत. आमच्याबरोबरचा भट्टाचार्यजी अशा वेळी रवींद्रांची गीते गाई! मूर्ती हळूच विचारीत असे, "हॅव यु सीन अवर मेड्रास शोअर? ओह! च्याक्!" आमच्या गटातले बहुतेक लोक विलायतेला जाऊनदेखील देशीच राहिले होते. त्यामुळे पलीकडल्या पाश्चात्त्य संगीताच्या जल्लोषात किंवा नृत्यात आम्हांला गती नव्हती. पण पार्श्वसंगीत म्हणून ते सूर अधिकच गुंगी आणीत! दिवसेंदिवस हवेतला झोंबणारा गारवा कमी होऊ लागला आणि आमच्या बंगाली मित्रांनी आपला धोतर-कुडत्याचा राष्ट्रीय वेष चढवला. कोट बॅगेत गेले. मी बूट बंद करून चपला चढवल्या.

समानशीलांचे गट जमले. पत्त्यांचे डाव पडू लागले. काही मंडळींना मात्र त्या गर्दीत आपली माणसे सापडली नाहीत. माझ्या जेवणाच्या टेबला-वर दुसरे एक जोडपे होते. नवरा बॅरिस्टर होता आणि बायकोने लंडन स्कूल ऑफ इकनॉमिक्समधून पदवी घेतली होती. हे तरुण जोडपे कधीही कोणांत मिसळले नाही. दिवसभर डेक-चेअरवर बसून ही दोघेही वाचीत असत; आणि जेवताना ही बोट कशी वाईट आहे, येताना ज्या बोटीतून ते आले ती किती चांगली होती, हे सांगत. दोघेही शिष्ट नव्हते, माणूस-घाणे नव्हते. पण त्यांना वेगळी चूल मांडण्यात आनंद होता. त्याउलट आमचे काही सोबती आम्हांला कॅबिनमधून हुसकून बाहेर काढीत. पुढे बोटीवरचे सामुदायिक खेळ सुरू झाले. त्यांतल्या पैसे मिळविण्याच्या खेळातला माझा वाटा सारखे हरून विजेत्यांची धन करणे हा होता: आणि रिंग टेनिसमध्ये केवळ रिंगा समुद्रातून दर वेळी काढायला पाणबुडे नसल्यामुळे मला भाग घेता येईना. भिंतीवर लावलेल्या चक्रावर बाण मारण्याचा डार्ट्सचा खेळ होता, त्यात एकदा हात घातला. पण आमचा बाण शेवटपर्यंत लागला नाही. रामाचे नाव घेऊनदेखील पाहिले. शेवटी 'गप्पा मारणारा हाय का कोणी?' अशी दवंडी पिटीत दोस्त गोळा केले. माझ्यासारखे खेळात केवळ टाळ्या पिटण्याचे काम करणारे सापडले. फॅन्सी ड्रेस कॉंपिटिशनमध्ये मात्र आमच्या गटातल्या मूर्तीच्या गळ्यात आणि कमरेला मंत्र्या-मुसंब्यांच्या रुंडमाळा घातल्या आणि चारदोन बायकांच्या लिपस्टिक त्याच्या अंगभर ओढून, एका इंग्लिश पोरीचा झगा त्याला चढवून, डोक्याला साईबाबांसारखा रुमाल बांधून अंगात आलेल्या कोकणी देवचाराचे सोंग देऊन पाठवला. त्याला दोन शँपेनच्या बाटल्यांचे पहिले



बक्षिस मिळाले. त्याने समस्तांच्या देखत 'गुरुजीऽऽ' म्हणून धावत येऊन त्या बाटल्या माझ्या पायाशी ठेवल्या. असली वाहती गुरुदक्षिणा मिळाल्यावर शिष्याला 'वत्सा, तुजप्रत कल्याण असो' कोण म्हणणार नाही !

वरती आकाश आणि खाली पाणी अशा थाटात आमची भल्या-बुऱ्यांची तरंगती दुनिया भारताच्या दिशेला चालली होती. अजून बोट कुठल्याही बंदराला लागली नव्हती. त्यामुळे वाटेत कुठे एखादं बेट दिसले किंवा जमिनीचा पट्टा दिसला की मंडळी डेकवर गर्दी करायची. वाटेत एकदोन सुंदर बेटे लागली. भूगोल आणि मी यांतील प्राचीन वैमनस्या-मुळे त्यांची नावे माझ्या लक्षात नाहीत. काही मंडळी मात्र भिंतीवर लावलेला बोटीच्या प्रवासाचा नकाशा रोज नेमाने पाहून आपली बोट नेमकी कुठे आहे ते सांगत.



बोट पाण्यातून पुढे वाट काढीत होती — आणि एके दिवशी मी समुद्राचे एक अलौकिक स्वरूप पाहिले. हा अफाट समुद्र मेल्यासारखा पडला होता. पापलेटाच्या रंगाचा हा समुद्र पापलेटाच्या पाठीसारखाच गुळगुळीत आणि निश्चल ! औषधालादेखील तरंग नाही. आमची एवढी प्रचंड बोट, पण खरवसातून सुरी ओढीत आणावी तशी ती त्यातून पाणी कापीत होती. मृत समुद्र म्हणतात तो हाच की काय कोण जाणे ! पण विलायतेच्या वाटेवर तो लागत नसावा. दर्याचे ते विक्षिप्त दर्शन मी जन्मात विसरणार नाही. त्या दिवशी त्याला काय झाले होते देव जाणे ! त्याच्या पोटातले मासे जागा सोडून गेले होते, की तमाम लाटांचा झनाना दुसऱ्या

दर्यात नांदायला गेला होता, की चंद्राचे आणि त्याचे काही बिनसले होते, कळत नाही. थबथबीत, अस्मानी रंगाची पतंग चिकटवायची खळ असते तसा तो समुद्र इतका निःस्तब्ध होता की, त्याच्यावरून कदाचित मी फिरूनही आलो असतो. अगदी ताणलेल्या धोतरासारखा! साऱ्या समुद्र-पर्यटनात ह्या समुद्राने निष्कारण मनात घर केले आहे. एरवी समुद्राच्या अनेक लीला आणि असंख्य स्वरूपे दिसत होती, पण हे स्वरूप लोक-विलक्षण होते. प्रळयानंतर थकून पडलेला समुद्र कदाचित असाच पडला असेल. मग कुठे तरी खळबळले असेल आणि एका पिंपळाच्या पानावर आंगठा चोखीत पडलेले ते बालक त्याला पुन्हा जिवंत करून गेले असेल. गाण्याच्या बेहोश मैफलीत एखादा गंभीर माणूस डायरीत दिवसाचा हिशोब मांडताना आढळला तर त्या मैफिलीऐवजी तोच अधिक काळ लक्षात राहतो, तशी ह्या निष्प्राण समुद्राची आठवण अजूनही मला भेडसावते. क्वचित् प्रसंगी मला तो समुद्र महिनो न् महिने गप्प बसणाऱ्या वेड्या-सारखा वाटतो. चिंध्या फाडणाऱ्या वेड्यापेक्षा असले वेडे भयंकर! त्यातून ते मधूनच काही कारण नसताना खुदकन हसतात आणि आपल्या हृद-याचा ठेका चुकतो; तशी ह्या मौनी सागरावरची अपवादरूप लाट आजही माझ्या डोळ्यांपुढे उभी आहे.

आता उकाडा वाढू लागला. मला वाटते, त्या वेळी आमची बोट भूमध्यसमुद्राच्या मध्यावर आली असावी. आणि मग पोहण्याच्या तलावात माणसे डुंबू लागली. मडमांचे झगे भलतेच आटले. काहीजणी तर म्हटले तर कपडे आहेत, म्हटले तर नाहीत, अशा थाटात वावरू लागल्या. नजरा चुकवायच्या म्हटल्या तरी चुकेनात. त्या कर्पूरधवलांगांशी आमच्या काही जळलेल्या कापराच्या वडीच्या वर्णाच्या कृष्णाबाईंनीही स्पर्धा चालवली होती. युरोपियन बायका आता त्या वाढत्या उन्हात तोंडाला नाना प्रकारची रोगणे फासून 'टॅन' व्हायला लागल्या. काहीजणी तर भलत्याच टॅन होऊन चमत्कारिक दिसायला लागल्या. पोर्ट सैद जवळ येऊ लागले तशा पहिल्या पावसासारख्या पहिल्या घामाच्या धारा वाहू लागल्या. विलायतेत घाम विसरलो होतो. मूर्तीने गळत्या घामाचा आधार

घेऊन लुंगी लावली. मीदेखील कुडता-पायजमा चढवला. त्या बदलत्या पोषाखाबरोबर आमचा सगळ्यांचा नूरही बदलला. ' व्हेन आय वॉज इन इंग्लंड 'चे ध्रुवपद हिंदुस्थानात वापरण्यासाठी राखून ठेवले गेले. बोटीच्या डेकला आता अस्सल भारतीय कळा येऊ लागली आणि बोट पोर्ट सैद-मध्ये शिरल्याबरोबर अगदी आपल्या पाण्यात आल्यासारखे वाटू लागले. मनस्वी उकाडा सुरू झाला. क्षेत्राच्या ठिकाणी पंडे घोंघावतात तसे दुकानदार फिरती दुकाने घेऊन घोंघावू लागले. लहान लहान होडक्यां-तून नाना प्रकारच्या वस्तू मांडून बोटीभोवती दुकाने तरंगू लागली. बोटीच्या डेकवर काही खास व्यापाऱ्यांनी आपला संसार थाटला आणि मग अर्धाएक दिवस ' मी काय घेतले ? ', ' तू काय घेतले ? ' यात गेला. एकाच तऱ्हेची वस्तू अनेक किमतींना विकली गेली होती. काही संतुष्ट झाले, काही खट्टू झाले. आम्ही एक उंटाच्या आकाराची ' सीट ' घेतली. एकूण जमावाचे मत आम्हांला ती फक्त पाचच रुपये महाग



पडली असे झाले. पण आमच्याबरोबरच्या एका गृहस्थाला ती दहा रुपयांनी महाग पडल्यामुळे जरा बरे वाटले. वस्तूचा खरा आनंद ती शेजाऱ्यापेक्षा आपणाला अधिक सस्त्यात मिळण्यात असतो. माझ्या

आयुष्यात मी हा आनंद नेहमी शेजाऱ्यांनाच देत आलो आहे.

खरेदीच्या गोष्टी संपेपर्यंत आमच्या बोटीने सुवेझच्या कालव्यात प्रवेश केला. हा कालवा इतका लहान असेल याची कल्पना नव्हती. काठावरच्या अरबांची आणि माझी ओळख नव्हती म्हणून, नाही तर त्यांच्याशी गप्पा मारता आल्या असत्या. पाश्चात्त्य जगाच्या प्रचंड वाड्याची ही दिंडी आहे. ह्या कालव्यातून आमची बोट जाताना पुण्याच्या तपकीर गल्लीतून किंवा मुंबईच्या खोताच्या वाडीतून दुमजली बस गेल्यापैकी प्रकार होता. भूमध्यसागराने आणि सिंधुसागराने इथे जणू काय गट्टी जमवताना पोरे एकमेकांच्या करंगळीत करंगळी घालतात तसे हात जुळवले आहेत. इथे बोट आपुलिया बळे नाही चालत. बोटीपुढे एक छोटी 'पायलट' असते. ती ह्या बोटीला ओढीत नेते—एखाद्या परकऱ्या पोरीने आपल्या लठ्ठ आत्याबाईंना बोळकंडीतून देवळाकडे न्यावे तशी! विमानातून तर हा सुवेझ कालवा सुतळीच्या तोड्याएवढा दिसतो. प्रत्यक्षात जरा मोठा आहे, एवढेच! मात्र चांगला आठदहा तासांचा प्रवास आहे. बाजूला खजुरांची झाडे. शेळ्या चारणारी अरबांची पोरे. डोक्यावर उंच सुरया घेतलेल्या मिसर देशातल्या सुंदरी! त्या सुंदरी असाव्यात हा आपला अंदाज. कारण नाकांपासून पायाच्या अंगठ्यापर्यंत काळा झगा असतो. बाकी बाजूच्या रस्त्यांतून उंटांचा ताफा, आधुनिक अमेरिकन मोटार, इकडे आमची बोट, पलीकडून आगगाडी आणि डोक्यावरून विमान असा खास पानवाल्यांच्या चित्रांत सापडणारा देखावाही आम्ही इथेच पाहिला. त्यातल्याच खजुरींच्या झाडाला झोपाळा बांधून कृष्णपरमात्म्याला झोका देणारी राधा तेवढी बसवली की 'शीन' पुरा झाला असता.

ह्यानंतरचा मुक्काम म्हणजे एडन! इथे सर्व वस्तू भलत्याच स्वस्त मिळतात म्हणून भलभलत्या वस्तू घ्यायला माणसे धावतात. अर्थात आम्हीही याला अपवाद नव्हतो. पण आम्ही एडनला गेलो त्या वेळी मुसलमानांचे 'रोजे' चालू असल्यामुळे बहुतेक दुकाने दिवसा बंद होती. फक्त हिंदी व्यापाऱ्यांची तेवढी उघडी होती. त्यांनी भारतीय व्यापारी परंपरेला अनुसरून आमचे खिसापाकीट व्यवस्थित कातरले. एडनच्या बाजारात

आल्याबरोबर मुंबईच्या भेंडीबाजारात शिरल्याचा आनंद झाला. उपासाचा खिमा, सामोसे, सळीवरचे कबाब वगैरे चालले होते. भिकाऱ्यांचे जथे मागे लागले होते. तेवढ्यात मला पानाचे दुकान दिसले. परदेशच्या मुक्कामात एवढे एक दुकान आढळले नव्हते. बाकी भर लंडनमध्ये पाठ-कच्या दुकानात अळू, वांगी वगैरे भाजीपासून ते जिलबी, बर्फी वगैरे मिठाईपर्यंत, पापड-लोणच्यापासून सर्व काही मिळते. आजीबाई वनारसेंच्या खानावळीत तर आंबट वरण आणि टोमॅटो-बटाट्याचा रस्सा रोज होत असतो. पानाच्या गादीची परंपरा मात्र तिथल्या भारतीयांना पाळता आलेली नाही. पण याला इंग्रजाची स्वच्छतेची नीरस कल्पना जबाबदार असावी. दीडशे वर्षे भारतात राहूनही पानाच्या गादीपुढील रंगरंगोटीचे सौंदर्य इंग्रजांच्या डोळ्यांत भरले नाही, हे आपले दुर्दैव; दुसरे काय ? एडनच्या त्या दुकानात मी पान खाल्ले, तंबाखूची चिमूट तोंडात टाकली आणि इकडे तिकडे पाहून एकदा पिचकारी मारल्यावर आपल्या माणसांत आल्यासारखे वाटले.

एडन बंदरातून बोटीने नांगर काढला आणि पुण्याहून मुंबईला येताना कल्याण स्टेशनातून गाडी हलल्यावर जे होते ते झाले. आता पुढे चार दिवस सामानाची आवराआवर, सहप्रवाशांशी पत्त्यांची देवघेव हे कार्यक्रम सुरू झाले. सारी स्नेहीमंडळी दाही दिशांना पांगणार होती. ' यथा काष्ठं च काष्ठं च ' या न्यायानेच आम्ही त्या पाण्यात जोडीजोडीने तरंगलो होतो. हसलो होतो. नाचलो होतो. गायिलो होतो. एकमेकांची मनमुराद थट्टा केली होती. हे सारे आता संपले. मला विशेषतः आमच्या सह-प्रवासी विद्यार्थी-विद्यार्थिनींविषयी एकाएकी सहानुभूती वाटू लागली. ह्या तरुण मेळाव्यात मीच काय तो वयाने वडील होतो. मी जीवनाची नौका केव्हाच हाकारली होती. त्यांना भारतात जीवनाचे संकल्प सोडायचे होते. आपल्या विद्येचे कसे काय चीज होणार, याची कुठे तरी भीती होती, हुरहूर होती. त्याच्याच जोडीला पुन्हा एकदा कस्टममधून कुठला माल सुटेल आणि कुठे कर भरावा लागेल, याच्या चर्चा सुरू झाल्या. निर-निराळे फॉर्म भरणे सुरू झाले. आम्हा घराण्यातल्या समस्त पूर्वजांच्या

भीतिजन्य प्रामाणिकपणाला स्मरून सौभाग्यवतीच्या कुंकवाच्या डबीची-देखील त्या फर्म्यात नोंद केली. कॅबिनमधले ट्रँझिस्टर रेडियो सेट्स डेकवर आले आणि मुंबई केंद्रावरील मराठी अनाउन्समेंट ऐकली. दिवसाचा हिशेब तासांवर आला. सागराच्या अनुकूल मारुताने शिडात वारा भरला आणि आमची ही महाकाय नौका भारतात दुसऱ्या दिवशी उगवत्या सूर्याला साक्षी ठेवून येण्याऐवजी आदल्या रात्री चंद्राला साक्षी ठेवून आली. एकाएकी क्षितिजावर लक्ष दीप उजळले आणि डेकवर 'मुंबई मुंबई' करीत आरडाओरडा झाला. भावनाशील भट्टाचार्यजींनी काही कारण नसताना मला कडकडून मिठी मारली आणि तो म्हणाला, "आपण सगळेजण मिळून वंदे मातरम् म्हणू या !"

आम्ही काही जन्मठेपेचे कैदी परतत नव्हतो. पण मुंबई बंदराचे दिवे जवळ येऊ लागले, तसतसे सोबतीचे प्रवासी भारावले. एकमेकांना नकळत मंडळींनी डोळे टिपले. आनंदाने टिपले. परदेशातून मुंबई बंदरात रात्री यावे नाही तर भल्या पहाटे यावे. भल्या पहाटेची मुंबई मर्ढेकरांच्या भाषेत सांगायचे म्हणजे न्हालेल्या गर्भवतीसम, तर रात्रीची मुंबई हिऱ्या-मोत्यांच्या दागिन्यांनी नटलेल्या ऐश्वर्यसंपन्न कुलवधूसारखी ! रात्रीच्या वेळी ही मुंबापुरी दर्यावरच्या परदेशी प्रवाशांना दाराशीच उभे करते. रात्रीचे अकरा वाजत आले होते. माझ्या गटात मी आणि माझी पत्नी एवढेच मुंबईकर. त्यामुळे आम्ही त्यांना ही झगमगती मुंबई समजावून देत होतो. भारताचे हे महान प्रवेशद्वार दिव्यांच्या झगमगत्या तोरणांनी आमचे स्वागत करीत होते. पोटच्या दुर्दैवी दारिद्र्याची कोलिष्टके घरा-ण्याच्या अब्रूवर पांघरूण घालणाऱ्या उदारात्म्या अंधाराने आपल्या पांघरुणात दडवली होती. मुंबई नुसती झगमगत होती. बंदरातून कस्टमची बोट आली. हपिसर बोटीवर आले आणि बोटीवरच्या वाहत्या मयखान्याची दारे प्रथम बंद झाली. सुरया आणि चषक कपाटात गेले. पहाटेशिवाय बंदरात उतरायला परवानगी नव्हती. बहुतेकांनी सारी रात्र बोटीवर जागून काढली. अंथरुणाला पाठी टेकल्या, पण डोळे जागे होते.

पहाट फुटली आणि बोटीचा जिना बंदराला लागला. धक्क्यावरची

जिव्हाळ्याची माणसे शोधण्यात डोळे गुंतले. आमच्या आप्तेष्टमित्रांनी धक्क्यावर दाटी केली होती. काहींनी बोटीवर प्रवेश मिळविला. माझ्या आईची समजूत, सातआठ महिन्यांत मी गोरापान साहेबासारखा दिसायला लागणार, अशी असावी. तसे काही घडले नाही. वर्णातच काय पण पिंडातदेखील तसूभर फरक पडला नव्हता. कारण कस्टमसाहेबापुढे उभे राहिल्यावर पुन्हा एकदा तसेच 'सीदन्ति मम गात्राणि' झाले. वास्तविक चोरून सोने तर जाऊ दे, पण चॉकलेटदेखील आणायची हिंमत नव्हती. जप्तीच्या सामानाच्या यादीसारखी आमची बरोबर आणलेल्या सामानाची बुटाच्या ब्रशापासून ते शर्टच्या गुंड्यांपर्यंतची यादी वाचून महत्प्रयासाने दाबलेले त्याचे हसू माझ्या नजरेतून सुटले नाही. त्यातून ड्यूटीचे सामान शोधून काढायला त्याला त्रास पडला असावा. शेवटी उशीत ढेकूण सापडावा तशा एकदोन वस्तू त्या साहेबाला सापडल्या. त्याचे ऋण चुकते करून घर गाठले.

दुपारी कचेरीत जाऊन हजेरी लावायची होती. इंग्लंडच्या कथा ऐकायला जमलेल्या मित्रांशी संध्याकाळचा वायदा केला, भोजन उरकले आणि बसचा नाका गाठला. पहिलीच 'ओ टू एक्सप्रेस', 'जगा नही—नीचे उतरो' म्हणत ठणठणून पुढे गेली आणि मी मनात म्हणालो, 'चला, पश्चिमेच्या सायंतान्यासारखी डोळे भरून पाहता पाहता मावळणारी अपूर्वाई संपली…पूर्वायुष्य सुरू झाले…'

